# गीत माझे अंतरमनीचे

ख्रिस्ती भजन संहिता




संकलन व संपादन

**फा. डॉ. अशोक ओहोळ, ये. सं.**

झेवियर समाज सेवा संस्था,
कामिल बुल्के पथ,
(पुरुलिया रोड)
रांची ८३४००१, झारखंड

३१ जुलै, २०१८

भजन परंपरा जाग त ठेवण्यासाठी लहान मोठे प्रयत्न

केलेल्या

सर्व

रचनाकार, गायक, वादक तसेच भजनी मंडळांना

आणि कॅटेकिस्ट, धर्मगुरु

व

सर्व भजन रसिकांना

आदरपूर्वक समर्पित







**नाशिक कॅथोलिक धर्मप्रांत**
**बिशप्स हाउस,**
**जेल रोड,**
**नाशिक रोड ४२२१०१**
**महाराष्ट्र**

## भजनाचा ख्रिस्ती श्रद्धाबांधनीत व समाजाच्या जडणघडणीत मोठा वाटा आहे.

मृदंग, टाळ, कडी आणि पेटीच्या साथीने सादर होणारी भजने, ही महाराष्ट्राची ओळख आहे. पारंपाारिक लोकगीतं, भजनं आजवर केवळ मौखिक स्वरुपात एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे हस्तांतरीत होत आली आहेत. कीर्तन व भजनाच्या माध्यमातून आपल्या जुन्या पिढीवर ख्रिस्ती श्रद्धेचे सखोल संस्कार झालेले आहेत. या व्यतिरिक्तही धार्मिक जीवनात संगीत, भजन, कीर्तनाचे अनन्यसाधारण महत्व आहे. ख्रिस्ती श्रद्धेत व समाज यांच्या जडणघडणीमध्ये त्यांचा मोठा वाटा आहे. या ठेव्याची पुढील पिढीला ओळख व्हावी, हा वारसा जतन व्हावा यासाठी येशू संघीय धर्मगुरु फादर डॉ. अशोक ओहोळ, हे गेल्या अनेक वर्षांपासून कार्यरत आहेत. महारा  ट्रातील खेड्यापाड्यामधील विविध ठिकाणी प्रत्यक्ष जाऊन, अनेक भजनी मंडळांशी संपर्क साधून त्यांनी विशिष्ट शैलीतील भजनांचा अभ्यास केला व त्यांची दुर्मिळ हस्तलिखिते शोधून काढली ती संकलीत करुन मुद्रित करण्याचे मोठे कार्य त्यांनी केले आहे. आपल्या नाशिक धर्मप्रांतात भजनी मंडळांना प्रोत्साहन देऊन त्यांना पुनर्जिवीत करण्याचे कार्य फादर करत आहेत. खरोखरच हे कार्य अत्यंत कौतुकास्पद आहे. याबाबत मला अत्यंत आनंद होत आहे कारण नगर जिल्हा हा भजन कीर्तनासाठी नावाजलेला आहे, व तोच वारसा 'गीत माझे अंतरमनीचे' ह्या संकलनाच्या माध्यमातून पुढे जाणार आहे यात दुमत नाही.

ह्या संकलनात विषयानुसार भजनाची क्रमवारी करुन आपणासमोर आणली आहे. बहुतांश भजने वृत्तबद्ध नसली तरी छंदबद्ध आहेत. भजने नुसतीच वाचून बहुधा कळणार नाहीत, परंतु ज्या पद्धतीने ती गायली जातात त्यातून त्यातली सखोलता व





त्यांचा गर्भितार्थ, लौकिकार्थ कळतो. भजनात ख्रिस्ती श्रद्धेचे प्रतिबिंब पहावयास मिळते. हाती घेतलेल्या या कार्याबद्दल मी फादर अशोक यांचे मनापासून अभिनंदन करतो व शुभेच्छा देत परमेश्वराकडे प्रार्थना करतो की फादरांना व त्यांच्या सहकार्यांना आशीर्वाद देऊन 'गीत माझे अंतरमनीचे' द्वारे भविकांचे अंतरमन उजळून जाऊन परमश्वराचे गौरव होवो.

ख्रिस्तात सदैव आपला,

+बिशप लूर्ड्स डॅनियल
महागुरु
नाशिक कॅथोलिक धर्मप्रांत







**रांची जेझुईट सोसायटी**
**डॉ. कामिल बुल्के पथ**
**रांची ८३४००१,**
**झारखंड**

## भजन: व्यक्ती आणि समाज यांचे परमेश्वराशी नाते प्रकट करणारे माध्यम

कोणतीही कला अथवा वाङ्‌मय दोन मार्गांनी व्यक्त होते—प्रथम ते व्यक्ती किंवा समाजाचे अंतरंग प्रकट करते, दुसरे म्हणजे, त्या ठरावीक समाजातील स्थल—काल संदर्भातील सामाजिक नातेसंबंध प्रकट करते. काही परंपरांमध्ये पूर्वजांची थोरवी गाणारे लोक असत, ते पूर्वजांच्या महानतेचा गाऊन जप करीत गावोगाव फिरत. त्या जप करण्यामागे संदेश असे. देवाची स्तुती, आभारगीत वा महिमा व्यक्त करणारे भजन हे एक वेगळया प्रकारचा जप आहे. परमेशराची भक्ती, आराधना करण्याचा तो एक भाग आहे.

अगदी आरंभापासून जिथे जिथे ख्रिस्ती धर्म पसरला, युरांप, आफ्रिका, आशिया, किंवा अमेरिका ई., तो त्या भूमीतल्या संस्कृतीत मुळावला. त्यामुळे जगभर तो आध्यात्मिक व सांस्कृतिक दृष्टीने समृद्ध होत गेला. महारा  ट्रातील सामान्य लोकांनी भजन या प्राचीन गायन प्रकाराच्या माध्यमातून भक्ती गाण्याची वाट शोधली हे विशेष वाटते. बहुतेक भजनं बायबलमधील घटना, प्रसंगावर अधारलेली असून त्यांची रचना साध्या छंदात केलेली दिसते, आणि प्रामुख्याने शेती व्यवसाय असलेल्या ग्रामीण भागातील जनमानसांच्या विविध लोकगीतांच्या चालीवर गायली जातात. यामुळे 'अवतरणाचा धर्मविचार' (इन्कार्नेशन थेओलोजी) भजनाद्वारे आणखी पुढे नेला आहे. ख्रिस्त मानव झाला, या पुढे जाऊन त्याने विशिष्ट संस्कृतीत जन्म घेतला असे भजनातून दिसते. खरं तर या प्रदीर्घ परंपरेवर विविध अंगांनी सखोल संशोधन होणे गरजेचे आणि अगत्याचे वाटते.

महाराष्ट्राच्या विविध भौगालिक व सांस्कृतिक विभागातून भजनांचा संग्रह करुन अतिशय





परिश्रमपूर्वक हे संकलीत पुस्तक प्रकाशित करणारे फा. डॉ. अशोक ओहोळ, ये. सं. यांचे मी अभिनंदन व कौतुक करतो. मानववंशशास्त्राच्या दृष्टीकोनातून ह्या संकलनाला महत्व आहे. केवळ भावूक भक्ती म्हणून नव्हे तर त्यातून एकमेकांशी आणि परमेश्वराशी सामाजिक—सांस्कृतिक, ऐतिहासिक व धार्मिक नातेसंबंध स्पष्ट होतात यासाठीही संकलनाला अधिक महत्व आहे. या संहितेत प्रचंड भजन संख्या असल्यामुळे हे प्रकाशन एक मूलभूत काम ठरले आहे. ही संहिता अखिल महाराष्ट्रातील भजनी मंडळयांना उपयुक्त ठरेलच, पण एक दस्तऐवज म्हणून संशोधकांना तो ज्ञानाचा खजिना ठरेल. संशोधनाच्या बाबतीत अनेक विद्वानांना ही संहिता प्रेरणादायी ठरेल अशी माझी खात्री आहे. भवितव्यात तरुण मनांना उजाळा देणाऱ्या अशा अनेक कार्यकृती निर्मितीसाठी फा. डॉ. अशोक ओहोळ यांना माझ्या हार्दिक शुभेच्छा.

**डॉ. जोसेफ मारियानुस कुजुर, ये. सं.**
**प्रांताधिकारी**
**रांची येशूसंघीय धर्मप्रांत**





# मनोगत

सर्वसृष्टी निर्माणकर्त्या परमेश्वराच्या समीप जाण्याची तीव्र आस आणि अंत:करणातून त्याच्याशी संवाद साधण्याची एक प्रखर संवेदना भजनात आहे. एखादा माणूस कितीही नाठाळ असला तरीही ही संवेदना त्याला भिणतेच. ह्याच संवेदनेतून भजनाचा ध्यास अनेक वर्षांपूर्वी जडल्याचं आठवतंय. एक छोटेखानी शोधनिबंध लिहिल्यावर काळाच्या ओघात अंत:करणातली ही आस कधी दडून गेली हे समजलं नाही. संशोधनाच्या निमित्ताने ही सुप्त अवस्थेतील अंतरमनीची आस जागृत झाली. त्यातूनच भजन—भक्तीची जाण आलेल्या अनेकांच्या सहकार्याने भजनी मंडळांसाठी वेगवेगळया ठिकाणी प्रबोधन शिबिरे घेतली. मराठी ख्रिस्ती भजने ही विविध आविष्कारांनी नटलेली आहेत. कधी मानवी मनाचा शोध घेणारी तर कधी परमेश्वराचे गुणगौरव शब्दबद्ध करत त्याच्या स्तवनात आत्मभान विसरुन जाणाऱ्या भजनांची नाळ ख्रिस्ती प्रापंचिकांच्या अध्यात्माशी खोलवर जोडलेली आहे याची जाणीव झाली. त्याच जाणिवेतून शक्य होईल तिथे भजनांचे चित्रमुद्रण तर काही ठिकाणी ध्वनीमुद्रण केले. गावोगावी जाऊन हे सगळं करीत असताना मंडळयांकडून भजनाच्या वह्या गोळा केल्या. अगदी तळातून सुरुवात केल्याने भजन आणि भजनी मंडळयांचे वास्तव समजले, तसेच या प्रक्रियेतून अनेक मौलिक विचारही पुढे आले. पूर्वी बहुतांश भजनं मौखिक स्वरुपात असत. म्हणजे लोक स्मरणातून गायचे. साक्षरता वाढीबरोबर काही लोक वह्यांमध्ये भजनाच्या नोंदी ठेवू लागले. अनेकांच्या अशा नोंदी अपूर्ण, अर्धवट स्वरुपात असत. सध्याच्या काळातही काही मोजक्यांकडेच वह्या असल्याचं दिसलं आणि त्यातही भजनांची तोकडी संख्या आढळली. हे सगळं पाहून सर्वांच्या हातात समग्र भजनांचं पुस्तक देणे प्रामुख्याने महत्वाचे वाटले. त्यानुसार औरंगाबाद व अहमदनगर जिल्ह्यातल्या अनेक गावोगावी जाऊन मंडळयांकडून भजनाच्या वह्या मिळवल्या. वह्यांची संख्या वाढत गेली तशी अनेक संगणक—मुद्रण व्यवसायीकांशी सपर्क साधला. हस्तलिखिताकडे पाहून काम हाती घेण्यास सर्वांनी नकार दिला. यात भरपूर वेळ गेला. शेवटी, हे काम मी हाती घेतले आणि नेहमीची कामे सांभाळत सातत्याने पाठपुरावा करत पूर्ण केले. यामुळे भजनाचा प्रत्येक शब्द ना शब्द वाचता आला. काही भजनांतील साम्य व भेद लक्षात घेऊन संपादन करताना प्रत्येक भजन साधारणपणे दहा—बारा वेळा तरी नजरेखालून गेले त्यामुळे भजनातील सखोलता उलगडली. त्यातल्या शब्दरचनांचे आकलन झाले. भजनी मंडळांकडून उपलब्ध झालेल्या भजनांचा हा एक संग्रह आहे.







त्यांचा आशय, भाषा, शब्दरचना याचे मोल जाणून ते जसेच्या तसे राहील याचेकडे लक्ष दिले आहे. त्यामुळे काही ठिकाणी शब्दातील तफावत अथवा सरमिसळ झाल्याचे दिसून येण्याची शक्यता आहे. आपण सर्व अशा काही उणिवा अढळल्यास समजून घ्याल अशी आशा बाळगतो. भजनकारांचा शोध घेणे अत्यंत कठीण वाटले व ते वेळे अभावी शक्य झाले नाही. भजने गायली जावीत व त्यातून भक्तीचा आस्वाद सर्वांना मिळावा हा या संग्रहामागचा हेतू आहे. त्यातल्या त्यात अधिक प्रबोधन व्हावे यासाठी आवश्यक त्या भजनांना बायबलचे संदर्भ दिले आहेत. प्रत्येक भजनाच्या ताल—सुरांच्या रचना स्वरलीपीत उपलब्ध करुन देणे सध्या तरी शक्य नाही. सामान्यपणे प्रचलीत चालीतच भजन गायली जातात, त्यांची नियोजित अशी स्वरबद्ध रचना आढळली नाही. भजन अथवा कोणतेही गीत त्यातल्या भाव—भावनांचा आविष्कार अनुभवण्यासाठी अथवा त्यांचा आस्वाद घेण्यासाठी वेगवेगळया सुरावटीत (चालीत) गाता येते. शास्त्रीय संगीतातही एखादे गीत अनेक राग—रागीनीत सादर करता येते. भजनांच्या बाबतीत हेच म्हणावे लागेल. काही कवी—लेखकांनी वृत्तबद्ध मराठी ख्रिस्ती भजन रचना केल्या आहेत. त्यावर इथे भाष्य करणे विषयांतर ठरेल. ही भजन निर्मिती सामाजिक संदर्भात आणि बऱ्याचशा प्रमाणात सामूहिकपणे घडत असल्याने त्यांची रचना स्वैर आणि उत्स्फूर्त स्वरुपाची असते. कधी कध ी काही शब्दांचे ध्वनी साधर्म्य साधण्याचा प्रयास केलेला आढळतो. अंतरातल्या परमेश्वराविषयीचा भक्तीभाव व्यक्त करणे ही त्यामागची एकमेव धारणा व प्रमुख प्रेरणा असते. हे सारं करताना सहज सुलभ पद्धतीने लोक प्रबोधनही साधले जाते. शेतकरीगीते, ओवी अभंग, पाळणा असे पारंपरिक प्रचलीत गीतप्रकार वापरुन त्यांच्याच चाली भजन गायकांनी वापरलेल्या दिसतात. एकूणच व्यापक संत वाङमयात आणि मराठी संत वाङमयातही असे पारंपरिक गीत प्रकार वापरल्याचे आढळते. भजनाचा भाव ओळखून प्रज्ञावंत गायक त्यास सुरबद्ध करतात. भजनी मंडळांमध्ये असे अनेक प्रज्ञावंत सर्जनशील गायक—वादक आढळतात हे अभिमानाने सांगावेसे वाटते. म्हणून नवनिर्मितीचा अव्हेर करत काही लोकांचा भजनांच्या ध्वनीमुद्रीकांचा आग्रह यामुळे अनाठायी वाटतो.

लोक साहित्याच्या दिशेने विचार करत एक सामाजिक प्रक्रिया म्हणून मराठी ख्रिस्ती भजनाकडे दृष्टीक्षेप टाकल्यास त्या मागच्या सामूहिक मन:पटलावर समाज, श्रद्धा, ख्रिस्तप्रतिमा अशा अनेक संकल्पनांचे प्रतिबिंब अढळतात. तसेच भाषा, संस्कृती, धार्मिक, आध्यात्मिक, मानववंशशास्त्रीय, ई. अंगानी पाहिल्यास व्यक्ती—समाज—परमेश्वर

या त्रयींच्या चैतन्यशील नातेसंबंधातून निर्माण होणाऱ्या विविध संकल्पनांची अनेक प्रतिबिंबे अढळळून येतील. कालपरत्वे या सर्वांचा शास्त्रशुद्ध पद्धतीने मागोवा घेतला जावा आणि विशिष्ट ऐतिहासिक अनुभवातून गेलेल्या समाजमनाचा शोध घेत मराठी ख्रिस्ती भजनावर समृद्ध वाङ:मय निर्मिती व्हावी असे मनोमन वाटते, यासाठी विद्वानांना व संशोधकांना हा संग्रह दस्तऐवज ठरावा. हा या संग्रहामागचा दुसरा महत्त्वाचा उद्देश आहे.

हा भजन संग्रह भजनी मंडळांच्या हाती देताना मनस्वी आनंद होत आहे. या कामात अनेकांचे सहकार्य लाभले. सर्वप्रथम ज्या भजनी मंडळांनी अथवा व्यक्तिंनी ह्या संग्रह निर्मतीसाठी आपल्या वह्यांच्या छायाचित्रित प्रती दिल्या त्या सर्वांचे मी आभार मानतो. याबरोबरच नाशिक धर्मप्रांतांचे महागुरु, अनेक धर्मगुरु तसेच ज्या धर्मगरुंनी व प्रापंचिकांनी  या संहिता प्रकाशनकामी आर्थिक सहाकार्य केले त्या संर्वांचे मन:पूर्वक आभार मानतो.  त्यामुळेच अत्याल्प किंमतीत ही संहिता उपलब्ध करुन देता आली. तसेच आमचे पुणे येशू संघीय बांधव या सर्वांचे भरपूर सहकार्य लाभले. त्यांच्या कृपाशीर्वादाने हे काम पूर्ण करता आले. त्यांचे तसेच सहकार्य केलेल्या सर्व कॅटेकिस्ट व भजनी मंडळांचे मी मन:पूर्वक आभार मानतो. आपली हातातली कामे बाजूला ठेवून आर्टिस्ट सयराम वाघमारे यांनी भजनी मंडळाचा सुबक लोगो तयार करुन दिला त्यांचे आभार मानावे तितके थोडे आहेत. या व्यतिरिक्त ही संहिता तयार करण्याच्या कामी अनेकांचा हातभार लागला आहे. सर्वांचा नामोल्लेख करणे शक्य नाही. त्या सर्वांचा मी ऋणी आहे. कॅथोलिक प्रेस, रांची (झारखंड) येथील सर्व येशू संघीय आणि कारागिरांनी विशेष लक्ष देऊन छपाईचे काम लवकरात लवकर करुन दिल्याबद्दल त्यांचेही मन:पूर्वक आभार मानतो.

फा. डॉ. अशोक ओहोळ, ये.सं.
झेवियर समाज सेवा संस्था,
रांची, ८३४ ००१ झारखंड.

संत इग्नाती लोयोला यांचा सण
३१ जुलै, २०१८

## अनुक्रमणिका









# वंदन

### १. वंदन

आधी वंदन ख्रिस्ता तुला वंदन करितो तुला
हा दाविदाचा पुत्र वंदन त्रैक्या तुज
नमन तव पाया वंदन आमुचे जगदिशाला
घे प्रभू वंदन घे विमला

### २. आधी वंदन ख्रिस्ता तुला

आधी वंदन ख्रिस्ता तुला तू आहे जगा वेगळा ।। धृ ।।
पवित्र आत्म्याचा गर्भ तुला मारीया उदरी पिंड वाढीला
पाप्यां तू तारायाला आला ।। १ ।।
पूर्व दिशेला तारा तुटला मागी लोकांनी तो पाहिला
किती आळवू मी ख्रिस्ता तुला ।। २ ।।
मिळे शांती मनाला, दीनांसाठी तो दीन झाला
स्तुती सुमनांच्या गुंफूनी माळा प्रेमे घालू ख्रिस्ताच्या गळा
किती आळवू मी ख्रिस्ता तुला ।। ३ ।।

### ३. नमन देवा

नमन देवा तव गुरुराया रे रमुया सारे तुझ्या भजनी ।। धृ ।।
असे मालक तो जगाचा रक्षण करितो तुमचा माझा
तुची सारे ।। १ ।।
आरंभ करिता मी भजनाचा ठेवून मस्तक तव चरणाला
गाऊ सारे एक मनाने ।। २ ।।

### ४. वंदन प्रभू देवराया

वंदन करितो तुला प्रभू देवराया प्रभू देवराया
भाव भक्ती नमितो देवा आशीर्वाद द्यावा ।। धृ ।।
प्रभू दयेचा तू सागर सर्व सुखाचे तू आगर





घाल आम्हावरी पाखर फुटावा प्रेमरुपी पाझर
तन मन धन अर्पितो तुला देवराया
भाव भक्ती नमितो देवा आशीर्वाद द्यावा ॥ १ ॥
गेला क्रुसी आम्हासाठी प्रिती तुझी फार मोठी
तूच एक येशू राजा दीनांचा विसावा
भाव भक्ती नमितो देवा आशीर्वाद द्यावा ॥ २ ॥

### ५. वंदन करितो

वंदन करितो तुला ख्रिस्त नाथा चरणी तुझ्या रे ठेवितो माथा ॥ धृ ॥
दीन दयाळा तूची अनंता सर्व जगाचा तारणकर्ता
लाभतो निवारा तुला आळविता ॥ १ ॥
दे शक्ती धीर प्रभूजी तूच आम्हा
तुझे गायन करण्याला दीन दयाळा तूची अनंता
सर्व जगाचा तू तारणारा ॥ २ ॥

### ६. हा दाविदाचा पुत्र

हा दाविदाचा पुत्र स्वागत गीत गातो
सुमनांची काव्यमाला प्रभू चरणी वाहतो ॥ धृ ॥
ही पवित्र्यांची भूमी हो भूमी साधूसंत आले हो जन्मी
तयाच्या पदी हो माथा झुकेल गाता गाता हो गाता
राजाधिराज पुत्र भजनाने आळवितो ॥ १ ॥
उधळू गुलाल रंग हो रंग सोहळयात व्हावे दंग
बाजूने देवदूत मध्ये माउलीचा रथ हो रथ
सिंहासनी रथाच्या श्री ख्रिस्त बोलवितो ॥ २ ॥ .

### ७. नमन तव पाया

नमन तव पाया हे प्रभुराया ॥ धृ ॥
तुझ्या चरणाची धुळं त्याने जाई पाप मूळं ॥ १ ॥
तुझ्या वचनचा गंध प्रेमाने गाईल माझा कंठ ॥ २ ॥





## ८. वंदन आमुचे जगदिशाला

वंदन आमुचे जगदिशाला गाऊ आम्ही प्रभू नामाला ।। धृ ।।
ताल सुरांचा घालुनी मेळ उंचउया प्रभू नामाला
तोल न जावा, श्रद्धा न ढळता सुबुद्धी दे आम्हा दीनाला ।। १ ।।

## ९. घे प्रभू वंदन घे विमला

घे प्रभू वंदन घे विमला
बोबडे बोल काव्यसुमने ऐकवूया प्रभू ख्रिस्ताला
प्रसार कार्य करण्या प्रभूचे सुबुद्धी दे आम्हा दीनाला
घे प्रभू वंदन घे विमला मन दुर्बल हे अर्पी तुला ।। धृ ।।
परात्परा तू हृदयी शोभला जैसा गगनी तारा
अंध जीवा तू प्रकाश दिधला ऋणी असे अबला ।। १ ।।
तू परमेश्वर जग उद्धारक तुजशी अमुचे नाते
पिता स्वामी पुत्र तुझा मी पदी तुझ्या रमला ।। २ ।।
मेघारुढ तू होऊनी येशील भक्त जन ताराया
स्मृती अमुची राहो तुजला सदया दीन दयाळा ।। ३ ।।

## १०. प्रभूचे आम्ही भजनकारी

प्रभूचे आम्ही भजनकारी
जगा सांगण्या शुभवार्ता ही आमची कामगिरी
प्रभूचे आम्ही भजनकारी ।। धृ ।।
करो कोणी अजाण टीका हाती आमच्या धरुनी एका
फटके आमुच्या हेच विवेका सांगू नका परी
प्रभूचे आम्ही भजनकारी ।। १ ।।
प्रभु ख्रिस्ताची उत्तम शिकवण
जाऊन सांगू सर्व जगाला सार्वकालीन जीवन जगण्या
सांगू जगा परी प्रभूचे आम्ही भजनकारी ।। २ ।।





## ११. **पिता पुत्र आणि परमात्मा**

पिता पुत्र आणि परमात्मा त्रैक्याच्या या खुणा तुम्हाला
गातो ही वंदना ।। धृ ।।
इश पिता तू करुणानिधी तो या जगताचा उद्धारक तू
नाम तुझे हे घेत मुखाने रमलो तव चिंतना ।। १ ।।
धवल फुलांच्या घेउनी माळा अर्पण करण्या तव चरणाला
नाम तुझे हे घेत मुखाने रमलो तव भजना ।। २।।

## १२. **करी वंदन पदकमली**

प्रभुजी प्रभुजी प्रभुजी करी वंदन पदकमली
विमल सुचि समर्थ अनाथा भगवान विना नाही ।। धृ ।।
एकच तूच पात्र असशी आसनी सिंहासनी बसशी
भक्त विणेवरी तव गुण गाई ।। १ ।।

## १३. **प्रणाम कोटी**

प्रणाम कोटी कोटी तुला काव्य फुलाच्या नव कल्पना
जगत्पाला प्रभुला करू वंदना जगतत्पाला प्रभुला ।। धृ ।।
सोनेरी झाली धरती आली भक्तीसिंधुस भरती
प्रितीच्या कळया फुलू लागल्या
रान पशू सारे करी गर्जना ।। १ ।।
स्वर्गाच्या बादशहाला आज वंदू या संत दूताला
विद्वाना, थोरजना मागू आशीर्वाद ।। २ ।।

## १४. **वंदन त्रैक्या तुज**

वंदन त्रैक्या तुज जगत्पाला दे तव आशीर्वाद आम्हा दीन बाळा ।। धृ ।।
भग्न अनुतापे केली मन माला सुमनांची
देहपात्र माझे घेउनी आलो तुझ्या पायी
अर्पितो तुझ्या दयाळा कंठी प्रेममाला ।। १ ।।
घेउनिया बहुमोल नवजन्मरुपी तेल
पेटवूनी आत्मज्योत ठेवियली तेवत
स्तवू आम्ही नित्य तुला करी मनासवे ।। २ ।।





## १५. देवा मंगल पाय तुझे

देवा मंगल पाय तुझे ते पवित्र वरदान घेतो ।। धृ ।।
पवित्र व्हाया तवपदी वसता सेवक तव मी गातो
प्रीती श्रद्धा प्रेमगंध हे तुझ्या पदा लवितो ।। १ ।।
दर्शन करिती पवित्र जन तव मंगल गीत हे गातो ।। २ ।।

## १६. रात्रंदिनची संत मंडळी

रात्रंदिनची संत मंडळी देवा करी वंदन
त्याजला आहे हे वंदन ।। धृ ।।
संकटामध्ये दीप लाविला मोक्ष प्राप्तिचा मार्ग दाविला
करुया देहाचे अर्पण ।। १ ।।
संकटामध्ये उड्या घेतिल्या रक्ताचे हो सडे सांडीता
मिळवूनी मोक्ष प्राप्ती तया त्याजला आहे हे वंदन ।। २ ।।

## १७. ईश्वरा धाव आता

ईश्वरा धाव आता कंठ माझा सुकला
ईश्वरा इश्वरा इश्वरा ।। धृ ।।
समुद्रवरती वादळ सुटले तारू माझे डगमग डोले
वादळाला शांत करण्या धाव रे ।। १ ।।
सैतान मजला भारी छळतो कूमार्गाने मजला नेतो
सैतानाचा नाश करण्या धाव रे ।। २ ।।

## १८. खऱ्या प्रेमाने गायी मना तू

खऱ्या प्रेमाने गाई मना तू तारक ख्रिस्ताला मान तू ।। धृ ।।
बसलाशी तू चरणी त्याच्या गुण त्याचे गावया
उभा असे तो पुढे तुझ्या रे जाणी तुझ्या भावना ।। १ ।।
वर्तन आपुले शुद्ध असुदे पहावया जगताला
पाहूनी त्यांनी तुझ्या शिलाला सुधारावे आपणाला ।। २ ।।
मानव देह धरुनी जगी तो तुझ्याचसाठी आला
तुझ्याचसाठी खांबी गेला विसरु नको त्याजला ।। ३ ।।





# भक्तीभाव

## १९. प्रभू हे जीवन अमृत रे

प्रभू हे जीवन अमृत रे तुजवीन जाऊ कुठे रे ।। धृ ।।
जीवनाच्या गोष्टी तुजपाशी आहे तुजवीन सारे खुटे ।। १ ।।
बहू यज्ञ केले धन अर्पियले तरी पापदंड ना सुटे ।। २ ।।
अंत:करण हे बहू तुजवीन कैसे कुठे ।। ३ ।।
जरी सर्व पृथ्वी धुंडाळीली मी तरी शांती नाही कुठे ।। ४ ।।

## २०. लागो तुझ्यापदी आस रे

घडोघडी माझी लागो तुझ्यापदी आस रे
तू ऐक रे पातक्यांची पश्चतापी हाक रे ।। धृ ।।
जुन्या वस्त्रापरी देह माझा जीर्ण झाला सांगू कुणा
तूच करी बापा अंतरी माझ्या नव्या वस्त्रा
लागला आत्म्या तुझा ध्यास रे ।। १ ।।
हाक ऐकलीस माझी वरा सकल जगाच्या दिनकरा
विणलेस ख्रिस्ता अंतरी माझ्या नव्या वस्त्रा
लागला आत्म्या तुझा ध्यास रे ।। २ ।।
दास ख्रिस्ताचा दिसतो सदा हा नव जीव आत्म्याचे वस्त्र जना
तूच करी बापा अंतरी माझ्या नव्या वस्त्रा
उद्धारू मुखे तुझे नाम रे ।। ३ ।।

## २१. ख्रिस्ताचे लेणे ल्याले गं

ख्रिस्ताचे लेणे ल्याले गं हृदयाचे मोल ।। धृ ।।
प्रार्थनेचा लावा टिळा हो टिळा शोभेल असा कपाळा
मोक्षाचे काजळ घाला गं हृदयाचे मोल ।। १ ।।
आरशात पाहा न्याहाळून शास्त्र ग्रंथ पुढे ठेवून
मोक्षाचे काजळ घाला गं हृदयाचे मोल ।। २ ।।
दास म्हणे करावी सेवा हो सेवा
मिळे भक्तीने हा विसावा ख्रिस्तात लीन राहवे गं ।। ३ ।।





## २२. मनी भरला ख्रिस्त रंग

मनी भरला ख्रिस्त रंग तया पायी झालो दंग ।। धृ ।।
तुम्ही या हो सारे मिळूनी देहभान विसरुनी
नाही होणार तुमचा भंग ।। १ ।।
एक गजर स्मरणाचा टाळ वाजे आणि विण्याचा
नाही होणार तुमचा भंग ।। २ ।।

## २३. संपले रे येणे

संपले रे येणे जाणे आणि ते प्रेमाचे नाते
जिव्हाळयाचे कोण होते
माझे वंदन त्याजला करितो मी
आज हे हो ।। धृ ।।
भूतकाळी जरा बघ रे वर्तकाळी काय घडले
भाकिताचे कोण जाणे हो
सांग रे सांग रे ।। १ ।।
आस माझ्या मनी हीच रे सर्वांचे व्हावे चांगले
काळाच्या ओघात ख्रिस्तदास हो
तोच रे तोच रे ।। २ ।।

## २४. वेड लागले देवा तुझे

वेड लागले देवा तुझे मला रे
मनात सदा माझ्या राही रे ।। धृ ।।
येशू काना गावी गेला मारीया होती त्या लग्नाला
तेथे पाण्याचा द्राक्षारस केला रे ।। १ ।।
येशू डोंगरावर गेला समुदाय होता त्या जागेला
पाच भाकरी पाच हजाराला रे ।। २ ।।
अडतीस वर्ष दु:खणेकरी पडला होता खाटेवरी
खाट उचलाया शक्ती दिली त्याला रे ।। ३ ।।
मारीया मार्था यांचा भाऊ लाजारस हा मेला
तीन दिवसांनी जीवंत केला रे ।। ४ ।।





## २५. जोवर देही प्राण

जोवर देही प्राण प्रभूचे गाईन मी गुणगाण ।। धृ ।।
प्रभो गुणगाया उचित मी जरी जगता
पतिता मी जरी ठेवूनिया शिर येशूपदावरी गाता
भजना द्या मान ।। १ ।।
न लगे मजला साथ कशाची न लगे जरुरी श्रोतजनांची
गाता गाणी जगदिशाची घुमतील द्विज कुलतान ।। २ ।।
भूवर येतील स्वर्गातील दूत सत्यसुरांचा विणा वाजवीत
जय जय येशू गर्जत गर्जत करतील दूर सैतान ।। ३ ।।
ख्रिस्त जगाचा तारणदाता सदनी नयनी उठता बसता
नाम प्रभूचे जन हो घेता होईल मी बेभान ।। ४ ।।

## २६. पतित जनांच्या त्रात्या

पतित जनांच्या त्रात्या माझ्या प्रभुराया गुरुराया ।। धृ ।।
ख्रिस्त सदया माझ्या प्रभुराया ।। १ ।।
पतित जनांच्या दात्या
पतित जनाच्या दात्या माझ्या प्रभुराया ।। २ ।।

## २७. मारियेच्या नंदना

मारियेच्या नंदना तुझी करीतो मी प्रार्थना ।। धृ ।।
हा दुष्ट सैतान छळ करिता राहिना ।। १ ।।
पश्चतापी माझ्या मना बळ का रे देइना ।। २ ।।

## २८. वाजवूया टाळ

वाजवूया टाळ विणा आणि मृदंग
सुमधूर गीत गाऊ आळवू अभंग (२) ।। धृ ।।
देव असुनी तो मानव झाला
शिकविण्या नम्रपणा साऱ्या जगाला
नम्रता धारण करू (२) करू सत्य कार्या ।। १ ।।
खरा तारणारा माझा प्रभू कैवारी
नम्रता धारण करू (२) करू सत्य कार्या ।। २ ।।





## २९. भजनात मन रंगले

प्रभुच्या भजनात मन रंगले
रंगले प्रभुच्या भजनात मन रंगले ।। धृ ।।
संसाराची चिंता सगळी म्हणता प्रभूला क्षमा करावी
शास्त्र वचन हे योहानाचे काय जगी उरले ।। १ ।।
एकच इच्छा माझ्या हृदयी आस अंतरी दुसरी नाही
जीवन आशा राहते कसली काय जगी उरले ।। २ ।।
येशू माझा मी येशूचा उरला आता क्रोध जगाचा
मरण मागावे प्रभुच्या पायी वेड मनी भरले ।। ३ ।।

## ३०. दु:खी कशाला

दु:खी कशाला होता सुखी कुणीच नाही
कवटाळीले मृत्युला मानवाने ठायी ठायी ।। धृ ।।
हसणे हे क्षणभराचे कायमचे रडणे दिधले
जन्मी हे मानवाला जन्मात देती ग्वाही ।। १ ।।
मोह दावी मोहमाया मायेच्या ह्या बाळा रे
बाजार दो घडिचा व्यर्थ सारे काही ।। २ ।।
ओझे या संसाराचे वाहून तूच थकविले
विश्वासाच्या आशेने मृत्युची वाट पाही ।। ३ ।।
अभ्यासून हे जीवन उत्तर मिळेल शुन्य
न्याहळून जीवाला दास पहात राही ।। ४ ।।

## ३१. दोन सूत

दोन सूत उभा मी या भूमीच्या वरी
सहा फूट जायचे मला माझ्या घरी ।। धृ ।।
बाळपणापासूनी मला सांभाळिले
अन्न पाणी देवून मला पोशिले
किती प्रभू तू उपकारी ।। १ ।।
जे मी कमविले जे मी गमविले
प्रभूने जे दिधले ते मला न कळे
हीच पुरी झाली माझी पापवारी ।। २ ।।





### ३२. दे मज वरदान

तुझिया नामे लागो मम ध्यान
दे मज वरदान प्रभू रे दे मज वरदान ।। धृ ।।
बालपणी मी खेळ खेळलो मानव कर्मी मग्न जाहलो
कधी नाही केले तुझे ध्यान ।। १ ।।
या संसारी शिणली काया दृढ धरी तव मी प्रभुराया
विसरलो देवा तुझे नाम ।। २ ।।

### ३३. प्रभू रायाचा छंद मनाला

प्रभू रायाचा छंद मनाला गुण गाईन मी प्रभू पाहीन मी
किती वाटे धन्य मनाला ।। धृ ।।
भव पाश सुटेना जीवा रे सहवास तुझा मज व्हावा रे
विनंती ही तुझ्या चरणाला ।। १ ।।
मन भक्ती रसात न्हाऊ दे सेवेसाठी तुझ्या मज झिजू दे
धन्य होईल जगती जगाया ।। २ ।।

### ३४. परमेश्वर किती चांगला

परमेश्वर किती चांगला चांगला
त्याचा अनुभव घेऊन पाहवा ।। धृ ।।
अडीनडीला संकट समयी मारीता हाक धावत येई
धावा करूनी पहावा त्याचा अनुभव घेऊन पाहवा ।। १ ।।
इच्छिले असता मनी जे काही प्राप्त होईल विश्वास पायी
विश्वास धरुनी पाहवा त्याचा अनुभव घेवून पाहवा ।। २ ।।

### ३५. बायबल हातात घेऊ द्या

बायबल हातात घेऊ द्या की रं
मला बी देवळाला येऊ द्या की ।। धृ ।।
वेडा राहिलो मी आजवर सैतानाचा झालो चाकर
गुन्हा माझा कबुल होऊ द्या ऽऽऽ ।। १ ।।
मी जाईल प्रभू मंदिरी ओझे पापाचे घेऊन शिरी





मला तुमच्यात सामील होऊ द्या ऽ ऽ ऽ ।। २ ।।
क्षमा पापाची येशू करी सर्व जगाला तोच तारी
मला प्रभुचा सेवक होऊ द्या ऽ ऽ ऽ ।। ३ ।।

## ३६. प्रभुरायाचे नाम

प्रभुरायाचे नाम स्मरण केले पाहिजे
तन मन धन अर्पण त्याला केले पाहिजे ।। धृ ।।
दु:ख संकटात येईल धाऊन पाप दाग तो काढीन धुऊन
अशा प्रभुचे नाम स्मरण केले पाहिजे ।। १ ।।
पाहून प्रीती मनाला देईल शांती
सुखी जीवनाला देईल प्रीती अशा प्रभुचे नामस्मरण ।। २ ।।

## ३७. तु माझा मेंढपाळ

तू माझा मेंढपाळ देवा ऽ ऽ ऽ तू माझा मेंढपाळ ।। धृ ।।
तुझ्याकडे मी देवा पाहत राहतो
तव भेटीला जीव अतुरतो, शरण तुला जाणार ।। १ ।।
वारा वेगाने वाहे जैसा
तोवरी प्रभुजी येईल तैसा भजनी तुझ्या रमणार ।। २ ।।

## ३८. शोधुनी थकलो देवा

शोधुनी थकलो देवा, मी सर्व काही
प्रभुवीन मजला सुख शांती नाही ।। धृ ।।
पाहिली जगाची दुनियादारी
सुख नाही कोठे मायेच्या बाजारी
सन्निध प्रभूजी नित्य तू राही ।। १ ।।
असता दयेचा तू सागर
केली प्रीती तू आम्हा पाप्यांवर
सदासुखी ठेव देवा तुझ्या पंखाखाली ।। २ ।।
धन्य धन्य तू आहे प्रभूजी
केली प्रीती आम्हा पाप्यावरी
सदासुखी ठेव देवा तुझ्या पंखाखाली ।। ३ ।।





### ३९. लावूनिया ध्यान

लावूनिया ध्यान लावूनिया मन घेउनी नाम प्रभूरायाचे ।। धृ ।।
जोडुनिया हात असावे सावध स्वीकाराया ओझे प्रभुरायाचे ।। १ ।।
छातीवर काढू क्रुसाची ही खूण करावया पूर्ण देव इच्छा ।। २ ।।
मुखातुनी व्हावी ख्रिस्ताची सुवार्ता काढू क्रुस चिन्ह त्यावरी ।। ३ ।।

### ४०. तुझ्या नामासाठी

तुझ्या नामासाठी बनलो मी वेडा प्रपंचाचा गाडा माझ्या पाठी ।। धृ ।।
प्रपंच झापडी पडे घडोघडी तेणे तुझी गोडी नच लागे
तेणे तुझी गोडी नच लागे ।। १ ।।
प्रपंचाची हाव नाहीच कामाची हानी त्या आत्म्याची स्वर्ग लोकी
हानी त्या आत्म्याची स्वर्ग लोकी ।। २ ।।
सर्वांच्या पायापाशी जागा शेवटली ठेव राखुनी ख्रिस्ता माझ्यासाठी ।। ३ ।।
दास म्हणे बापा तूच दयाघन चरणी लोटांगन घालीतो मी
चरणी लोटांगन घालीतो मी ।। ४ ।।

### ४१. ख्रिस्त माउली

ख्रिस्त माउली आमुची ख्रिस्त गुरुमाउली ।। धृ ।।
पाप ताप त्रस्त जनांची अविनाशी सावली ।। १ ।।
हाकेसरशी मज ताराया स्वर्गामधुनी धावली ।। २ ।।
पश्चतापे दुःख भार न्याया नीज शिष्या पावली ।। ३ ।।
मजपाप्यास्तव स्तंभावरच्या मरणा सरसावली ।। ४ ।।

### ४२. मी गातो येशुचा अभंग

मी गातो येशूचा अभंग लागला येशू तुझा छंद ।। धृ ।।
सुवार्ता घेउनिया हाती सांगतो सर्व जगाला ती
झालो नामात दंग ।। १ ।।
कहाणी येशू जन्माची वार्ता ही आनंदाची
झाला आनंदी आनंद ।। २ ।।
स्वर्गी गौरव येशूचा जगी आला देव शांतीचा
स्वर्गी झाला आनंदी आनंद ।। ३ ।।





## **४३. माझ्या प्रिय प्रभूची**

माझ्या प्रिय प्रभूची मी वाट पाहते रे ॥ धृ ॥
प्रभूला मी शोधिते प्रभूला मी शोधिते
प्रभुवीन मला काही कळेना कांमधदा मला सुचेना
माझ्या प्रभू तू ये रे ॥ १ ॥
वल्हांडणाच्या सणी प्रभू पाहिला का कोणी
माझ्या प्रभू तू ये रे ॥ २ ॥
हरणी मी पाडसाला चुकले मी या क्षणाला
माझ्या प्रभू तू ये रे ॥ ३ ॥

## **४४. तेजस्वी सुंदर**

तेजस्वी सुंदर रूप हे मनोहर
राहो सदा निरंतर श्रद्धाही माझी हो ॥ धृ ॥
आणि काही इच्छा नाही आमुचिया
तुझे गोड नाम देवा सर्व त्रिभुवनिया ॥ १ ॥
एका तरी संगे एकरूप झालो
आम्ही प्रभूजीच्या भजनात न्हालो ॥ २ ॥
दास म्हणे तुजसारिखा दयाळा
धुंडिता सकळ विश्वे नाही ॥ ३ ॥

## **४५. सुख तेथे दुःख**

सुख तेथे दुःख, दुःख तेथे सुख
एक ते अनेक, अनेक हो ॥ धृ ॥
दुःख तेथे भक्त, भक्तापाशी देव
जाणा एकमेका भेदभाव नाही ॥ १ ॥
तरू तरी छाया छाया तेथे तरू
गुरू पायापाशी गुरुशिष्य ॥ २ ॥
मातीची भूमी भूमी रुपी कण
आत्म्याठायी गुण गुणी भासे ॥ ३ ॥





## ४६. भ्रमुनी थकलो

भ्रमुनी थकलो दे मज दान
दयाळा दे मज दे वरदान ।। धृ ।।
पापे माझी अंधाराची संगत मजला सैतानाची
ज्ञान दे गाण्यात तव गुणगान ।। १ ।।
प्रभू परमेशा विनंती माझी जीवन जगण्या साधना तुझी
ज्ञान दे गाण्यात तव गुणगाण ।। २ ।।

## ४७. भक्ती भावे

भक्ती भाव ज्याच्या मनी लाभे मानवाला
लाभतो मनाला सुख आनंद ।। धृ ।।
भक्तीत तुझ्या ख्रिस्त राया होतो सारे दंग
म्हणे दुष्टतेचा होतो सारा भंग
आज्ञा पालनाचा तुझ्या लागू दे रे छंद ।। १ ।।
स्वर्ग सोडुनिया आला तू या जगती
आश्वासन दिली आम्हा नेईल स्वर्गाशी
स्वर्गीय सुखाचा तुझ्या होतो मना हर्ष ।। २ ।।

## ४८. आस अपुरी

आस अपुरी कर रे पुरी होउनी कैवारी
नाम तुझे घेण्या देवा दास हा पुकारी
भोळी भक्ती माझी स्वीकारी
द्वारी तुझ्या आले अनाथ भिकारी ।। धृ ।।
आस धनाची नव्हे मोठेपणाची नव्हे
ख्रिस्त मोठेपाणाची नव्हे
नव्हे करण्याची मला निंदा कुणाची
नको रंगमहाल मजला नको शान
राजशाही थाट नको कोणाचा अधिकार ।। १ ।।
गोडी लागू दे तुझ्या भजनाची
देवा तुझ्या भजनाची





संगत लागू दे तुझिया प्रीतीची
ख्रिस्ता तुझिया प्रीतीची
सत्याने चाले त्याला दुनिया झिडकारी
किडली आंबराई असेही ललकारी ।। २ ।।
भक्ती गीत गाण्या दास तुझा रमला
ख्रिस्तदास तुझा रमला
तव जप घोषाचा नाद हा दुमदुमला
येउनी या बसला तुझ्या चरणा ।। ३ ।।

## ४९. जा रे जा पाखरा

जा रे जा पाखरा उडोनी अंतरा
माझ्या ख्रिस्ताला संदेश दे हा जरा ।। धृ ।।
कोणी तूप रोटी कोणी अर्धपोटी
नेत्र उघडी जरा पाहा वळोनी त्वरा ।। १ ।।
कोणी रंगमहाल कोणी पर्णकुटी
नेत्र उघडी जरा पाहा वळोनी त्वरा ।। २ ।।

## ५०. तव भक्तिचा वेडाखुळा मी

तव भक्तिचा वेडाखुळा मी लागे मना हूरहूर
प्रभुवरा प्रितीचे सूर, प्रभुवरा ।। धृ ।।
अथांग पाणी सागर साजे
जल थेंबापरी जीवन माझे
जेव्हा गातो मी तव कवना येई भक्तीला पूर ।। १।।
पारध जाळी मृग अडकले
लोभी मन मम पापी जाहले
मी पापी तू मुक्तीदाता छाया असू दे जरूर ।। २ ।।
पाप्यांसाठी तू जगती तारक झाला क्रुसावरती
दास वदे बा तुजवीन ख्रिस्ता जीवन हे क्षणभंगूर ।। ३ ।।





## ५१. हे रूप ईश्वराचे

हे रूप इश्वराचे हे रूप ख्रिस्त साचे
सर्वांस हा प्रकाश प्रकाश दावी तया प्रभूने ।। धृ ।।
प्रभुराज जगती आले जग सारे धन्य झाले
जाळीत पाप बुध्दी उघडीले हृदय तुमचे ।। १ ।।
सर्वाहुनी पवित्र हा एक देवपुत्र
गाईल गोड नामे गाईल गोड नामे
मजकडे जो येईल तया विसावा देईल ।। २ ।।

## ५२. मसिहा परतुनी ये भुवरी

मसिहा परतुनी ये भुवरी
रंक राव विसरले देव उलटी तऱ्हा हो न्यारी ।। धृ ।।
या मानवा दिले जीवन किती हे मोठेपण
फेड करण्या आयु संपन्न अन मोलाचे दान
मारियेला त्या सांगुनी जन्म घे उदरी ।। १ ।।
सत्य मोह खोटी आघाडी देवा ना खपले
तया पोटी सदा दुष्काळ नेत्र का झोपले
ते चमत्कार दाव एक बार होउनी कैवारी ।। २ ।।
तुझ्या भक्तीत झालो दंग दाव तुझा दृष्टांत
पाहू दे जना लाजव नयना मानवी रूपात
ह्या दासाची तुला बघण्याची इच्छा कर ही पुरी ।। ३ ।।

## ५३. जीवनाच्या सागरात

जीवनाच्या सागरात सुख दुखाची लाट
नाव माझी डोलते पाण्यावरी
वल्हव रे नाव माझी वल्हव रे ।। धृ ।।
कधी सुखाला येते भरती कधी दु:खाला लागे ओहोटी
पडे दु:खाचा डोंगर डोईवरी, पडे दु:खाचा ।। १ ।।
कधी सैतान वारा येतो धक्का हृदयाला देऊन जातो
पडे पापांचा डोगर डोईवरी, पडे पापांचा ।। २ ।।





प्रभू येशुची कृपा होई होडी माझी किणारी जाई
सुकाणु आहे त्याच्या करी आहे सुकाणु माझ्या त्याच्या करी ।। ३ ।।

## ५४. विसरू नका हो प्रभुरायाला

विसरू नका हो प्रभुरायाला सोडून जगमाया
क्रुसावरचे मरण पत्करुन शिकविले करण्यास दया
झिजविली आम्हासाठी आपली काया ।। धृ ।।
त्याने प्रीती केली जगावर तुम्हा आम्हा सर्व
त्याने केले बहु उपकार पडे आम्हास त्याचा विसर
आदाम हवाचा त्या शापाला लागे तू जगा या ।। १ ।।
दया क्षमा शांतीचे दिले तुम्हास त्याने दान
वचन पाळीताना राहा सदा सावधान
विसरू नका रे प्रभू वचनाला शेजाऱ्यावर कर माया ।। २ ।।
जरी उघडीले बुद्धी हत्यार ना होशिल कधी तू थोर
जरी गेलास विज्ञान युगात नाही पडे प्रभू कमजोर
दास लिहितो स्वर्गी पित्याला पाठव पुत्रा भेटाया ।। ३ ।।

## ५५. पाउले चालती

पाउले चालती मंदिराची वाट सुखाचे हे सुख प्रभू नाम मुख ।। धृ ।।
मनाच्या मंदिरा वास सैतानाचा तोडिता जहाला तुची ख्रिस्ता ।। १ ।।
आत्म शुद्धतेचे घेउनिया अस्त्र हाटवी दुष्टाच्या मृत्यूच्या आर्ता ।। २ ।।
मनाचे मंदिर देऊ केले ख्रिस्ता पाप केर सारा टाकूनी तो द्वारा ।। ३ ।।
कदापि न येवो गंध पापाचा तुलाची बैसऱ्या मनाच्या मंदिरा ।। ४ ।।

## ५६. तुझीच गा योजना

तुझीच गा योजना मानू कैसे दु:खा
तारणाचे सुख बा आहे तीत मजला ।। धृ ।।
जरी जगी झाले देवा माझे हाल भारी
तुझ्या नामा करी विनवणी त्याला ।। १ ।।
माझ्यावर माझा नाही जरा अधिकार





तुझेच मंदिर हाच देह माझा तारणाचे सुख बा ।। २ ।।
कोणी नाहीं होतो स्वत: जगी पुण्यवान
तुझेच हे दान दे तू मला ते ख्रिस्ता
तारणाचे सुख बा ।। ३ ।।

## ५७. ज्या ख्रिस्ताने

ज्या ख्रिस्ताने प्याला दिधला जगा रे
अहंतेला नाही त्यात जरा ठाव रे ।। धृ ।।
व्हावा नि मी त्या सरिखे आदी नराशी वाटे
तोचि केली वस्ती अंतर्यामी अहंकाराने
वाढवूनी इच्छाशक्ती स्पर्शियले ज्ञानाते
हरपे दिव्य दृष्टी ग्रासियले अहंकाराने
तया शोधाया पुन्हा नरे मार्ग काढिले
अन्य तत्व कर्म धर्म जगी स्थापिले ।। १ ।।
मानवी धर्म तत्व मानवास प्रिय सदा
निज कर्मे करुनी जाई आसक्तीच्या पंथा
माझा मीच देव झालो टाहो फोडूनी सांगे जगा
परी झाला मृत्युपूढे कायमचा तो बंदा
तया जीवदान द्याया नच शक्ती कुणा रे
ज्ञानवंत प्राण्या तूच शोधुनी पाहे ।। २ ।।
दास म्हणे कार्य तोचि कारण तोचि जाण ख्रिस्त
मानवास एक होण्या स्थापी प्रभू भोजन
तया सेउनी नरा साधी हित आपुले
देव मानवाचे ऐक्य त्यात जहाले ।। ३ ।।

## ५८. होता ख्रिस्ताचा प्रचार

होता ख्रिस्ताचा प्रचार होती जादू गार गार हो ।। धृ ।।
आहे ख्रिस्तापाशी ऐशी जादू बनवी जना साधू
प्रीती मंत्राचा चारूनी काजू हटवी भव सिंधू
करी सैताना पार ठार ।। १ ।।





नाना रंग ढंग करून होती भोंदू साधू जगी फार
सत्त्यतेचा भाव दावूनी ठेवी हृदयी पाप अंधार
ते चुकले देव मार्ग फार ।। २ ।।
दास म्हणे चला विनवुनी आणू हृदयी धरी ख्रिस्त साधू
पश्चतापी मन त्या जेवू घालू आत्म्याचा करू उद्धार
हा खरा नर जन्मिचा सार ।। ३ ।।

## ५९. ऐसे दान देगा देवा

ऐसे दान देगा देवा चितान्यापरी रे
काढू दे बा चित्र तुझे अंतरी सदाचे ।। धृ ।।
माझे मीच केले पूरे अंतरपट काळे
कोण तुझ्याविन त्याते अंमल करी रे ।। १ ।।
पाहू तुज कोण्या नेत्री आहे कैसे रूप
सांग कैसा भरू रंग अंधुक नेत्राने ।। २ ।।
दास म्हणे चित्रविले ख्रिस्ता तुझ्या कृपे
आत्मरुप चित्र तुझे मान्वांतरी त्या ठेवले ।। ३ ।।

## ६०. ऐसे धन देगा देवा

ऐसे धन देगा देवा खंड कदाच या नसावा ।। धृ ।।
अन्य नित्य खर्च जरी परी वाढो परोपरी
कसा गांजता याना लागे केव्हा
त्याचा न कोणी करो हेवा
चोरण्या जरी चोर येई कदा ना ते चोरीले जाई
हिरावूनी घेण्या आली ये जेव्हा
त्याचा न लागे त्या सुगावा ।। १ ।।
दास म्हणे मज द्यावा शुद्ध आत्मा धन ठेवा
करीन अनुदिनी त्याची बा सेवा
तुझ्या अंबरी रमवा ।। २ ।।





## ६१. तुझ्या प्रीतीचा छंद

तुझ्या प्रीतीचा छंद मला तू दाव
वगळूनी अंतरीचे दुष्ट भाव ।। धृ ।।
पाप भरले काळे काळे करी बर्फासम स्वच्छ पांढरे
स्मरण तुझे चिरकाळ राहू दे नको जगी दुसरे नाव ।। १ ।।
तुजवाचुनिया कंठच सुकला झाला सारा जीव भुकेला
पोशाख मम तू आत्म कुडीचा तू नावाडी मी नाव ।। २ ।।
मार्ग अनुसरी त्यास सापडे तव रुधिराचे बुंद सांडले
दृढ विश्वासे कवटी पोहचले भाग्य उदय तो दाव ।। ३ ।।

## ६२. गूढ तुझे बोलना

गूढ तुझे बोलना गूढ तुझे बोलना
जगत्रात्या आम्हा कळो ।। धृ ।।
मीठ आहा तुम्ही जगाचे ऐसे तूची आम्हा वदिले
तैशापरी आम्ही असावे रुची देण्या सदैव साचे
राहो तुझ्या नामे आम्हा रुची जगी सर्वदा ।। १ ।।
नच लपे डोंगरावरचे वसलेले नगर जैसे
तैशापरी तुम्ही आहा रे मुखे तूची उच्चारीले
तेच दिसू दे जगाला उंच केले तू आम्हा ।। २ ।।
ठेवी नच कोणी लपोनी दिवा मापाखाली झाकोनी
तैशी करी तेवीत आमुची सत्कर्मे तू दिव्या परी
दिसो जगी हृदी आमुच्या त्रैक्य ख्रिस्त दीप हा ।। ३ ।।

## ६३. प्रभू भजनी रमू या

या सकलांनो सारे प्रभू भजनी रमू या
ऐसी ज्योत तेवीत राहो जगी या जगी या ।। धृ ।।
नित्य ठेवा सारे मिळोनी भजनी रमू या
भेद भाव विसरून जगती म्लांकित हृदय नसू दे
प्रभू भजनी रमु या ।। १ ।।
नित्य वंदा ही स्तुती स्त्रोत्रे दु:खीतांचे दु:ख हरपते
भजनी रमू या ।। २ ।।





## ६४. काय तुला मागू रे

काय मागणे तुला मागू रे पुरवी मना परी
समजेना मजला काही तरी ।। धृ ।।
बालपणीचे काय वर्णू मी दिधले सुख मज
मातेजवळी रडलो असता तीच कवटाळी
पाजीत पोटभरी अमृत ते भरिले त्वा तिच्या उरी ।। २।।
पोषण केले माझे आजवरी घेउनी सदा मिष्टान्न भाकरी
उणीव कशाची भासे ना जगती तुझ्या कृपेच्या भरी
जगवितो मजला जग उद्धारी ।। २।।
शेवटले ते पहिले करिशी तुझ्या भक्तीशी लागेल त्याशी
मज ठेवी बा तयाच्या पंक्ती हेच मागणे खरे
ख्रिस्ता तूच वस बा मम अंतरी ।। ३।।

## ६५. दर्शनाला तुझ्या

देवा दर्शनाला तुझ्या वाजला मृदंग
भक्तीरस पिउनिया झालो आम्ही दंग ।। धृ ।।
पातकाचे भार माझ्या डोई झाले जड
दबूनी मी गेलो देवा करी हाय हाय हाय
क्रियेविना विश्वासाला नाही जगी मोल ।। १।।
तव पदी छंद देवा लाभू दे निर्मळ
देवासंगे बोल आता गाढवा ते बोल
रंग ढंग सोडुनिया पश्चतापी मन ।। २ ।।
पायी काटे टोचताना वेदना कुणास
खरा दोषी मीच देवा वाही तू क्रुसास
पापी ओठ लावी सूर गायला अभंग ।। ३।।

## ६६. धावे चंद्रिका

चमचम करुनी धावे चंद्रिका
नित्य हर्षभरे तैशी लागो माझी धाव तुझ्याकडे
तव प्रितीवीन माझे व्यर्थ जीणे ।। धृ ।।





जलस्थळा सोडूनी मासळी फिरेल कैशी ती या भूवरी
तडफडे अती मरणाद्वारी तैसा परी मम आत्मा तळमळे ।। १।।
पापधर्मास येऊन भिडले मुळापासूनी
पाषाणची घायाळ करी मज क्षणार्धात ती
म्हणून तुला मीच अनुसरे ।। २।।

## ६७. मोर जसा नाचतो

मोर जसा नाचतो तसा मी प्रभू भजनी रंगतो
रंगतो तुझ्या नामात गुंगतो समाधान पावतो ।। धृ ।।
ताल असे तालात गावया असतो सूर सुरात यावया
सूर तालाचा मेळ करुनी मी संगीत जेव्हा गातो ।। १।।
भक्तीला मी असे नांगरुनी भावभावनांचे बीज पेरुनी
तृप्तीचे फळ मिळता मजला आनंदे नाचतो ।। २।।
सतार विणेचा झंकारा पाझळतो मन्मनी अंतरा
पाहूनी असला शब्द पिसारा काव्यातूनी मी जगतो ।। ३।।

## ६८. प्रभूची संगत

प्रभूची संगत करीता झडे सुखाची नौबत चोहिकडे ।। धृ ।।
धन आहे जेथे तेथे जयाने मन गढविले कायम आपुले
ऐशा नरा ते जिवित अवघे अमर सुखाशी नडे ।। १।।
नाशवंत सुखे जगाशी नाडीले विचारी मना तूची शोधूनी पाही रे
कोण असा जगी आहे सुखांती कामयनी पायी पडे ।। २।।

## ६९. भक्तीरुपी परिधान

भक्तीरुपी परिधान माते हेतू परेशा
स्वपदी वसू देव सदा ही दीन आशा
आग चेतवी अंगार देहा शडरिपू असे सैतान महान
तू वर्षी पर्जन्य रुद्राधार ने पार लया अर्थ भया शुभविलेशा ।। १।।
अंतरी व धामी काय जरी भरे अंतरी बाहेरी
दयावान हेतू पूर्ण करी प्रीतीत खंडुनिया घेई शुभविलेशा ।। २।।
पाहू दे रे जना तुझा तयावरी ठसा
उच्चारो मुखी तुझे नाम रे ।। ३।।





## ७०. अंतर बागी माझ्या

अंतर बागी माझ्या मजूर मजूर
तो ख्रिस्त ख्रिस्त तो ख्रिस्त ।। धृ ।।
कठीण पाप रुपी जमीन नांगरुन तोच करी पोकळ
कसून करी निर्मळ ।। १ ।।
लाविती मध्ये आशा विश्वास प्रीती झाडे बहू अन्मोल
जोपवी आत्मा फळ ।। २ ।।
जरी आत्मा फळ तोडण्यास येई दुष्ट सैतान
मारी त्या करी रक्षण ।। ३ ।।

## ७१. रमू दे प्रभूजी पायी तुझ्या

रमू दे प्रभूजी पायी तुझ्या
मजला आहर्निश प्रिय राजा ।। धृ ।।
ओ ऽऽऽ माते सानूला किती वाटे
हा संसार गाडा जगामध्ये
परी हाकन्या त्या धीर न मना माझ्या ।। १ ।।
ओ ऽऽऽ तुझ्या सेवेचा मिळाला न वाटा
करतांना खोटा काम धंदा
का  ठ झाला हा देह जगती पित्या ।। २ ।।
ओ ऽऽऽ झाले पुरे थकून गेलो भारी
जगी आता तू मज सारथी
हाकी माझा हा गाडा जीवना सख्या ।। ३ ।।
ओ ऽऽऽ पाही हाकारुन जोर करी
मोह माया जुंपून बैल दोन्ही
केले घातक साथी जीवनी ते म्या ।। ४ ।।

## ७२. देवे दीप जो दिसला

देवे दीप जो दिसला साऱ्या पतीत जगाला
तोचि ख्रिस्त जाणा
वाट दावया जगाला तोचि ख्रिस्त जाणा ।। धृ ।।





त्याच्या प्रकाशी चाले जो त्याते
त्यास न लागे ताप काटे
ऐशा ऐश्वर्य सुखाचा वाटा घेऊ या ।। १।।
त्याचा उपभोग भोगू सारे नरनारी चला चला रे
त्रैक्या दैदिप्य दिधला हृदी ठाव ह्याना ।। २।।

### ७३. सुखदायक नाम

सुखदायक नाम प्रभूचे हारी एक पाप्या हृधी धरी रे ।। धृ ।।
करीला तयाने संसाराचा गाडा
एकमते ओढा तोचि सांगे रे सुखात दुःखात आनंदाने
राही साथी तो वारीसाकडे ।। १।।
शिकवण त्याची नरा जीवनाची
करा बंधुप्रिती वैऱ्यास जनात वनात मनामध्ये
राहू नको कदा कोणा वाकडे ।। २।।
आपार तयाची बहू मोल प्रीती
आहे कुठे किती कोणा न कळे स्वर्गात पृथ्वीत पाताळी ते
भरुन उरुन राही नरा अंतर्यामी ।। ३।।

### ७४. शास्त्रास्वरुप बीज

शास्त्रास्वरुप बीज दिले वराने साऱ्या विश्व मोदाने ।। धृ ।।
मनन करु या आत्म्याने या हो अंतर शेतीरुपी करुया पेरणी
अंतर शेती सुपीक करोनी भक्तीरुपी घालू पाणीं ।। १।।
ख्रिस्त तरू रोप येई रुजोनी देई सौख्यफळ धान्य
या घ्या खा कोणी खाद्य दिले वर्षांनी
स्व शोनित पेय दिले हो तयाने
शास्त्रास्वरुप बीज दिले वराने साऱ्या विश्व मोदाने ।। २।।

### ७५. होडी ने बा पैलतिरा

डोले सागरा सागरा होडी ने बा पैलतिरा ।। धृ ।।
लागे तिजला अपार वारा धावे अन्ती सैरा वैरा ।। १।।
निज पामरा तूच सहारा रक्षी प्रमोदे होडी प्रीत करा ।। २।।





## ७६. ख्रिस्त गुरू हा खरा

हो ऽऽऽ मी ख्रिस्त गुरू हा खरा
गुरू हा खरा नच स्वार्थ त्याच्या अंतरा हो ।। धृ ।।
सोडुनिया स्वर्ग सुखस्थाना त्यागुनी आपुलिया माना
लीन होउनिया झणी येई धरा सत्व दावी नरा ।। १ ।।
बांधू चला पाप रुपी भारा पश्चतापाने जाऊ सामोरा
तोचि धरी करा साऱ्या दीन पामरा त्रय ताप हारा ।। २ ।।
दास म्हणे ख्रिस्त गुरू जाणा झुंजुनिया जिंकिले सैताना
मरणाशी मेला पुनर्जिवीत झाला नमा ईश सुता ।। ३ ।।

## ७७. ख्रिस्त आमुच्या चित्ती

ख्रिस्त आमुच्या चित्ती नाही आम्हास भिती
नव जन्मांती त्याने आम्हास अंगीकारीले ।। धृ ।।
जगी पर जगी ना कले दु:ख ते कसे
मेल्या जगात आमुच्या वाटी सुख ना असे
ख्रिस्ताविन नाही आमुचे जीवन जगातले ।। १ ।।
जरी वर अवतारी जन्मले इथे नांदले
मेले परंतु पतितांसाठी काय केले
मृत्यु जिंकण्या ते धजले अखेर गमावले ।। २ ।।
घडी हरघडी वदिले ख्रिस्त प्रभूने
सर्व सोडूनी पतीता माझ्या मागे ये रे
केले माझ्या पुनरुत्थानी ते जीवन तुला खुले ।। ३ ।।

## ७८. तुझिया कार्यी पडू दे

तुझिया कार्यी पडू दे हा देह खर्ची माझा
हेच मागणे तुला बा ।। धृ ।।
जगा भासे आला वेडा करी पायी हात खोडा
मार बैस माझ्या शिरा जना पाहू दे रुधिरा
तरी उच्चारीत राहो येशू नामा ।। १ ।।
जगताची खरवड तुझ्या चरणाची धूळ





पापी भ्रष्ट मी लाचार ख्रिस्तासाठी अंगीकार
ख्रिस्त माझा पाठीराखा नसे आत्म्या माझ्या धोका ।। २ ।।

## ७९. धर्म अंतरीचे गमे मर्म देवाचे

धर्म अंतरीचे गमे मर्म देवाचे जाणावे ।। धृ ।।
धर्मशब्द मानवकृत म्हणून होईल नामशेष
झाले प्रितीशी वावगे ।। १।।
देव नाही धर्मशब्दी देव आहे मनुजाठाई
आत्मा रुपानी पहावे ।। २ ।।
दास म्हणे धर्म मूळ तोडी मानवा त्या समूळ
ख्रिस्त प्रितीने तरावे ।। ३ ।।

## ८०. तुझिया चरणी

तुझिया चरणी हेच मागणे दीन मनाचेया दयाळा नष्ट करी ।। धृ ।।
सहज भोगाया सुख—दु:ख माझी
सर्व काळ राजी असावे मी प्रेम व्हावे माझे सेवेत विलीन
अहंकारहीन मज करी अनाथ अपंग माझे मन आपुले
तयाच्याचसवे सेवा करी ।। १।।
गर्विष्ठांपुढे नको लवू मान सत्व अभिमान उंच राहो
पंख माझी पंख तेवी माझे चित्त निर्मळ उन्नत सदा राहो
नित्य शुद्धू होवो ऐसे तनमन तुज समर्पण कैसे करी ।। २।।

## ८१. हो देवरायाने बाग लाविला

हो देवरायाने बाग लाविला
तऱ्हे तऱ्हेचे कलम लाविले आत्मिक त्याला
आली आली बघ फुले फळे झाडाला ।। धृ ।।
त्या बागेचे नवल काय सांगू साडेतीन हाताची बाग शाही
आत पेरुनी चौरंगी जाई जुई
तऱ्हे तऱ्हेचे कलम लाविले आत्मिक त्याला
त्या बागेत असे एक विहीर तिला उलटे असे पाझर





मन पवनाचे लावुनिया दोर
तऱ्हे तऱ्हेचे कलम लाविले आत्मिक पाणी त्यात ।। १ ।।
त्या बागेत असे एक माळीण तिला बा असे दोघे जण
एक भोगिती दुसरा जाई मरुन असे चालले रात्रंदिन क्रमानं
तऱ्हे तऱ्हेचे कलम लाविले आत्मिक त्याला
आली आली बघ फुले फळे झाडाला ।। २ ।।

## ८२. भृंगा वसे दडुनिया पुष्पामाजी

भृंगा भृंगा भृंगा वसे दडुनिया पुष्पामाजी
जैसा ते जाई बागडू मम मन पाप्यामाजी रे ।। धृ ।।
अंधुक नयन सत्य पथ माते ना दिसे
ह्या आपार भव सागरी कैसा तरुनी जाऊ रे ।। १ ।।
अंजली देगा देवा तुझ्या भक्तीची दयाळा
अंधुकी घाली नयना देई पुनित दृष्टी रे ।। २।।
अध्यात्मिक पुनित दृष्टी मज दिली त्वा वरा रे
तो मृत्युंजय ख्रिस्त नेई मोक्ष पदा रे ।। ३।।

## ८३. मुळारंभी अर्पी

मुळारंभी अर्पी तव पाया प्रभूजी मनरुपी धन तव पाया ।। धृ ।।
निराकारी तू निर्गुण प्रतिमा केले अंती त्वा प्रतिरुपी नरा
केले भूजल नभा त्वा ।। १ ।।
होते शुन्यवत रुपकाय विश्व प्रीती तव धारी भय रूप नरा
ठेवी सदैव अंतरीचा ।। २ ।।

## ८४. मनी ठेव देवा

मनी ठेव देवा भाव सदगुणांचा
लागो ध्यास मजला तुझ्या पवित्र त्या प्रीतीचा ।। धृ ।।
मनासवे राहो देवा आशेचा उमाळा
श्रद्धा सुमनांचा साठा प्रीतीच्या उर्मिला
त्री गुणांची करुनी माळ गुंफी पतिताला ।। १ ।।





मना दे तू संग तुझा रे धर्म शिक्षणांचा
लीनपणा देउनी देवा तोषवी मजला
काष्ठ जरी देह झाला सांग तू जनाला ।। २ ।।
तवमनी भावे देवा करो तव सेवा
सार असे तू माझ्या देवा भक्तीच्याव वेळा
भाव प्रीतिचाच ठेवा जणू मुखी मेवा ।। ३ ।।

## ८५. करावे भजन

करावे भजन मनातं पुजन तव प्रेम प्रीतीने उघडी नयन
घ्यावे मम जवळी विनवी तूज
मी पामर ऐसा जगी भूवर ।। धृ ।।
मी बालक प्रभू रे चुके जगती मजवरती तुझी छाया किती
वेलीवर जगती जीवाणू किती
तैसा मी प्रभू रे तुज सन्निध ।। १ ।।
तव सदनी प्रभू रे हे जगणे तव चरणी प्रभू मजला मरु दे
बुडत्या नावेला आवरी तुझे अनमोल प्रीतिची ती वल्हे ।। २ ।।

## ८६. देव मानवाच्यासाठी

देव मानवाच्यासाठी गेला क्रुसी
दिव्य प्राणाची आहुती जगावेगळी ।। धृ ।।
मीच देवा तुझ्या द्वारी पातके उरी
उभे कर जोडुनि हे प्रार्थना करी ।। १ ।।
ज्या साठी देव गेला क्रुसाच्यावरी
तेच करीतो पुन्हा मीच लबाड गडी
खोटी तागडी ही माझ्या गळयाला सुरी ।। २ ।।
देव भक्त आब्रामाची परीक्षा करी
द्यावे पुत्र वेदीवरी याचना करी
ठेविला हा पुत्र त्याने वेदीवरी ।। ३ ।।





## ८७. आलो दयाळा आज मंदिरी

आलो दयाळा आज मंदिरी जमलो प्रभुच्या पायी
लाभो मनाला सुख अंतरी सहवास मजलाही ।। धृ ।।
तुझ्या प्रीतीच्या सेवेसाठी जमलेली मंडळी
सुखानंदे तू प्रेम वर्षवी आम्हा दीनांच्यावरी
आज वेदीच्या चला सामोरी एकजुटीने सारी ।। १ ।।
माझ्या प्रभुच्या दृष्य मंदिरा नटवा हो धावूनी
येरुशलेमी माझ्या प्रभूने चौरंगे फेकली
आज मनाच्या मंदिराही सजवा सद्‌गुणांनी ।। २ ।।
भल्या बुऱ्यांनी सेवा करावी प्रभूची हो होउनी
भजन प्रभूची सेवा जाणूनी घ्यावे हो अंतरी
भक्त गणांच्या हाळी ऐकूनी धाउनी प्रभू येई ।। ३ ।।

## ८८. तन धन बल

तन धन बल हे जसे मन मंदिर
धावो जन सगळी प्रभुरायाच्या मंगल स्थळी ।। धृ ।।
धुंद होवो मी तुझ्याच चरणी सोडूनी सगळा अंहपणा मी
अवखळ धन सोडूनी ।। १ ।।
पादुकासम मी आहे प्रभूजी ठेव प्रभूजी मज तुझ्याच चरणी
सोडू नको मज दूरी ।। २ ।।
मन मंदिर हे तुझेच घर धावोनी ये गा लवकर सरसर
ये वस मम अंतरी ।। ३ ।।

## ८९. असो सदा संयोग

असो सदा संयोग असावा चंद्र चंद्रिका यात जसा ।। धृ ।।
पिता नि पुत्र पवित्र आत्मा तव आत्मा जणू मम आरसा
पाहूनी नमितो त्या माजी तुला ।। १ ।।
ख्रिस्ता ख्रिस्ता प्राण कुडीचा हो माझा तू तरी दुसऱ्याचा
सोडू नको रे मजला ख्रिस्ता मम देहाचा श्वास पिता ।। २ ।।
नाद ध्वनी सूर पेटीतुनी हा वाजे मृदुंगातुनी तव ठेका
प्रभू संगाचा विरह नसावा मातेचा प्रेम झरा ।। ३ ।।





## ९०. तुला पाहू दे रे

तुला पाहू दे रे तुला पाहू दे सदा माझे नैन तुला पाहू दे
तुझे नाम माझ्या मुखी राहू दे रे ।। धृ ।।
असे घोर पापी प्रभू मी मनाचा नसे देह माझा पवित्रपणाचा
तुझी छाया मजवर सदा राहू दे रे ।। १ ।।
जसा पाहिजे मी तसा नाही देवा आलो दीन द्वारी तू करशील हेवा
तुझी सेवा करण्या मला शक्ती दे रे ।। २ ।।
तुझे माझे नाते हे जन्मोजन्मीचे जसे सागर होडी अन् नावाड्याचे
तुझी प्रीती मजवर सदा राहू दे रे ।। ३ ।।

## ९१. प्रभो दाव मला खरी वाट रे

प्रभो दाव मला खरी वाट रे कोठे जीवनाचा तो घाट रे ।। धृ ।।
जगिक सुखाची आस लागली शांती मनाला नाही लाभली
प्रभो वाट शांतीची दाव रे ।। १ ।।
सबल प्रीतीची मोट जुंपुनी आशेचा तो दोर बांधुनी
कसा वाहील झुळझुळ पाट रे ।। २ ।।
तन मन धन हे जगिक संपत्ती
भक्तभावे प्रेमे अर्पिती प्रभो मज दाव जीवनाची वाट रे ।। ३ ।।

## ९२. कधी येशील प्रभूजी

कधी येशील प्रभूजी पुन्हा किती मानव अजुनी उणा ।। धृ ।।
मानवा ग्रहण लागले जग अती गुलाम जहाले
धाव धाव मारीया नंदना ।। १ ।।
किती मधूर तुझी ही वाणी ऐकू दे एकदा कानी
हो प्रसन्न आमुच्या मना ।। २ ।।
सकलांची आस कर पुरी हो स्वार मेघावरी
धाव धाव मारीया नंदना ।। ३ ।।





## ९३. प्रभूजी ये रे

प्रभूजी ये रे ख्रिस्ता ये रे ये
या जगती फिरुनी ये पापीजना ताराया ये ।। धृ ।।
मानापानाला भुललेला हा मानव सगळा
धन दौलतीने पिछाडलेला ओळखिना प्रभूला
खरोखर ओळखिना ख्रिस्ताला ।। १ ।।
सैतानाच्या पाषात पडला मोहाने धुंद झाला
खरोखर मोहाने धुंद झाला
सोडोनिया प्रिय प्रभूला मार्ग ज्याचा चुकला
खरोखर मार्ग ज्याचा चुकला ।। २ ।।

## ९४. जागे राहा रे

जागे राहा रे जागे राहा प्रभू येण्याची वाट पाहा (३) ।। धृ ।।
दिन न्यायाचा जवळ आला जागृत ठेवा तव आत्म्याला ।। १ ।।
होईल वाणी अवघ्या जगाला नमवा पुत्र आपल्या पित्याला
नमते राहा रे नमते राहा ।। २ ।।
बाप पुत्र आत्मा तयांचा होईल निवाडा घोर पातकांचा
सावध राहा रे सावध राहा ।। ३ ।।

## ९५. तुझिया दारी निसटुनी

तुझिया दारी निसटुनी पापी मी लाचार
देवा उधड उधड रे दार ।। धृ ।।
किती मारील्या तुजला हाका एकही कानी नाही आली का
पातक भारे पाय थर थरे भोवळ करी बेजार ।। १ ।।
कुठवर ठोकू तुझिया दारा भाव तुझ्यावर माझा सारा
कोण देईन तुजवीन माझ्या आश्रुला आधार ।। २ ।।
मी तर पापी तुला सांगतो दान क्षमेचे तुला मागतो
दार उघडूनी हवे मजला तू तार अथवा मार ।। ३ ।।





## ९६. प्रभू येशू भजू तुला

प्रभू येशू भजू तुला जीव हा आतूरला
किती सांगू तुला एकदा दर्शन दे, दर्शन दे
ख्रिस्ता दर्शन दे (३) ।। धृ ।।
तुला मी पाहिलं तुझा मी होईलं
अंत:करणी माझ्या तुला मी घेईल
जीवन माझे सगळे, तूझ्या चरणीच राहू दे ।। १ ।।
पाहा भाउनी गीत मंजूळ लिहूनी
मार्ग दाविला आम्हा भाव हृदयी धरुनी
ख्रिस्ताचे हे वैभव सारे मनात राहू दे ।। २ ।।

## ९७. दीन दयाळा ख्रिस्ता

दीन दयाळा ख्रिस्ता माझ्या ये ये प्रभू ये ना ये ।। धृ ।।
नयन शिणले वाट पहाता हृदयी अंतरी ये त्राता
मम प्राणाच्या प्राण विसाव्या ये ।। १ ।।
ओलांडुनी मम अंतर धामा जाऊ नको रे निज धामा
जाऊ नको रे जाऊ नको रे माझ्या हृदया ये ।। २ ।।
दास तुझा मी दीन हृदयाचा तुझाच ना रे कवणाचा
आस तुझी ही माझ्या हृदया ये ।। ३ ।।

## ९८. साद किती घालू

साद किती घालू दीन दयाळा
मारियेच्या बाळा वाट किती पाहू रे ।। धृ ।।
तुझ्या दर्शनाला देवा आसवले डोळे
मनोमनी घडती देवा भक्तीचे उमाळे
भक्तीचा करुया सोहळा मारियेच्या बाळा ।। १ ।।
चुकामूक झाली देवा तुझ्या लेकरांची
परत वाट दाव त्यांना आपुल्या घराची
प्रीतीत होऊ दे रे गोळा मारियेच्या बाळा ।। २ ।।





## ९९. मन माझे

मन माझे आणि तन माझे रे देवा केले त्वा तुझे आसन रे
कैसा सांभाळू सांग मला ।। धृ ।।
छपून छपून करी पाप रुपी हल्ले दुष्ट सैतान मजवरी
पडे होउनी घायाळ आत्मा मीच जाई मृत्युमुखी
तव केले भूमीगत सारे म्याची कलंकीत प्रतीरुप रे ।। १।।
सतत सतत तव सहवासे मी होई पुनीत आत्म्या माजी
म्हणूनी दयाळा आसन सोडूनी जाऊ नको रे दूरी
केले ख्रिस्ते मम पातक्याचे सौख्य पुनर्जन्मी एकरुप रे ।। २।।

## १००. केव्हा पाहील देवा रूप

केव्हा पाहील देवा रूप तुझे मी केव्हा पाहील देवा रूप ।। धृ ।।
बोले दुष्ट काढी मंजूळ सूर मना वाटे सुख जणू तुझे बोल
घात आणण्यास दुष्ट सांगे विश्व वृत
झालो आज्ञा भंगोनी पापात मृत ।। १।।
माझ्यास्तव झाला जगी तू मृत विजयात मृत्यू ग्रासीयेलास तूच
कुजला न देह तुझा दावी पातक्यास
मृत्युंजय तूच त्याला तारणाचे तेज ।। २।।
दास म्हणे देगा ऐसे मरण मिळो तारण तुझ्या राजी मज
तव पायी ठेव देवा माझे प्राण सुखे
पण हृधी ख्रिस्ता दाव तुझे मुख ।। ३।।

## १०१. कैसा तुला पाहू

कैसा तुला पाहू बरे ताप अंध लोचनी बहू ।। धृ ।।
मरण समयी भेसूर दुनिया कंटक आनी भारे बाहू
तोच तनुते चहूबाजुनिया क्लेश कुठवर साहू बा ।। १।।
आर्तकाळामध्ये तुची सहारा वैद्यांच्या वैद्या ये तू
पुनीत दृष्टी दे अंध लोचनी पाही तुज जगदिशा मी ।। २।।
खंडीयेलेशी सकल विश्वासला भरे स्व शोनीत बिंदू
पदी बसू दे प्रिया तुझिया माते प्रेम येशू ।। ३।।





## १०२. मन मंदिरी ये प्रभू ख्रिस्ता

मन मंदिरी ये प्रभू ख्रिस्ता तू येशील कधी सांगना ।। धृ ।।
कानागावी लग्नाच्या वेळी द्राक्षारस संपे त्या स्थळी
पाण्याचा हा द्राक्षारस केला केला कसा सांगना ।। १ ।।
मार्था मारीया दोघ्या बहिणी बंधू लाजर पडला त्याक्षणी
मरणातूनी जिवंत झाला झाला कसा सांगना ।। २ ।।
आडोतीस वर्षाचा दुखणेकरी पडला होता खाटेवरी
खाट उचलाया शक्ति त्याला दिली दिली कशी सांगना ।। ३ ।।

## १०३. यार्देनच्या तिरी

यार्देनच्या तीरी दूत पहारेकरी वाद्य वाजवी जनापरी ।। धृ ।।
दुष्ट लतांचे वेष्टन भारी फुलपुष्पांनी नटली सारी
स्वर्ग भूमीवरी अवतरी तारी धन्य म्हणती नर नारी ।। १ ।।
पाणी वाहे अमृत धारी पापे धुवूनी जाती सारी
स्नान नमन करी रोग जाई सत्वरी भाव ठेंवितो देवावरी ।। २ ।।

## १०४. मिटल्या ज्योती जीवनी

मिटल्या ज्योती जीवनी साऱ्या चोहीकडे अंधार
शोधू कुठे प्रभुला प्रभुला ।। धृ ।।
मन माझे हे जळते रूधी हे नित्य असावे तुज पाशी हे
मलीनतेने रूधया माखले कैसा करू मी साकार ।। १ ।।
पाठी मोहाच्या पडतो जेव्हा पडतो प्रभू मी दिसेना तेव्हा
दृष्टी देशी तू मजला केव्हा नित्य हाटू दे अंधार ।। २ ।।
करीन म्हणे मी धरटे प्रभू रे शिंपीत जाईन प्रीती चांदणे
सुवर्णाची सुमने पुष्पे ना हटवी माघार ।। ३ ।।

## १०५. मंदिराच्या ह्या शेजारी

मंदिराच्या ह्या शेजारी मिळाली हो मला जागा
निवाऱ्याला ग कधी येई प्रभू ख्रिस्त धनी राजा ।। धृ ।।
घर माझे मला प्रिया दिले दान प्रभू देवा





वृद्धी होवो सदा माझ्या गृहामध्ये दिन जावा ।। १ ।।
प्रीती प्रेम दया भरता आयुष्याच्या गेल्या वाटा
आत्मसुखाचा शेवट ह्या गृहामध्ये व्हावा ।। २ ।।

## १०६. नावेत प्रभो गर्दी झाली दाट

नावेत प्रभो गर्दी झाली दाट
देगा देवा मज नित अढळची स्थान ।। धृ ।।
पाखंडी सागरातुनी वादळे वारेही येती
दुष्टांनीच केली वसती तेथील उतारुंशी
डोले मग जीवन नौका अविश्वासा अंती ।। १ ।।
सागराच्या तळातुनी येई जलपृष्ठा वरती
जीवनी प्रवाह वाहे अविश्वासाच्या मनी
ख्रिस्ताविना नच देई जीवनी पाणी ।। २ ।।
असुरापरी लाटा येती नावेच्या भोवती
ख्रिस्त नावाडी लावी परतुनी त्याती
पार करी जीवना नौका सागरातुनी ।। ३ ।।

## १०७. प्रभू ये ये पाहुणा

प्रभू ये ये पाहुणा द्वारी माझ्या
नरारे तया आणि प्रीतिच्या भोजना ।। धृ ।।
नच सेवितो तव अन्न मिष्टान्ना बा तू जाणी रे मना ।। १ ।।
भग्न अनुतापे हृदय फाडू दे स्वच्छ करुनी बैसण्याशी तया
आशारुपीचे पात्र तयाचे सत्वरी दे कर धुण्या
देई नीर श्रद्धेचे तया पिण्या दे रे वाढी तुझे शुद्ध आत्म भोजन
जेवितो पाहुणा ।। २ ।।

## १०८. प्रभू राया देई मज जीवदान

प्रभू राया देई मज जीवदान
पापांचिया ओझ्याने मम जीवनी न उरला त्राण ।। धृ ।।
घालविले ऽऽऽ मी जीवन व्यर्थचि होती धुंदी ती पापांची





बाळगली ना तमा भयाची प्रभू तव नामाची ऽऽऽ
क्षणोक्षणी या महापाप्याने केला तव अपमान ।। १ ।।
मृतवत जीवन झाले माझे तुजविन येशू राया ऽऽऽ
नवजीवन देउनिया प्रभूजी जीवनी घाली प्राण ।। २ ।।

## १०९. मारियेच्या बाळा येशू धाव रे

मारियेच्या बाळा येशू धाव रे नाव माझी कडेला लाव ।। धृ ।।
समुद्रावरती वादळ सुटले तारू माझे डगमग डोले ।। १ ।।
मी दीन दुबळा पायाने पांगळा पायाने पांगळा डोळयाने आंधळा
बुडालो रे देवा आता धाव ।। २ ।।

## ११०. आलो प्रभू मी राउळी

आलो प्रभू मी राउळी पवित्र तुझ्या मी पाउली
चुकणारा मी तर मानव प्राणी दे रे कृपा सावली ।। धृ ।।
पातित मी कलंकीत मी पुण्य नसे माझ्या पदरी
तारी आता निवारी व्यथा पातक भारे तनू शिणली ।। १ ।।
काय करू कसे सावरू सुचेना काही गेले भांबावूनी
तुझी वाणी घाली मोहिनी पश्चतापी आलो हे जवळी ।। २ ।।
तारक तू उद्धारक तू पिता पुत्र पवित्र आत्मा ही तू
तुझ्याविना व्यर्थ वल्गना धरुनी ने माझी करंगळी ।। ३ ।।

## १११. प्रभो मी चरणा

प्रभो मी चरणा येऊ दे करुणा कोणी ना माझा वाली
प्रभो देवा देवा धावा लवकरी ।। धृ ।।
धाव धाव धाव आता भाव स्वीकार या गरिबाचा
कलीयुगामध्ये कली मातली ।। १ ।।
ज्ञानाचा तो ज्ञानी जाण भिकारी मी भीक मागतो
गरिबी माझी दुर्बल झोळी ।। २ ।।
अपराधांची क्षमा मागतो तारणारा
तुची बाप तू माझा मी तुझ्या हवाली ।। ३ ।।





## ११२. उसळे सागर

उसळे सागर अटके तारू प्रभो मी कोणाला हाक मारू ।। धृ ।।
सागर उसळे चहुबाजुंनी दिशा कळेना जाऊ कोठुनी
कोणाला सांगू कोणाशी बोलू ।। १ ।।
समुद्रावरती वादळ सुटले तारू माझे डगमग डोले
देवा माझा वाचव तारू ।। २ ।।
अंधाराचे राज्य पसरले मृत्युने थैमान मांडले
कोण दयाळा तुजवाचुनी पदर का न पसरू ।। ३ ।।

## ११३. देवराया पडतो मी पाया

अरे देवराया पडतो मी पाया लीन दासाची विनंती ऐकून घे
माझ्या ख्रिस्ताची प्रीती मला कळू दे ।। धृ ।।
पापे झाली अतिभयंकर त्या पापाने झाला शिरी भार
मोहास नाही आली जाग
तुझ्या रक्त घामाची कीव येऊ दे रे ।। १ ।।
पाप ओझ्यानी गेला थकूनी आला माझ्याकडे तो चालोनी
मला मारी हाक म्हणे झोपला का
माझ्या डोळयाची झापड जरा जाऊ दे ।। २ ।।

## ११४. केवढं तुफान आयलय

केवढं तुफान आयलय होडीला घेरलंय
प्रभू माझी होडी किनारी लाव ।। धृ ।।
अन्याय सागर उफाळला, फेसांच्या राशीत बोकाळला
पापाचा काळ इथं फोफावला पुढे होडीचा वल्हा लाटावरी हल्ला
ताराया बिगीन धाव, प्रभू माझी ।। १ ।।
हातात शांतीचा कंदील घे, वादळ वाऱ्याशी टक्कर दे
दावाया वाट आता धावून ये, माझं सुकाणू कलतंय, पाण्यावरी पळतंय
वल्हाया बिगीन धाव, प्रभू माझी ......।। २ ।।
संकटी आता कसली भिती, सुर्यास्त झालाय डोंगरावरी
प्रभू येशूचं आवतरणं पावन झोलीय धरती
येशू माझा होडीवरती जरा ख्रिस्त बोलाया धाव, प्रभू माझी ।। ३ ।।





### **११५. मारियेच्या नंदना**

मारियेच्या नंदना ये रे घरी माझ्या पाहुणा ।। धृ ।।
सांज सकाळी उठले मी आज भेट व्हावी मनी लागे आस
हृदयाचा पाळणा ।। १ ।।
हृदयाचा करिते चौरंग हा न्हाऊ घालीते तुजला बाळा
पायी घाली पैंजणा ।। २ ।।
श्वासोश्वासाचा ताल धरोनी रात्रंदिन मी तुज थोपटीते
किती गाऊ तुला गायना ।। ३ ।।

### **११६. प्रभुपाया घट्ट धरु**

प्रभुपाया घट्ट धरु रे पाया घट्ट धरू ।। धृ ।।
सैतानाचे बाण विषारी जाती हृदयी अती भेदूनी
किती जर्जर तनुही करु रे पाया ।। १ ।।
तळमळे जीवन अंतर्बाह्य ठेऊ प्रभू मी किती लपवूनी
हे कुठवर सहन करु रे पाया ।। २ ।।
दीन पापी मी पंगू सुध्दा रे चुकलो मार्ग दे दावूनी
भव सागर कैसा तरु रे पाया ।। ३ ।।

### **११७. नको नको प्राण्या**

नको नको प्राण्या गुंतू माया जाळी
काळ आला जवळी ग्रासवया ।। धृ ।।
काळाची या उडी पडेल या जीवा
सोडवील तेव्हा माई बाप सोडवील बंधू पाठीची बहीण
सेजाची कामीना दूर राही ।। १ ।।
सोडवील राजा देशाचा चौधरी
आणिक सोइरे भले भले सोइरे धाइरे संपतीचे लोक
निर्वाणीचा एक प्रभू ख्रिस्त ।। २ ।।





### **११८. आलो आज ना प्रभूराज ना**

आलो आज ना प्रभूराज ना जगाचा उद्धारक तूच ना
माझा देव माझा पिता ।। धृ ।।
संदेष्ट्याने भाकीत केले कार्य त्याचे शेवटास गेले
पाहा जगाचे कल्याण झाले ।। १ ।।
पापी जनांचे तारण करण्या एकच पुत्रा पाठविशी दुनिया
दूत तयाचे गुणगाण गाती आला आहे तारणहार ना ।। २ ।।
मंडळी जमली गुणगाण गाया आशा मनात मोठी हो राया
स्वर्गातूनी तारा तो दिसला आला आहे येशू वर ना ।। ३ ।।

### **११९. उजाडलं आता**

उजाडलं आता अंधार नाही रे प्रभात हाय रे ।। धृ ।।
आलं तुफान गेलं तुफान आता सुवार्ता सांगायची हाय रे
रात्रीचा पडला काळोख हा फार गरिबांचा लय झाला कहार
उजाडलं आता अंधार नाही रे ।। १ ।।
मोह मायेचा सुटला वारा सैतानी सत्ता विक्राळ करा
उजाडलं आता अंधार नाही रे ।। २ ।।

### **१२०. ऐका हो ख्रिस्ताची वाणी**

ऐका हो ख्रिस्ताची वाणी लागो तुमच्या ध्यानीमनी
ख्रिस्ताची गोड गाणी गाईली सर्वांनी ।। धृ ।।
प्रभू हा दयाळू अतिश्रेष्ठ राजा आवडता आहे तो देवाचा
सदगुरू आहे तो आपुला ।। १ ।।
पापी तारण्याला जन्माशी आला मानवरुपी जग तारण्याला
दु:खीतांचा कैवारी आहे तो ।। २ ।।
प्रभू ख्रिस्त राजा किर्तीरूप झाला सत्वपरिक्षा कळली जगाला
उद्धारकर्ता आहे तो आपुला ।। ३ ।।





## १२१. करी त्याग मनुजा

करी त्याग मनुजा स्व पापाचा दवडू नको रे क्षण मोलाचा ।। धृ ।।
घडी दो घडीचा डाव जगाचा तत्पर करी रे स्वीकार प्रभुचा
तोचि न्यायदाता तुझा नि माझा दवडू नको रे ... ।। १ ।।
कोठे बहकशील हे कोण जाणे अंत समयी तुज प्रभू येणे
उद्धार करूनी घे जीवनाचा ।। २ ।।

## १२२. धर्म जीवनाचे पेय

धर्म जीवनाचे पेय शांतवी जीवाला
जया धर्म उच्चनिच ऱ्हासवी नराला ।। धृ ।।
विधी नेमशास्त्र पापाचे कुंपण तोडीले देउनी प्राण ख्रिस्ते
मृत्युंजय तोचि एक तारील जगाला ।। १ ।।
नरे केले अन्य धर्म अखील जगात
कधीतरी होतील तेच जगी नामशेष
पापा पोटी ज्याचा जन्म तो का धर्म कर्ता हा ।। २ ।।
दास म्हणे तारण धर्म विचारा ख्रिस्तास
तोचि सांगे विश्वधर्म साऱ्या मानवास
प्रीती आहे ज्याच्या ठाई तोचि त्रैक्य जाणा ।। ३ ।।

## १२३. प्रभू नाम तुझे मी घेतो

प्रभू नाम तुझे मी घेतो तव चरणी मी लागतो
सारे मन तुला अर्पितो होऊन लीन लीन लीन ।। धृ ।।
प्रभू पापी जनांसाठी झालास किती तरी कष्टी
भक्तजनांस दिल्या भेटी वैऱ्यांवरती केलीस प्रीती
धन्य धन्य प्रभू तव गती होऊ लीन लीन लीन ।। १ ।।
भ्रष्ट झाले माझे मन भटकतो तुला सोडून
अर्पितो तन मन धन कर मुक्त पापापासून
तळमळते माझे मन रात्रंदिन दिन दिन ।। २ ।।
दास म्हणे पापातुनी तुम्ही सुटा ख्रिस्तनामाचा करा तुम्ही साठा
ख्रिस्तास लावू नका बट्टा शास्त्रलेख होणार नाही खोटा
स्वर्ग सुख साधण्यास झटा वळवा मन मन मन ।। ३।।





## १२४. प्रभु नाम तुझे बहु गोड

प्रभू नाम तुझे बहू गोड घेतली मना तुझी ओढ ओढ
प्रभू नाम तुझे बहू गोड ।। धृ ।।
तुझ्या नामाचा लागला छंद लाभे मनाला तो आनंद
घेतली मना तुझी ओढ ओढ ।। १ ।।
नाम तुझे ने किर्तीवंत मनी हर्षुनी गाईल कंठ
प्रभू ख्रिस्ताशी नाते जोड जोड ।। २

## १२५. येशूचे नाम गोड

येशूचे नाम गोड फार दीनाला लागते
ते दुःखे भय अनिवार नाहीसे करिते ।। धृ ।।
त्या नावे शांती भरती अत्यंत समाधान
भुकेलेले तृप्ती पावती दीनां मिळे कल्याण ।। १ ।।
येशू ही माझी प्रार्थना देवाला ऐकावी
दुष्टांच्या सर्व योजना बळाने घालवी ।। २ ।।
येशू हा माझा मित्र जाण पाठीचा मेंढपाळ
गुरु उपाध्य दयावान व राजाही तेजाळ ।। ३ ।।
हे प्रभू माझी स्तवने अत्यंत हलकी
गायीन स्वर्गी गायने दूतांच्या सारखी ।। ४ ।।
आताही तुझी ममता सांगेन मी सकला
अंतरी भरी शांतता मरता दयाळ ।। ५ ।।

## १२६. अमृताची गोडी

अमृताची गोडी प्रभू भजनात
मनाचा विसावा सुखी जीवनात ।। धृ ।।
भजनी रमावे जगा विसरावे
प्रभू नाम घ्यावे आनंदी आनंद ।। १ ।।
कुणी म्हणे बाप कुणी म्हणे पुत्र कुणी म्हणे आत्मा
पवित्र पवित्र ।। २ ।।





## १२७. आम्हा नको दुनियेचा मान

आम्हा नको दुनियेचा मान
प्रभो रे मी तव पायाची घाण ।। धृ ।।
कोणी म्हणती वेडा झाला कोणी म्हणती वाया गेला
आम्ही देऊ तयाला मान प्रभो रे मी तव पायाची घाण ।। १ ।।
झाड संथपणाची धूळ त्याने जाईल पापमुळ
आम्ही देऊ तयाला मान प्रभो रे मी तव पायाची घाण ।। २ ।।

## १२८. प्रिय तू जोडूनी ठेव

प्रिय तू जोडूनी ठेव प्रभू हा प्रिय तू जोडूनी ठेव ।। धृ ।।
सुखदु:खाला अडल्या वेळी कामी पडे ही ठेव ।। १ ।।
पापमुळा तो नाहीसे करी परमपराक्रमी देव ।। २ ।।
ह्या मित्रांनी स्वरक्त पाडूनी केले तारण ठेव ।। ३ ।।
मृत्युखिंडीतून नेवूनिया दावील तुजला ते पेव ।। ४ ।।

## १२९. तुज काय देऊ

तुज काय देऊ दान प्रभू भगवान माझे सर्व काही माती समान
माझा बोलाबाला व्यर्थ गलबला
सुखी सर्व ठेव माझा मी लहान ।। धृ ।।
जगा माजी बोले सर्व माझे माझे पटले परंतु व्यर्थ पाप ओझे
नाशवंत काया न वाण ना गुण ।। १ ।।
विनाशीत देह आता हा पवित्र विटाळूनी तयाशी केला अपवित्र
गोड मानूनी घे बोले पंचप्राण भक्त नसे तुझा मी दास बेईमान ।। २ ।।

## १३०. तुझ्या पायथ्याला

देवराया तुझ्या पायथ्याला
द्यावी जागा मज पातक्याला ।। धृ ।।
आजवरी भटकलो मी दुनिया सारी
नाही शांती मिळाली आलो माघारी
काय सांगू प्रीत मीच तुला द्यावी ।। १ ।।





भार पापांचा हा माझ्या डोईवरी
नाही रेशमी धागा माझ्या अंतरी
काय सांगू प्रीत मीच तुला द्यावी ।। २ ।।
मजसाठी प्रभू क्रुसावर गेला
ठेव आठवण माझी प्रभे तू देवा
काय सांगू प्रीत मीच तुला द्यावी ।। ३ ।।

## १३१. लीन मी झालो

लीन मी झालो सेवा कराया,
गोड तुझे प्रभुनाम देवा ऽऽऽ गातो तुझे गुणगाण ।। धृ ।।
टाळ विण्याचा गजर करोनी मन लागो तुझिया चरणी
तूची आमुचा जीवनदाता आहेस जगती महान ।। १ ।।
दास तुझा मी घडलो प्रभुजी रूप तुझे माझ्या नयनी
तूची आमुचा तारणदाता आहेस जगती महान ।। २ ।।

## १३२. तुझ्या चरणाची धूळ

तुझ्या चरणाची धुळ लावितो कपाळी
तुझी प्रीत माझ्यावर या जगाच्या निराळी ।। धृ ।।
तुजवीन मी ख्रिस्ता जाऊ कुठे मी
राहू कुठे मी
या दीनदासाला तूच कवटाळी तुझी प्रीत ।। १ ।।
पाप जगाचे घेउनी सारे
आलो तुझ्या दारी आलो तुझ्या दारी
तुझ्या दीनदासाला तूच कवटाळी तुझी प्रीत ।। २ ।।

## १३३. सदाचरणाने

सदाचरणाने पुढे वर्तताही तरी पूर्विचा दोष कमी नाही ।। धृ ।।
ज्ञान–विद्या अधिकार कुठल्याही द्रव्याने मुक्ती नसे पायी
प्रार्थना स्तुती भक्तीचा आवेश शास्त्रावाचुनी देऊळ नाही प्रवेश
पाप यानेही जात नाही पहा





तुम्ही सुविचार करोनी शोध करावा हा ।। १ ।।
जसा उधळया नम्र झाला पाप पत्करुनी पित्याला शरण गेला
कृपादानच ते मात्र इच्छियले नाही महती वा पुण्य दाविले
तसा पापी जाईल शरण देवा त्याची इच्छा जाणुनी सेवा
कृपेवरती टेकेल ख्रिस्त याच्या
करील माफी पातकांची त्याच्या ।। २ ।।
पित्याने आज्ञापिले तेच मी करीन मार्ग दावील तोच मी धरीन
हीच उत्कंठा मनी ज्याच्या देव बहु हर्षाने
क्षमा करील पातकाची त्याच्या ।। ३ ।।

## १३४. तू राजा मी भिकारीन

तू राजा मी भिकारीन भोळी
प्रभूवरा भर माझी झोळी ।। धृ ।।
तवचरणाची दासी मी झाले
चालूनी चालूनी मी भारी थकले
मारीते आरोळी ।। १ ।।
निशीदिनी झोळी घेउनी हाती
साद घालीते साऱ्या जगती
झुरते सांजसकाळी ।। २ ।।
हेच मागणे आता देवा
गोड तुझा सहवास घडावा
देवा मज द्यावी तारणाची भिक्षा
होईल मी मोकळी ।। ३ ।।

## १३५. ख्रिस्ता पददीनाला

ख्रिस्ता पददीनाला ही शांती लाभू दे
ओझ्याने गांजलेल्याही शांती लाभू दे ।। धृ ।।
ही समता प्रभूची ही लीनता मनाची
आहेच ख्रिस्ताठर्यी ही सत्ता प्रभू पित्याची
वाचूनी प्रभू कृपेच्या न पान हालते ।। १ ।।





शब्दात त्या प्रभूच्या अवघेची विश्‍व भरले
खाली वरी आकाशी प्रभूनाम धन्य झाले
वाणी प्रभो पित्याची येई का परतुनी ।। २ ।।
जगताची सुख दु:खेही अवघी प्रभूने घ्यावे
आमच्याकडे प्रभूने सेवक म्हणोनी पहावे
संधी देई आम्हाला तुझे नाम गोड गाण्याला ।। ३।।

## १३६. उन्हाच्या भर दुपारी

उन्हाच्या भर दुपारी फिरतो मी दारोदारी
आईविना भिकारी फिरतो मी दारोदारी हो ।। धृ ।।
आईची होती चोळी त्याची करूनी झोळी (२)
मायेचे पंख तुटता आता मारू कशी भरारी ।। १ ।।
कसे झाले माझे जिणे, जिणे मातीत पडले सोने (२)
मायेचे पंख तुटता आता मारू कशी भरारी ।। २ ।।

## १३७. देवा मंगल पाय तुझे

देवा मंगल पाय तुझे ते पवित्र पदरात घेतो ।। धृ ।।
पवित्र व्हाया तव पदी वसतो
पवित्र व्हाया मंगल गीत तुझे गातो
प्रीती अक्षदा प्रेम गंध हे
तुझ्या पदी लावितो ।। १ ।।
तुझ्या पदावरी मस्तक ठेवूनी
तुझ्या पदी गीत सुमने गातो
प्रार्थना करीती पवित्र जन हे
तुझ्या पदी लवती ।। २ ।।

## १३८. देवा तुझ्या द्वारी

देवा तुझ्या द्वारी होउनी आलो भिकारी
पापाचे ओझे भारी घेउनी पाठीवरी ।। धृ ।।
जगी असे सुख भारी भोगिले आजवरी





सुखामध्ये नाही केले पुण्य हे थोडे तरी
जीवनाची काळ झोप माझ्या या अंधळयावरी ।। १ ।।
मद्यपान करी सदा घुंदीत तन माझे
अशुद्धीच्या वासनेचे लोभी रे मन माझे
कुभावनेचे जाळे विणले आळीने भारी ।। २ ।।
आजवरी पापे करुन शिणली ही माझी काया
धुळी समान तन माझे सांभाळी देवराया
दीनांचा तू दयाळा मजवरी क्षमा करी ।। ३ ।।

## १३९. माझे कोठे आहे स्थान

जगाच्या त्या नकाशात माझे कोठे आहे स्थान
सुक्ष्म धुळीचा मी कण जीवधारी प्राण ।। धृ ।।
नव्हती छाया नव्हती माया कुणाची ही सारी किमया
निसर्गाचे महाचक्र कोणी रंगविले चित्र
सृष्टीच्या या विस्तारात पहिला तुला मान ।। १ ।।
बहुदेशाचा तो खंड सप्त खंडाची ही पृथ्वी
चंद्र सुर्य दिव्य ज्योती झाली तुझ्या शब्दा प्रती
जलचर भूचर जलचर भूचर त्यात मी लहान ।। २ ।।
मुंगी साखरेचा कण पांखरास भरवी कोण
कधी नच घे विश्रांती कार्यकरी दैवशक्ती
तुझ्या पदी लोळो देवा माझा पंच प्राण ।। ३ ।।

## १४०. मना प्रभू तुज व्हावा

मना प्रभू तुज व्हावा ना सोड सोड तव अभिमाना ।। धृ ।।
निंदा स्तुतीच्या भारांना सुखेवाहू दे पोरांना
सानपणा या थोरपणा नको भुलू तू मानापाना ।। १ ।।
मना वाहा रे प्रभू चरणा समग्र हो तू आपण





## १४१. सोडू कैसे तुझे पाय

सोडू कैसे तुझे पाय नाही कुठे सोय
तूच बा उपाय जीवनाचा ।। धृ ।।
बापा केला अपमान देह वासनी गुंगून
भ्रष्टविले माझे मन नाही जगी स्थान
मोह पातकांचे मूळ नाशी जीवना समूळ
आत्म्या लागे माझ्या डाग युगा न् युगी बा ।। १ ।।
तुझ्यामुळे मित्त चव तुझ्याविन मी बेचव
देवा पाउली तुडीव मग राहो वा जावो जीव
असो कुठे मी जिवंत किंवा कबरेत
राहू दे तुझ्यात मज ख्रिस्ता ।। २ ।।
अर्पिले देवा तूज तन मन धन
माझे पाहिजे ते कर पण लोटू नको दूर
तूच बा जीवन तूच बा मरण
तूच बा तारण सखा जीव आत्म्याचा ।। ३ ।।

## १४२. कशाला मी चढू देवा

कशाला मी चढू देवा फुकाची या माना ।। धृ ।।
तुझा तुझ्या गावी ख्रिस्ता झाला किती अपमान
मला पुसे कोण जगी या ख्रिस्त सख्या तुझ्यावीन
तुझ्यावर माझा भाव सत् मार्गाने तू चालीव
मनातील काढी माझ्या तूच अभिमानाला ।। १।।
दास म्हणे देगा देवा माझ्या ठायी ऐसे मन
मारो कोणी एका गाला करो दुजा पुढती गाल
चरणाची धूळ लागू दे कपाळाला ।। २।।

## १४३. पादुकासम मी झालो

पादुकासम मी झालो प्रभूजी ठेव
मला तुझ्या पायी प्रभुजी ।। धृ ।।
जग सुखाशी भुललो भारी म्हणून तुला नाकारी





ठेव मत्सर द्वेष कपट मोहानी पापा दीन मी होई ।। १ ।।
अनवानी नको चालून जाऊ सोडूनी मजला दुरी
दुष्ट सैतान मज नेईल चोरुनी सोपवील मृत्यूच्या ठायी ।। २ ।।
तूच जिंकीले मरण जगाचे जीवंत युगा न् युगी राही
देवाचा तू देव खरोखरी शरणागत तव पायी ।। ३ ।।
नित्य घडू दे तुझा सहवास पतिता मिळे उल्हास
शांन्ती प्रितीच्या राजा तूचा दिली मनुजा तारण प्राप्ती ।। ४ ।।

## १४४. सृष्टीच्या निर्मात्या

(संदर्भ—इयोब २८: २८)
सृष्टीच्या निर्मात्या तुला भक्ताचं मागणं
आम्हा दीनावरी द्यावा तुझा आशीर्वाद ।। धृ ।।
आज तुझी करितो भक्ती नमवी मस्तक
केले किती आजवरी मी बहुविध पाप
पापाचा उद्धार केला तूच या भूवर ।। १ ।।
इयोबाची पाहून भक्ती सैतान हैरान
तैसे आम्ही व्हावे इयोब तुझ्या सान्निध्यात
तुझ्या कृपेचा लाभ देवा मिळू दे भरपूर ।। २ ।।
शुद्ध करी माझे मन देहाचे अर्पण
तुला बैसण्या देवा घडावे मंदीर
मंदिर सुंदर सृष्टीला शोभिवंत ।। ३ ।।

## १४५. डोकं टेकण्या जागा नव्हती

डोकं टेकण्या जागा नव्हती तुला
महाल माडया ख्रिस्ता कशाला असाव्या मला ।। धृ ।।
तू सर्व जगाचा तारणकर्ता असोनी
नर जन्म घेउनी निजला गायी गोठ्यामधी
तृण टोचले तुझ्या शरिरी रडे केविलवानी
हा लीनपणाचा जगा दावी कित्ता ।। १ ।।
गुरू असतापरी तू धुई पाय शिष्याते





हे शिकवी शिष्याते सेवा शिक्षण देऊन साचे
विसरुनिया स्व माना ते दावी मनूजा ते
ही दीन दुबळयांची सेवा करण्या सिद्ध व्हा ।। २।।
या खचित परी हृधी फुगवी गर्वच भारी
हे सर्व सोडूनी आलो प्रभूजी तुझिया पायी
ऋण कैसे मी फेडू तुझे जगी भ्रष्टीत तनू जहाली
मी आधम तुझ्याच पदी मागे तारण भिक्षा ।। ३।।

## १४६. मज ख्रिस्त सखा

मज ख्रिस्त सखा कैवारी रे मी होतो बे आधारी ।। धृ ।।
मी भटकलेला भिकारी मज घेईना कोणी द्वारी
परी ख्रिस्त मला हाका मारी रे ।। १।।
देवाचा मी हाड वैरी परी ख्रिस्त उभा हा द्वारी
मज ख्रिस्त सखा उद्धारी रे ।। २।।
मी दास खास येशूचा घेई झेंडा करी क्रुसाचा
सेवेची फुंकी तुतारी रे ।। ३।।

## १४७. कोणी म्हणो बरे वाईट

कोणी जन मन म्हणो बरे आम्हा वाईट रे
केली पाठ जगाकडे
धरा मारा घाला खोडा शिर तोडा
दीन शिष्य आम्ही त्याचे ।। धृ ।।
लीनपणाची प्रभू येशूची शिकवण रूधी संचरे
तिच्या करवी हे शास्त्र प्रीतीचे
धरा मारा घाला खोडा शिर तोडा
साऱ्या विश्वा जिंकीले ।। १।।
जग निंदीचे प्राणहानीचे जरी पडले शिरसाचे
गुहेमध्ये जरी लोटीले होऊ साक्षी तयाचे
धरा मारा घाला खोडा शिर तोडा
होऊ साक्षी तयाचे ।। २ ।।





## १४८. कोणी म्हणती मजला काही

कोणी म्हणती मजला काही मी बसलो प्रभूच्या पायी ।। धृ ।।
संसारी या मन लागेना काम धंदाही काही सुचेना
जीवन माझे हे भटकत राही ।। १ ।।
संसाराचे यात्रेकरिता प्रभूनामाचा विसर न पडता
मन माझे भटकत राही ।। २ ।।

## १४९. ज्याने जगाच्या पापासाठी

ज्याने जगाच्या पापासाठी प्राण करुन कुर्बान
अखील मानवा सुखी कराया दिले जीवा जीवदान
प्रभू येशू महान झाला येशू महान माझा देव महान ।। धृ ।।
मावनासाठी कसा पाहा बनविला निसर्ग
द्वेष भावना असता नमला सनातन हा वर्ग
पिता पुत्र पवित्र आत्मा जीवनाचा हा मार्ग
या जुलमाला किती पाहिले साहिला अपमान ।। १ ।।
तुम्हा प्रेरणा मिळेल त्याची सामर्थ्य आणि शक्ती
देह झिजवूया प्रभूच्या चरणी छान आहे ही युक्ती
स्मराल तयाला अंतरयामी हीच खरोखर भक्ती
सार्वकालीक जीवन देती जगती मिळावी ही मुक्ती
पतितांनाही जीवन दिधले दिले वरदान ।। २ ।।
पृथ्वीवर येतील तेव्हा अधिकार हे सुत्र
शंका कुशंका उरल्या नाही कुणास तिळमात्र
नेईल तारुन पतितांना तो देवाचा पुत्र
पामरा तू स्तवन करावे गाऊनिया गुणगान ।। ३ ।।

## १५०. न्याय पारडे

न्याय पारडे करी मोजनी सारी
अरे रे सत्य नांदते देवाच्या दरबारी ।। धृ ।।
ख्रिस्त राजा हा आमुचा स्वर्गीय राजा
ममतेने वागवितो सारी प्रजा





लिला देवाची भाविका तारी ।। १ ।।
देई मरणास आव्हान दानियल दास
सिंहाच्या गुहेत ठेवितसे त्यास
लिला देवाची भाविका तारी ।। २ ।।

## १५१. वेड लागले

वेड लागले हो वेड लागले तुझ्या नामाचे वेड लागले ।। धृ ।।
उंच असता तो नीच झाला गायी गव्हाणी तो जन्मी आला
चला आळवू चला चला वंदू चला ।। १ ।।
फुल पुष्पांच्या गुंफंनी माळा घालू प्रेमाने प्रभुच्या गळा
चला आळवू चला चला वंदू चला ।। २ ।।

## १५२. सारे मिळूनी

सारे जमूनी सारे मिळूनी जाऊ या ख्रिस्ताकडे
करुया वंदन त्याच्यापुढे (३) ।। धृ ।।
मागत असता ते मिळेल शोधीत असता ते सापडेल
ठोकीत असता ते उघडेल वचन प्रभुचे खरे ।। १ ।।
घेतो मानव जन्म एकदा एकच ईश्वर असे सर्वदा
अज्ञानाचा काढुनी पडदा नम्र हो ख्रिस्तापुढे ।। २ ।।
असेल घरची जरी श्रीमंती सेवा करावी जन हिताची
आस धरावी प्रभू भक्तीची आज या धरणीवर ।। ३ ।।

## १५३. सुंदर देऊळ (अभंग)

सुंदर देऊळ हृदय हे माझे
तेथेच विराजे देवबाप ।। १ ।।
प्रवृत्तीचे पीठ उभा तयावरी
उपदेश करी पवित्र आत्मा ।। २ ।।
सारा येशू ख्रिस्त भरुनी उरला
आता या जीवाला भय कैसे ।। ३ ।।
दास म्हणे येथे अवघी मंडळी
भजाया जमली देवबापा ।। ४ ।।





## **१५४. हे ख्रिस्ता करुणा करा**

हे ख्रिस्ता करुणा करा तव आसरा तुटला पुरा ।। धृ ।।
त्याजिले मला का अजि देवराया तुजवीन झाला जीव बावरा
जगणे कसे बालकाचे जरी माया लोटी दूर लेकरा ।। १ ।।
धन अंधःकारे जग त्यास सारे हृदयामधे भरला पुरा ।। २ ।।
दूरी त्या दुरावे जन ईश्‍वरा रे शिकवी धडा हा मज पामरा ।। ३ ।।

## **१५५. हे प्रभो करुणेच्या सागरा**

हे प्रभो करुणेच्या सागरा दीन मी आलो
चरणाजवळी तूच आम्हा आसरा ।। धृ ।।
पाप भार हा अति जाहला साहेना मजला
तुज वाचोनी कोण दयाळा साह्य करी दीनाला
देई हाता मज पाप्याला तारी या पामरा ।। १ ।।
साह्य करी मज दीन पतिता चुकलेल्या
लेकरा पुत्र म्हणण्या योग्य नसे मी स्वीकारी चाकरा
तूच कृपाळा ठेवी मजला चाकर मी तव खरा ।। २।।
म्हणे प्रभो तू श्रमलेल्यांनो या मजपाठी सगळे
विश्रांती मी देईन तुम्हा आहे जगा वेगळी
शमवी वादळ मम मनीचे हीच एक प्रार्थना ।। ३ ।।

## **१५६. धाव येशू राणा**

धाव धाव येशू राणा तुज येऊ दे करुणा
तुज येऊ दे करुणा तुज येऊ दे करुणा ।। धृ ।।
जीव झाला त्रस्त भारी फिरलो मी दारो दारी
शांती कुठेही मिळेना ।। १ ।।
दुःखी कष्टी गांजलेला पापाने वेढलेला
ऐसी झाली माझी दैना ।। २ ।।
कर माफी पातकाची तव दीन लेकराची
प्रार्थी तुझिया चरणा ।। ३ ।।





## १५७. गा प्रभूचा

गा प्रभूचा महिमा
प्रियांनो वर्णू किती मी उपकाराला
उरली नाही सिमा ।। धृ ।।
महाभयंकर पापे आपुली ख्रिस्त प्रभूने ती वाहिली
खांबावरती आवघी खिळली
झाली तयाची पापक्षमा ।। १ ।।
मेघारुढ प्रभू येईल जगती धीर धरोनी तो नरी आता
प्रभू चरणाशी ठेवूनी माथा आळवूया त्या सत्प्रेमा ।। २ ।।
मृत्यू येथे मरुनी पडला ख्रिस्त अविनाशी झाला
दंड मुक्त बनवील सकला गौरवू त्या प्रभू नामा ।। ३ ।।

## १५८. सेवा तुझीच करू

सेवा तुझीच करू उपकार स्मरू
नको मनी राग धरू
बाई तुझे लेकरू मी आई तुझे लेकरू ।। धृ ।।
दूध नव्हे ती अमृत धार
पाजुनी मजवर केले उपकार
आई तुजवीन आधार नसे हा
ख्रिस्त प्रचार करू आणि हंबरू ।। १ ।।
लहानचे मोठे केले मला
मुखी सोन्याचा घास घातिला
दोन नयनाचा तू दीप जाळीला
तुझ्या कुशीत शिरू आणि हंबरू ।। २ ।।

## १५९. थोर तुझे उपकार

थोर तुझे उपकार देवा, थोर तुझे उपकार ।। धृ ।।
मागा म्हणजे मिळेल तुम्हाला स्वर्गामधुनी मान्ना पडला
गातो तुझे गुणगाण देवा ।। १ ।।
बिजापासून झाड उगवते झाडापासून फळ हे मिळते
केलेशी चमत्कार देवा ।। २ ।।





मी तर पापी वेडा खुळा रे नाही समजलो तुज देवा रे
दे मज दे वरदान देवा ।। ३ ।।

### १६०. प्रभुदेवा तुला कसा विसरू

प्रभुदेवा तुला कसा विसरू तू बाप मी लेकरू ।। धृ ।।
पाण्यावाचुनी मासा जैसा तळमळतो रे जीव हा तैसा
कुठवर धीर घरू रे ।। १ ।।
थकलेल्यांचा तूच विसावा सर्व जगात तुझा गौरव व्हावा
देवाला कसा विसरू ।। २ ।।
जगात मजला नाही थारा वहाती माझ्या अश्रुधारा
ख्रिस्ताला कसा विसरू ।। ३ ।।

### १६१. श्री प्रभुसेवा

श्री प्रभुसेवा हे मज देवा झाले सार्थक जन्माचे
जडलो पायी मग भय नाही केल्या मागल्या कर्माचे ।। धृ ।।
स्नान करिता कोड जळाले जळाले नामान कोडयाचे
प्रभू पदाला लागून त्याने सार्थक केले जन्माचे ।। १ ।।
पश्चतापी पाप जळाले, जळाले निनवे शहराचे
डोंगरावरी जाऊन योना कौतुक पाही देवाचे ।। २ ।।
तुरुंगांमध्ये पौलस असता नाम गाईले बापाचे
भक्तासाठी धावत आला कुलूप गळाले तुरुंगाचे ।। ३ ।।
क्रुसावरी चोर असता पाय धरिले त्याने ख्रिस्ताचे
गत पापांचा स्वीकार करुनी वतन मिळविले स्वर्गाचे ।। ४ ।।

### १६२. अंतरी ऋणी खरा

अंतरी ऋणी खरा अंतरी दे तू बा मज थारा ।। धृ ।।
मुळ पापास्तव जीव भ्रष्टला
ग्रासी असूर आधी त्याला
तो व्याधी मम आत्म्याला
मृत शापीत खरा करी कृपा रे मृत्युहरा ।। १ ।।





ख्रिस्त दास हा तव पदी गेला
अनुतापे गा आळविला
जीवनी पावन झाला
धरी भाव पुरा वसे अंतरी एकसुरा ।। २ ।।

## १६३. हा कसला प्रकाश आहे

हा कसला प्रकाश आहे, या खिन्न गढूळ रात्री
तिमिरावरी फुंकर घाली ही कोण अनामिक ज्योती ।। धृ ।।
मी तीन नभातून आली नव दिव्य तेज आकाश
काळोख दुभंगून गेला शांतीचा उभरे तारा ।। १ ।।
तू रात निरामय दीप जळे
मी माय होवूनी तिमीर जळे
उजळून मनाची दारे मिलनाच्या मागे आला
चैतन्य राहुनी नाचे हा बेचैन होवूनी वारा ।। २ ।।

## १६४. शरणागत तुझिया पाया

शरणागत तुझिया पाया, मज तारावे प्रभुराया ।। धृ ।।
दीन दुबळा मी लाचारी पातकी आणि दुराचारी
असता तू मज आधारी
करशी मजवर ती माया मज तारावे...।। १ ।।
तू पवित्र अन् निर्दोषी तू न्यायपूर्ण ही असशी
झालाशी तू जगवासी
करुणा कर तूची आता मज तारावे...।। २ ।।
जरी असता निखील वाणी मागतो मी जीवन पाणी
तहानलेला आलो म्हणून
पश्चतापाने घ्यावया मज तारावे...।। ३ ।।

## १६५. व्यर्थ हजार उपायी

व्यर्थ हजार उपायी तोवरी सुख नाही सुख
शास्त्र मुख तव झाके नाही प्रभुला परि आळविले ।। १ ।।
प्रभुचे यश गाजविले नाही मीपण प्रभुला दिधले ।।२।।
ख्रिस्तावाचुनी सारे तोवरी दिसती फोल पसारे ।। ३ ।।





## १६६. शरण तुला मी

शरण तुला मी धाव किती रे सोसू याचे घाव ।। धृ ।।
काही सुचेना ऐहीक सुख हे भुलवी नित्य मनाला
वेड लावूनी मायेचे त्या मुकवी दिव्य प्रीतीला
मी अंध मला तू पाव कळेना मार्ग कुठे तो दाव ।। १ ।।
चढतो प्रभू मी बहू कष्टाने आठवूनी क्रुस खांबाला
टपुनी बसला मार्गावरी तो वार करी हृदयाला
हो आडवा घाली घाव उलथुनी पाडी त्याचा डाव ।। २ ।।

## १६७. शरण कुणाला जाऊ

शरण कुणाला जाऊ मी आता या जगती ।। धृ ।।
केली यात्रा केली वारी रे मज फिरते दारोदारी
कैशी भक्ती न मिळे शांती या जगती ।। १ ।।
नाना मार्ग नाना पंथ रे साधू आणिक संत
सत्य कोणते न कळे आता या जगती ।। २ ।।
दास प्रभुचा आळवी द्वारी रे प्रभू म्हणुनी हाका मारी
तू सखा मम कैवारी या जगती ।। ३ ।।

## १६८. सिनाई डोंगरावरी

सिनाई डोंगरावरी न हिरवा मंडप जाईचा ।। धृ ।।
आकाशाच्या वाटा कोण येई हळूहळू
पायी झगा लोळण बाळ येशूख्रिस्त येई गं ।। १ ।।
आकाशाची वाट ओली कशानं हो झाली
मारीयाबाई न्हाली केस वाळवीत गेली ।। २ ।।

## १६९. दया क्षमा शातीचे

दया क्षमा शातीचे दिले देवाने वरदान
ऐक मानवा यातच आहे तुझे रे कल्याण
हेच बायबलचे ज्ञान ।। धृ ।।
लोक समुदाय घेवूनी आला व्यभिचारी स्त्रीला





कर प्रभूजी न्याय हिचा आम्ही काय करावे हिला
स्पर्श जयाला नसे पापाचा पहिला खडा मारावा ।। १ ।।
वैऱ्यावर प्रेम करावे मित्र असे समजुनी
अंहकार शांतीने शिकवा ख्रिस्ताची शिकवण
निंदा छळ हे सहन करुनी झाला जरी अपमान ।। २।।
शाहिद शास्त्र अष्ट पुराणबायबलची आवृती
दहा आज्ञेचे पालन करता मिळे स्वर्गाची मुक्ती
मार्ग, सत्य,जीवन मिच आहे ख्रिस्ताचे आव्हान ।। ३ ।।

## १७०. चद्र सुर्य तारे लाजली

चद्र सुर्य तारे लाजली
कीर्ती माझ्या ख्रिस्ताची तिन्ही लोका गाजली ।। धृ ।।
प्रकाशाची ज्योत झाला
जाळीले जीवन अमर सुखाचा मार्ग दाविला प्रभुने
आम्हा पाप्यांसाठी केले क्रुसी समर्पण
पाषाना पाझर फोडी ।। १ ।।
कोणी नच जिकिले ख्रिस्ताचे मन
दुनियेच्या माथ्यावरी झळके निशाण
प्रतीक तुम्हा आम्हा धर्म मान चिन्ह
विघ्नता मोल गणली ।। २ ।।

## १७१. परमेश्वर किती चांगला

परमेश्वर किती चांगला चांगला
त्याचा अनुभव घेऊन पाहवा ।। धृ ।।
अडीनडीला संकट समयी
मारीता हाक धावत येई
धावा करूनी पाहवा ।। १ ।।
इच्छिले असता मनी जे काही
प्राप्त होईल विश्वास पायी
विश्वास धरुनी पाहवा ।। २ ।।





## १७२. देवाची लेकरं

देवाची हो लेकरं, आम्ही देवाची लेकरं ।। धृ ।।
प्रभुचे निशाण हो आम्ही फडकवू हो उंच
न ही त्याच्यापुढे उच्च आणि निच ।। १ ।।
देवाचे उपकार आम्हावरी आहे किती छान
आमुच्या पापामुळे त्याने दिला क्रुसावरी प्राण ।। २ ।।
देवाचे वचन तुम्ही घ्या हो ऐकून
परस्परावर प्रेम करा घ्या हो तुम्ही समजून ।। ३ ।।

## १७३. धन्य देवा तुझी करणी

धन्य देवा तुझी करणी
ठेवियले नारळात पाणी ।। धृ ।।
उस वाकडे तिकडे
आत साखरेचे खडे, धन्य देवा ।। १ ।।
फणसाच्या अंगी काटे
आत अमृताचे साठे ।। २ ।।

## १७४. माझं काही नाही रं देवा

माझं काही नाही रं देवा तुझंच हे सारं
या सृष्टी सौंदर्याचा केवळ मी एक राखणदार ।। धृ ।।
हाड मोडूनी माझीच मजला संगतीला दिली एक नार
शाप देवूनी दोघांना तू पाठवले भूवर
पोटासाठी कष्ट करोनी खातो मी भाकर ।। १ ।।
माझा मजला कळला नाही आयुष्याचा खेळ
कधी अचानक अशी भयानक येईल मजवर वेळ
कमावलेली कमाई सारी इथंच राहणार ।। २ ।।
मातीचं हे शरीर माझं मातीतच जाणार
अमर आत्मा माझा देवा तुझ्याकडे येणार
पाप पुण्याचा न्याय देवा इथेच करणार ।। ३ ।।





### १७५. प्रभू गुणास गावे सदा

प्रभू गुणास गावे सदा असा देव प्रभू चांगला ।। धृ ।।
असता स्वामी तिन्ही जगाचा मनुजा साठी मानव झाला
पाप्यांसाठी कन्हला रडला दीन रंजल्या गांजला ।। १ ।।
स्पर्शे त्याच्या पाही आंधळा मौजे नाचे जसा पांगळा
दीन दुबळयांच्या सेवेसाठी कालवरी टांगला ।। २ ।।

### १७६. किती सामर्थ्य धन्य प्रभो तुजला रे

किती सामर्थ्य धन्य प्रभो तुजला रे
मोठे नवल वाटते मजला ।। धृ ।।
चंद्र सुर्याचा प्रकाश पृथ्वी आणि आकाश
तुझे सामर्थ हे खास
हो हो म्हणताच अवघे सर्व झाले रे ।। १ ।।
येशू कानागावी गेला मारीया होती त्या लग्नाला
तेथे दाक्षारस संपला पाण्याचा तेथे दाक्षारस केला रे ।। २ ।।
अडतीस वर्षे दु:खणेकरी एका तलावाच्या तिरी
पडला होता खाटेवरी बाज उचलाया शक्ती दिली त्याला रे
येशू गेला बेथानी मारीया मार्था दोघ्या बहिणी
चार दिवस झाले लाजारा मरुनी
त्याने जीवंत केले लाजरसाला रे ।। ३ ।।

### १७७. धर्म जाणणारे तुम्ही

धर्म जाणणारे तुम्ही करा प्रभू गर्जना
पूर्ण सृष्टी जा सांगा सुवार्तेची घोषणा ।। धृ ।।
क्लेशयुक्त त्याने तो खळगा खणोनी
तारीले आम्हाला त्या खाचेमधुनी खाचेमधुनी
खडकावरी त्याने केली धर्म स्थापना ।। १ ।।
निंदीले जरी तुम्हाला सर्व मानवांनी
घाबरू नका तुम्ही ऐका माझी वाणी
न्यायी परमेश्वर नष्टकरी दुर्जना ।। २ ।।





पेर प्रभुवचनाचं बी जनांच्या मनात
सोपविली सेवा त्याने तुमच्या हातात
सुवार्तेची ठेवा तुम्ही मनी ही भावना ।। ३ ।।

### १७८. यहोवा जयकार करू

यहोवा जयकार करू या ख्रिस्त सुवार्ता गाजवूया ।। धृ ।।
माझे जीवन हे येशुप्रियावीन आसता जरी धनवान
मानव जीवनी प्रभू येशू हा सर्वसुखाची खान
त्या येशुची कास धरुनिया ख्रिस्त जगाला दाखवूया ।। १ ।।
मेघारूढ प्रभू होउनी येईल जगती न्याय कराया
निष्कलंकही पापाची या अर्पू प्रभुला काया
सोडुनी द्या हो मतभेदाला
ख्रिस्त राज्य जगी स्थापू या ।। २ ।।

### १७९. प्रभूजीचा करू जयकार

प्रभूजीचा करू जयकार नाम त्याचे अमृताची धार ।। धृ ।।
स्वर्ग पृथ्वी फुले वैभवाने मांगल्याचे लेवून लेणे
हर्षे नसे तया अंतपार ।। १ ।।
तव नामाने येतो तो धन्य गौरव त्यास जाहाला मान्य
तोच जाळील अवघा पाप भार ।। २ ।।
सर्व समर्थ जय प्रभू देवा सेनाधिपती मंगल देवा
हृदयाच्या गळा घालून हार ।। ३ ।।

### १८०. परमेश्वराचे गाऊ गुणगाण

परमेश्वाराचे गाऊ गुणगाण
तनमनधन सारे करुनिया दान ।। धृ ।।
आम्हा पतितांसाठी तो जन्मास आला
नम्रतेचे पहिले प्रतीक दाविले आम्हाला
तू सदैव थोर असता झाला लहान ।। १ ।।
नाना तऱ्हेचे तयाने चमत्कार केले





सहनशीलतेचे धडे शिकविले
तारणासाठी त्याने क्रुसी दिला प्राण ।। २ ।।
ख्रिस्त अनुकरण अंगी करावे
प्रार्थनेने नेहमी त्याला स्मरावे
शिकवणीची त्याच्या ठेवूनी जाण ।। ३ ।।

## १८१. ख्रिस्त धन्याचं शिवार

ख्रिस्त धन्याचं शिवार कापनीची वेळ रे
जाऊ चला शेती जाऊ चला ।। धृ ।।
दृष्टी लावा हो पीक धन्याचे दिसते हिरवे गार रे
ख्रिस्त धन्याने दिली खंडणी स्व–रक्ताची खाण रे ।। १ ।।
निंदन पसारा हो ऽऽऽ धनी सावरील न्याय विळा हातात रे
आज्ञा देईल गहू साठवा आपुल्या कोठारात रे ।। २ ।।
अंजिराच्या हो ऽऽऽ द्राक्ष वेलीचा बाग किती तरी छान रे
शांती दयेची हाती गोफण आमुचा राखणदार रे ।। ३ ।।

## १८२. गा मिळोनी जगदिशाला

गा मिळोनी जगदिशाला या आनंदे जय जय बोला ।। धृ ।।
सर्वस्व अर्पुया त्याला विधवेच्या आठवूनी हो त्या
या आशीर्वाद घ्यावया आळवू या त्याला
विश्‍व कर्त्याला जीवनी पाणी मिळवाया ।। १ ।।
जाईल रात्र उलटुनी शुभ प्रभात आली जवळी
काळोखी कर्म सोडूनी कवच लेवूनी प्रभुच्या
सदनी जगी प्रकाश आवघा पडला ।। २ ।।

## १८३. बघ त्रैक्य गुणाचा

बघ त्रैक्य गुणाचा एकांगी
ख्रिस्त माझा आहे जगी रंगी ।। धृ ।।
जो अहंतेच्या राशी, साथ जगताशी
तो जोवरी भूवरी तोवरी नर नच सुखी





का मनुजा ख्रिस्त भंगी ।। १।।
तो अनादी अनंत वैद्य येई भुवरी
तो निज रक्तानी पार साथ लया नेई
मानवतेचा पुरा बंधी ।। २।।
या ख्रिस्त दासा आता नुरली न भीती मृत्युची
तो उठता झाला आपुल्या मरणातुनी
तोडी मृत्युची पार नांगी ।। ३।।

## १८४. जय प्रभू राज

जय जय जय प्रभू राज मंगल सुख धामा ।। धृ ।।
पतित पावना विघ्न नाशका सर्व जगाच्या पाप हरना
निज चरणाच्या मधूगण गाणा सदनी ही रचना ।। १ ।।
भव भय हरना सद्‌गुरू रमना सकल मने धरी तव चरणा
उध्दरीले त्वा सकल पतिता सारुनी दूर तमा ।। २ ।।

## १८५. ख्रिस्त धनी

ख्रिस्त धनी तव मालक आसता सांग उणे रे कशाचे तुजला ।। धृ ।।
शिधा रोजचा देवूनी तुजला कधी उपवाशी सांग निजविले
का मग चिंता किटक साचे ।। १ ।।
किटक मुंग्या का त्या भरवितो गजवत जे त्या मण भर देतो
निज नदिचे दीप तेजाचे ।। २ ।।
प्रभू नामाचा मंत्र जपावा ख्रिस्त ख्रिस्त जय गजर करावा
दास म्हणे हे गुज सौख्याचे ।। ३ ।।

## १८६. वारंवार मी देणार ग्वाही

वारंवार मी देणार ग्वाही ख्रिस्ताचा सरदार
तो माझा सुभेदार आहे मी त्याचा सरदार ।। धृ ।।
ख्रिस्ताची फौज मोठी आहे डौलदार रे
मधुप्रेमाची प्रभुरायाने हाती दिली तलवार रे
राज्य वाढवू परमेशाचे तारण करुया नर आत्म्याचे





दुष्ट आत्म्या करुनी ठार ।। १ ।।
स्वर्ग आहे आमुचा किल्ला ख्रिस्त किल्लेदार रे
विश्वासाने जाऊ मार्गी ख्रिस्त उघडील द्वार रे
पश्चतापे हाक मारू चरण तयाचे घट्ट धरू
तोचि तारणहार ।। २ ।।
फौजेसाठी प्रभुरायाने साहिले बहू दुःख रे
खांबावरती प्राण अर्पुनी जिंकीले मरणास रे
उद्धार केला सर्व जगाचा मार्ग दाविला तारणाचा
धन्य तारण हार ।। ३ ।।

## १८७. कार्यात सदा तू दंग जसा

कार्यात सदा तू दंग जसा शुद्ध भाव मनी तू ठेव असा ।। धृ ।।
परोपकारी हा तुझा देह सदा झिजवावा मनुजा तू पुरता
शरीरी जळतो हा द्वीप जसा तरी प्रकाश देई मंद कसा
तू थांब जरा भिऊ नको असा साह्य करील रे प्रभू तुझा ।। १ ।।
घे वचन प्रभुचे हे हाती गाजीव सुवार्ता या जगती
खरी शिकवण ही प्रभुरायाची प्रीती दावी जगा बंधू भावाची
तू थांब जरा आज्ञी हो
चाल झणी आता दावी जगाला धर्म असा ।। २ ।।

## १८८. तुझ्याच पाठी

तुझ्याच पाठी तुझे घेवूनी नाव दाविला निज शिष्यांनी प्रभाव
तुझ्याच पाठी ।। धृ ।।
पाप अंधेरी वाट चालती आस तुझ्यावर पार टाकून
उमटलेल्या तुझ्याच पाउली दावी सुखाचा जगती ठाव ।। १ ।।
नर अंतरी भरले काळे वर दाविती जसे पांढरे
बाळा म्हणूनी वदती वचने घात करण्या रचिती डाव ।। २ ।।
मोहा चक्री मानव सगळे घिरट्या घेऊन झाले आंधळे
नेत्रा दिसेना म्हणूनी म्हणती रूप देवाचे कसे आम्हा दाव ।। ३ ।।
दास म्हणे ख्रिस्ता तू मोडली नांगी मृत्युची पुनरुत्थानी
म्हणून शक्ती पतिता मिळाली स्वर्गगृहाकडे मारण्या धाव ।। ४ ।।





## १८९. गाऊ या गुणगान

गाऊ या गुणगान प्रभू चरणी शीर लोळवा ।। धृ ।।
लोभ असावा प्रभू नामाचा त्यात असावा मान दयाळा
या जगती या करुनी घ्यावा इश्वर आपुला ।। १ ।।
जन्मभरी रे लाभू दे देवा प्रीती नीतीचे स्थान दयाळा
तव सदनाशी मी मागाया परतुनी ना लावी तू मला ।। २ ।।
मधू रसाची जाणीव देवा दीन पामरा तुची सत्वरा
जग कल्याणा धावूनी आज प्रेम करी मानवा ।। ३ ।।

## १९०. दु:ख सांगावे

दु:ख देवाला सांगावे हे सुख देवाला मागावे ।। धृ ।।
देव प्रेमळ प्रेमळ देव आहेच निर्मळ
डोळे मिटुनी बघावे ।। १ ।।
देव मागे देव पुढे देव आहे चोहिकडे
डोळे मिटुनी बघावे ।। २ ।।

## १९१. देव येई घरी पाहुणा

ख्रिस्त प्रभूच्या उपकाराची जाणीव ठेव मना
देव येई घरी पाहुणा ।। धृ ।।
धुंद नको रे होऊ जीवनी या विश्वाची नाव अधांतरी
वादळ येता बुडते सागरी नाही कुणा कल्पना ।। १ ।।
समजू नको रे व्यर्थ हा देह जाईल वाया कुणी न सहाया
कोणी कोणाचे नच प्रेमाचे ।। २ ।।

## १९२. पाहा येशू मित्र कसा

पाहा येशू मित्र कसा सर्वांपेक्षा ममताळू ।। धृ ।।
पापीजन तारायाशी खाली तो उतरला
धनी सृष्टीचा असताना गव्हानीत निजला ।। १ ।।
आशीर्वाद घ्यायासाठी लोक बाळ आणिती
शिष्य धिक्कारता पाही निशिधिले त्याप्रती ।। २ ।।





मारीया मार्था यांचा भाऊ लाजरस हा जो मेला
दु:खी होउनी तेव्हा कन्हुनिया रडला ।। ३ ।।
शिष्य नम्र होण्यासाठी पाय त्यांचे धुतले
रुमालाने पुसुनिया उदाहरण दावियले ।। ४ ।।
पाप्यांसाठी दु:ख निंदा पाठलाग सोशिला
खिळे भाला साहुनिया प्राण त्याने सोडीला ।। ५ ।।
आता स्वर्गी असुनी करितसे मध्यस्थी
आम्ही लवकर फिरावे वेळ हो झाला किती ।। ६ ।।

## १९३. सर्व जगाला त्यागुनी देवा

सर्व जगाला त्यागुनी देवा
मित्र तुझा बनलो अनुयायी बनलो ।। धृ ।।
शिल्प व्हावे वाटे मजला तव सेवेशी जीव हा जडला
मारुनी शिक्का तव जन्माचा भव अग्नी मी तरलो देवा ।। १ ।।
जाशील तेथे तव मी संगे भटकत राहील युगानयुगे
अंतरयामी तू अनुरोग शुद्ध मनी मी स्मरलो देवा ।। २ ।।
तुज पुढती हे लपवू कैसे पातक माझे हे डोंगरा जैसे
वंदतो सदया आम्ही विश्वासे अनुतापे मी हरलो देवा ।। ३ ।।

## १९४. ख्रिस्त आमुच्या चित्ती

ख्रिस्त आमुच्या चित्ती, नाही आम्हास भिती
नवजन्मांती त्याने आम्हास अंगीकारीले ।। धृ ।।
पर जगी न कळे दु:ख हे कसे
या जगात आमुच्या वाटे सुख ना आले
ख्रिस्ताविना नाही अमुचे जीवन जगातले ।। १ ।।
प्रभुवर अवतारी जन्मले इथे नांदले
मेले परंतू पतितांसाठी काय केले
मृत्यू जिंकण्या ते धजले अंखेर जगावले ।। २ ।।
घडी हर घडी वदले खिस्त प्रभूने
सर्व सोडोनी पतिता माझ्या मागे ये रे
केले माझे पुनरुत्थानी जीवन तुला खुले ।। ३ ।।





## १९५. घाबरू नको तू

घाबरू नको तू दुष्ट सैतानाला
प्रभू सावरील हाक मार त्याला
खऱ्या विश्वासाने ठोक दार त्याचे
प्रभू घालवील भय सैतानाचे
कशी रे मिळाली शक्ती हीनाला ।। १ ।।
धरीलास का तू लोभ नैश्वराचा
त्याग करुनी परमेश्वराचा
करी बलवान शक्तीहीनाला ।। २ ।।
लीन होवूनीया करी पश्चताप
प्रभू घालवील तुझे सर्व पाप
करी पश्चाताप होई पाप मुक्त ।। ३ ।।

## १९६. वाहीला चरणी तुझ्या

सारा जीवभाव माझ्या प्रभू देवा
धन्य धन्य तुझे नाव ।। धृ ।।
घेतोस जवळी आणि देतोस धीर
तुझ्या प्रार्थनेसाठी जीव हा अधीर
तुझे नाव घेता जाती मनातील घाव ।। १ ।।
तूच संपविशी देवा जीवनाचा घोर
जाणली मी आहे लीला तुझी थोर
अंध पंगूंच्या रक्षणासाठी घेतलीस धाव ।। २ ।।
अंध पंगू वा कोणी संत येवो तुझ्यादारी
मनातील चिंता मिटविशी सारी
अनेकांना कळले येथे ना दूजा भाव
माझ्या प्रभो देवा धन्य धन्य तुझे नाव ।। ३ ।।

## १९७. थांब देवा मग तू ये रे

थांब देवा मग तू ये रे जरा थांब देवा मग तू ये रे
माझ्या देह देवळी टाकू दे रे सांज सकाळी
भक्तीची रांगोळी ।। धृ ।।





या जगी पापे करुनी शिणली रे माझी काया
मन असे शुद्ध माझे सांभाळ तू देवराया
दया कर आम्हावरी देते मी आरोळी ।। १ ।।
निश्पापी माझे मन
पापी असुनी केलीस मजवर अपार प्रिती
पापांनीच झाली आत्म्याची ही होळी ।। २ ।।

## १९८. कधी येशील

कधी येशील प्रभू सांग आम्हाला
कधी येशील दीन नाथा रे डोळे लागले तुझ्या दिशेला
चैन नसे या चित्ता रे ।। धृ ।।
जीव तळमळे तुझ्या दर्शना धीर नसे ह्या खुळ्या लोचना
युगे युगे मी तुझी वाट पाहिली तू येण्याची वार्ता ऐकली
किती काळ अंत पाहशी तूच एक दाता रे डोळे लागले **...**।। १ ।।
पापाचा कर नारा प्रभू तू दे पुण्याला जागा रे
जग सारे स्वार्थात बुडाले तू प्रभू तारण दाता रे
योहानाची ऐक प्रार्थना ये झनी धावून आता रे
चैन नसे या चित्ता रे ।। २ ।।

## १९९. कोण तुझ्यावीन देवा सोडवीन

कोण तुझ्यावीन देवा सोडवीन
सैतानाचा फासा बैसला शाबूत ।। धृ ।।
कैसा दुर्जनाच्या संगती रंगलो
दुष्ट वागण्यानं पित्याला मुकलो
सैतानी कावळे मला फाडतील ।। १ ।।
कृपावंत देवा क्षमाशील देवा
पश्चतापी पाप्या देई हा विसावा
अंधाराच्या वाटा सुखाने चालेल
झाले झाले सारे देहाचे वाटोळे ।। २ ।।





## २००. धाव रे प्रभुराया

धाव रे माझ्या प्रभुराया
हालेलुया, हालेलुया हालेलुया ।। धृ ।।
काय देवा दुनिया तुझी उलटी रे कशी
नाम तुझे विसरले धन लोभापायी
कर त्यांच्यावरी तू दया ।। १ ।।
सैतानाने डाव असा कसा रे साधला
फळ देऊन फसविले मानव प्राण्याला
सारी झाली ही पापी दुनिया ।। २ ।।
देवाच्या मानसा तू असा कसा फसला
सत्यधर्म सोडूनी कुठे जावूनी घुसला
ये ना लवकरी न्याय कराया ।। ३ ।।

## २०१. ख्रिस्ता तुझा हात

ख्रिस्ता तुझा हात माझ्या जीवनात असो सदोदीत
सखया मला धीर द्याया ।। धृ ।।
आज मिळे सुख या जगताचे खडतर किती दुःख मजला साचे
व्यर्थ झिजे काया ।। १ ।।
आप्त गोत्र मित्र जरी दिले मजला कोणी न ये कामी संकटकाळी
सारी आशेची दुनिया ।। २ ।।
तुजविना मज मरणच माझे ठेव मृत्युंजय तुझ्यात मा ते
विनंती तव पाया ।। ३ ।।

## २०२. त्वा केले

त्वा केले त्वा केले त्वा केले रे ।। धृ ।।
अवघ्या पतिता आपले ख्रिस्ता त्वा केले त्वा केले
पापाच्या कानानी स्व चालून दावी
सौजन्याने नीट वाट सत्त्याची म्हणे पतिता उचल पाउले ।। १।।
पापाची रोज करी जाणून चोरी होऊन राही नित्य दुष्टांचा कैदी
परी त्वा घातुक्या केले बा खुले ।। २।।





## २०३. प्रभो संदेश घेऊन मी

प्रभो संदेश घेऊन मी घरी अखेर का जातो
कधी धरणीस अंथरतो कधी आकाश पाघरतो ।। धृ ।।
कधी सत्कार ही होतो कधी धिक्कारीला जातो
तरी जीवनाचा मी, संदेश पोहचवितो ।। १ ।।
कधी घडतात उपवास कधी होतात जनताप
तरी तारणाचा मी संदेश पोहचवितो ।। २ ।।

## २०४. कोणी नसे कुणाचा

कोणी नसे कुणाचा बंधू सखा रे आपुला ।। धृ ।।
कैसा करू भरोसा या आप्त मंडळीचा
सर्व सुखाचे साथी कोणी नसे कुणाचा
येताच संकटेही, सोडीती साथ आपुला (२)
खोटे हे सर्व नाते प्रभू एकलाची आपुला ।। १ ।।
भ्रम हा तुझा जीवा रे झाला कसा कळेना
परके हे सारे वेडया म्हणती आपुले ज्याला
आभास हा सुखाचा निर्माण तूच केला (२)
खोटे हे सर्व नाते प्रभू एकलाची आपुला ।। २ ।।
चल रे जीवा आता दोघे मिळून जाऊ
ना सोबती ना साथी आई ना बाप भाऊ
सुख दुःख आयुष्याचे कंठावयाचे तुजला (२)
खोटे हे सर्व नाते प्रभू एकलाची आपुला ।। ३ ।।
देवा मला दे आता तव हात आसऱ्याचा
सोडू नको तू मजला आधार तूच माझा
तू घातलेस जन्मी लावी आता तीराला (२)
खोटे हे सर्व नाते प्रभू एकलाची आपुला ।। ४ ।।

## २०५. माझिया सुखाचे

माझिया सुखाचे स्थान जगी ना कुणा ठायी
ख्रिस्त माझे हे जीवन तोच बाप आई ।। धृ ।।





शेत सुगीच्या समयी पक्षीयांचे कळप येई
खावूनी धान्य पोटभरी मारीते भरारी
तैसे संपत्तीच्या काळी मित्र गोत्र भारी
नष्ट होई जे संपत्ती जाती आपुल्या घरी ।। १ ।।
दास म्हणे जगे मासा पाण्याच्या ठिकाणी
तैसे प्रभू अक्षय ठेव मला तुझ्या पायी
निर्लोभी तू माझे गोत्र निर्लोभी तू मित्र
युगानुयुगीचे आपुले सुत्र ठेवी माझ्या हृदयी ।। २ ।।

## २०६. ऐश्वर्याचा सापडे मज ठेवा

ऐश्वर्याचा सापडे हा मज ठेवा
ऐश्वर्याचा सापडे हा सापडे मज ठेवा
पवित्र शास्त्र जीवन दीप करी प्रकाशित मज मना ।। धृ ।।
भूस्थळ जलास्थळ नभतील वसतीस्थान
शास्त्री यांच्या बुद्धी पार तयामध्ये शोध फार
ऐसे सर्वसुख त्यामध्ये दाविले देवाने हे मानवा त्रयरूपा ।। १ ।।
दास म्हणे देवा देई ऐसे अस्त्र समजण्या मी ते पुण्यशास्त्र
करी जडीत सदा आपुले हे बापमुलाचे नाते रे
हे दावी बा साऱ्या जगा ।। २ ।।

## २०७. ठेवी देवा जल गाळ

ठेवी देवा जल गाळ जैसा अविरत संग आपुला
तैसा दयाळा कधी रे होईल संग तुझा माझा
ठेवी देवा ।। धृ ।।
आहे पारख तुला माझी रे मुळापासुनी पाषाणाची
सोडीले म्याची तुला ।। १ ।।
तुझ्या प्रीतीच्या जीवनी धारा म्याच थांबिल्या मोहाकरवी
ओ देशी सांग कदा ।। २ ।।
अंतर्यातील पाप भूमी ते पूरा वाहू दे मुळापासूनी
राहू दे शुद्ध जला ।। ३ ।।
दास म्हणे ख्रिस्ता तू जलासारिखा ठेव स्थळी तुझ्या मज गाळा
आहे तू माझा सखा ।। ४ ।।





## २०८. नभावरी स्वर्ग

नभावरी स्वर्ग माझं गाव तेथे मला जायाचं राव ।। धृ ।।
काय सांगू दादा ही स्वर्गाची मौज
दूतांचा मेळा सभोवरी साजे
तेथेच असतो माझा प्रभुराज
निशिदिनी गाई प्रभू नाम ।। १ ।।
मारीयाबाई स्वर्गाची राणी
स्वर्ग हा भरला साधू संतांनी
मंगल मंगल म्हणतात गाणी
देवा माझ्या शब्दाला पाव ।। २ ।।
नको जगात आज राहण्या
पापी ही झाली सैतान काया
आजवरी गेलो मी व्यर्थ वाया
दु:ख होई मुळी न राव ।। ३ ।।

## २०९. धीर धरा

सोडू नका धीर धरा शुभवृत्त गाजवा
ख्रिस्त हाच तारणारा पातक्यांना दाखवा ।। धृ ।।
घेउनिया हाती शास्त्ररूप दीप
अंधारात चाले सैतानाचे पाप
विश्वाच्या बाजारात अनितीचे माप
शास्त्राच्या आधारे जगताला सांगू ।। १ ।।
मानवाची वृत्ती पाहा खोटे बोलण्याची
दुसऱ्याचा घात पाहा सदा योजण्याची
पर्वा न या ख्रिस्ती जीवनाची
शास्त्राच्या आधारे जगताला सांगू ।। २ ।।
सुवार्ता दादा रे सुवार्तिक बाई
सैतानाने माजविली जगात दुष्टाई
शास्त्राच्या आधारे जगताला सांगू ।। ३ ।।





## २१०. नाशवंत सांभाळी

नाशवंत सांभाळी धनवंत तो
आत्मनाश सांभाळी गुणवंत जो ।। धृ ।।
हुरहुर वाटे सुख संपता कुरकुर काढी वाट लुटता
धुंदी कैफाची देई बहकुनी पंच प्राणास राही बिलगुनी
तेच सत्यगुणी देहची कुलवंत तो ।। १ ।।
संघ साधकाला दैवी प्राप्तीचा तो
दास चुकलेला क्षमा याचितो भंगलेल्या दुबळया या देहाला
त्रस्त झालेल्या माझ्या गोत्राला स्पर्श व्हावा दैवी प्रितिवंत तो ।। २ ।।

## २११. येशू पाप्या बोलवी

बोलवी बोलवी बोलवी येशू पाप्या बोलवी
होऽऽऽ मोदाने स्व करे गोंजारी नेई सुखाच्या स्थानी ।। धृ ।।
कष्टावलेले भ्रष्टीत सारे पापात मेलेले या या
मुळारंभीचा देव सुखाचा वाटा तुमचा हो घ्या घ्या
हर्षाने सामोरा येवूनी पश्चातापाच्या वाटी ।। १ ।।
पुनरुत्थान मी जीवन तुमचे आत्मदीप दिला तुम्हा
त्याच्या प्रकाशी मार्गक्रमा रे येताल माझिया घरा
नव्याने जन्मोनी या झनी मी पाजी जीवनी पाणी ।। २ ।।

## २१२. ना केला गोठयाचा नाकार

ना केला त्वा जन्मी रे गाई गोठयाचा हा नाकार
अंतर माझे घर तुझे करण्या घेऊ नको तू माघार ।। धृ ।।
पाही डोळा भरुन तुजला कोण तुझा मी बेईमान
माझा मी केला मोहाकरवी जीवनी सारा अंधकार ।। १ ।।
म्हणून चाले सृष्ट सुखाचे विचार माझे रात्रंदिन
कोण तुझ्याविन तारण भयाचे तोडील अवघे बंध पार ।। २ ।।
मृतागत विश्व आहे अवघे कोण कुणा न् तारणार
परंतू ख्रिस्ते लाजारा केले मरण जीवंत साक्षिदार ।। ३ ।।





## २१३. देव आले माझ्या घरी

देव आले माझ्या घरी, घर माझे जैसी घाण मोरी ।। धृ ।।
थांब जगत्राता करी साफ घट द्रव्याचा मधी पाप
देवा मज तव भक्तीची फावडी पश्चतापे कष्टाने करी साफ
तूच दयावंता केली प्रीती पाप भ्रष्टीत जगा दिली शान्ती ।। १।।
मृत्यु आसनावरी तू बैसुनी केला पाप नाश पुनरुत्थानी
पाप भूक हरली माझ्या आत्म्याची
झाली तृप्ती माझी खरी प्रभू भोजनी
ख्रिस्त शरिराची मी खायी भाकरी
रक्तसाक्षी द्राक्षरस प्यालो मी ।। ३।।

## २१४. स्वर्ग राज्यात आम्ही चाललो

तारणाच्या होडीत आम्ही चाललो ।। धृ ।।
तेथे मी पाहीन नोहाला
नोहा तेथे असणार तारू तेथे नसणार (२) ।। १ ।।
तेथे मी पाहीन योनाला
योना तेथे असणार मासा तेथे नसणार (२) ।। २ ।।
तेथे मी पाहीन एलियाला
एलिया तेथे असणार कावळा तेथे नसणार (२) ।। ३ ।।
तेथे मी पाहीन पेत्राला
पेत्र तेथे असणार कोंबडा तेथे नसणार (२) ।। ४ ।।
तेथे मी पाहीन येशूला
येशू तेथे असणार सैतान तेथे नसणार (२) ।। ५ ।।

## २१५. अन्मोल या प्रीतीला

अन्मोल या प्रीतीला कवटाळुनी धरावे
प्रीती तुझी स्मरावी हृदयात साठवावी ।। धृ ।।
देवाने या जगावर अनमोल केली प्रीती
धाडीला पुत्र जगती जोडावयास नाती
प्रभू येशुच्या प्रीतीची आठवण सदा करावी





प्रीती तुझी स्मरावी हृदयात साठवावी ।। १ ।।
प्रभू येशुच्या प्रमाण वधस्तंभ हे निशाण
आम्हा पापीयांच्यासाठी दिला क्रुसावरी प्राण
राजांचा रंक झाला पाप्या क्षमा मिळाली
प्रीती तुझी स्मरावी हृदयात साठवावी ।। २ ।।

## २१६. प्रभू चारितो मेंढरं

गावाच्या बोहर उंच डोगरावर प्रभू चारितो मेंढरं हो ।। धृ ।।
शंभर मेंढरं काठी खांद्यावर मारितो हाका या माझ्या बरोबर
आहे माझा आधिकार ।। १ ।।
तोच प्रेमे चालवितो रम्य कुरणात नेतो कुरणात आम्हा चारी
तहान भूक दूर सारी आहे कैवारी आम्हा बरोबर।। २ ।।
कैवारी येशू भारी प्रीती करी आम्हावरी
हुकलेले चुकलेले शोधितो लवकरी
घेई उचलून खांद्यावर होई आनंद त्यास फार ।। ३ ।।

## २१७. देवाचा कोंकरा

जगाचे पाप हरण करणारा पाहा देवाचा कोंकरा ।। धृ ।।
पतितांसाठी स्वर्ग सोडुनी जगती तो आला धाऊनी
तारियेला जगा देउनी प्राण या प्रीतीला स्मरा खरोखर ।। १ ।।
खांबावरती हा खिळलेला तरीही कोणा न कळलेला
जीवनी झरा खरोखर ।। २ ।।
काही कळेना काय करीती अज्ञानासम अजुनी असती
लावू नको दोष तयाप्रती
ख्रिस्त हा विनवी खरा पित्याला ।। ३ ।।
पाप जगाचे घेऊन गेला तारण दिधले पापी दीनाला
पूर्ण जाहले म्हणूनी वदला सोपवी परमेश्वरा आत्मा ।। ४ ।।





## २१८. युगाचिया युगे गेली पलटुनी

युगाचिया युगे गेली पलटुनी मानवाची वाट पाहे देव महान ।। धृ ।।
सोडणार नाही वासरात गायी
आईविना बाळ कधी राहणार नाही
कैसे तुला सोडतील नरा जगजेठी
जगन्नाथ चालवितो सर्व सृष्टी ।। १ ।।
पाखराची पाहा पिलावर प्रीती
झाडावर बांधुनिया अवघड घरटी
चारा धरोनिया अपुल्या चोचीत
बाळासाठी कधी कधी उपवासी राही ।। २ ।।
तैसी ख्रिस्ता केलीस आम्हावर प्रीती
खांबावर देउनिया प्राणाची आहुती ।। ३ ।।

## २१९. मठ प्रीतीचा मी केला

मठ प्रीतीचा मी केला प्रेम संन्यास घेतला ।। धृ ।।
प्रेम अंबर घेउनी केली प्रीतीची कफणी
विणा प्रीतीचा घेतला झोळ हा बांधिला ।। १ ।।
प्रेम भिक्षा मागण्यास लागलो मी हिंडायास
भिक्षा कोठेही मिळेना प्रेम कोठेही दिसेना ।। २ ।।
हृदयात मनुजाच्या प्रीत ठेवली निद्रिस्थ
ख्रिस्तदास प्रेम लोटी सत्य माळ घाला गळी ।। ३ ।।

## २२०. शिष्यांवरती करून प्रीती

शिष्यांवरती करून प्रीती नित्य करी सांभाळ
ख्रिस्ता तूच खरा मेंढपाळ ।। धृ ।।
भव रानी या तुझी मेंढरे बागडताती आनंदाने
टपला व्याघ्र येउनी मुख पसरी विक्राळ ।। १ ।।
क्रूर पशूंच्या जबड्यामधुनी सोडविले त्वा धावत येउनी
तारीयले तव जीवन देउनी केलासी प्रतिपाळ ।। २ ।।
चाले पुढती तुझिया मागे पावला वरती टाकीत पावले
तुझिया कुरणी चारा हिरवा अखंड असे सुकाळ ।। ३ ।।





## २२१. अरे ख्रिस्ता

अरे ख्रिस्ता मला तुझ्या प्रेमानं भारलं
माझ्या मनानं तुलाच वरलं
सैतानाची खुळचट वाणी लागली भुलवायला
तेव्हा देवाचा सरदार हा आला सैताना तुडवायला ॥ धृ ॥
मानव नव्हता कोणी सुखी जनता सारी होती दु:खी
येशू हा बाळ मारियेचा बाळ आलाय हसवायला ॥ १ ॥
लुळे पांगळे बोलते खुळे कुणाला हात पाय नव्हते डोळे
येशूने सारे केलेत बरे लावलेत पळवायला ॥ २ ॥
मानुसकीचा नव्हता धडा ख्रिस्त येशुने दावला खरा
प्रेमाचा झरा पटपट भरा आलाय आडवायला ॥ ३ ॥

## २२२. प्रीती

प्रीती प्रीती तव झांज वाजते अवाज नये तिचा पुरा
भेद भावना तुझ्या अंतरिचे
सोडून मग प्रीती झांजेचा नाद खरा ॥ धृ ॥
काईनाने भावावरती केली वरवर प्रीती
जरी रक्त एक दोधांचे ते उठले त्याच्यावरती
सुडबुद्धीने ते पेटुनी उठले मोठेपणाच्या स्वार्थापायी
विसरुनी गेला नर नरा ॥ १ ॥
याकोबाचे पुत्र बारा एक योसेफ होता खरा
भविष्याची वाणी सांगे नाही पटली त्यांना जरा
जरी चढले ते उंच पदावर पाहुनी आपुल्या प्रिय जनांना
नाही झरल्या प्रीती धारा ॥ २ ॥

## २२३. झाला माझ्यासाठी रे

झाला माझ्यासाठी रे कुंभारासारीखे
घडीलेस तनू माझे विशिष्ट हेतूने ॥ धृ ॥
तुझी पडलेली छाया हेची माझे रूप
दाविलीसी तुची माया धरुनी समीप





तेवी मम प्राण ज्योत आपल्या श्वासाने ।। १ ।।
तुझ्या शब्दी तुची केला विश्वासाचा विस्तार
सर्वाहुनी मी आगळा तुच केले थोर
तेणे तुझे आणि माझे तुटले बंधन ।। २ ।।
माझा मीच केला देवा घात तळी पायी
मृत्यू सखा जोडियला मीच लवलाई
आहे तुइया मरजीवर मडक्याचे जगणे ।। ३ ।।

## २२४. दवडू नको घडी गोड रे

दवडू नको घडी गोड र
तेढ मनाची सोड त्वरे ती
ख्रिस्ता पदी प्रीती जोड रे ।। धृ ।।
धावत फिरती सैरावैरा
कैवारी नच प्रभोवीन दुसरा भग्न हृदयी घडी फोड रे ।। १ ।।
घेउनी पदरी पातके आपुली    शरणागत जा प्रभू पदकमली
सद्‌भावे संग जोड रे ।। २ ।।
हृदयी प्रभूवर दे मज थारा
हाती तूझा रे होई निवारा येशू करील तडजोड रे ।। ३ ।।

## २२५. ज्या प्रीतीचे वर्णन करण्या

ज्या प्रीतीचे वर्णन करण्या शब्द भांडारात पडे वाण
तोच माझा प्रभू बलवान ।। धृ ।।
प्रभुराया ही तुझी कहाणी
हृदयी अमृत नयनी पाणी
मृत्यू रडला जो तो पाहुनी
खांबावरी तुझे बलीदान तोच माझा ।। १ ।।
पाषाण हृदयी कालवरी तो
तवप्रितीची महती गातो
स्वजनांचे स्तंभ फडकतो
सांगे जगा तोच पुनरूत्थान तोच माझा ।। २ ।।





जो जो जगती जन्मा आला
मृत्युपुढती अखेर नमला
जिंकीयले तू परी मरणाला
हाच धरू मनी अभिमान तोच माझा ।। ३ ।।

## २२६. माझ्या ख्रिस्ताची माया

माझ्या ख्रिस्ताची माया जगा वेगळी
केली सैतानी बंधने मोकळी ।। धृ ।।
आंधळयास ती दृष्टी देवूनी
दिली दावूनी प्रीत आगळी हो
त्याची प्रीत आगळी ।। १ ।।
शुद्ध झाली रक्तस्त्रावेली पापी स्त्री मुक्त झाली
फुले मनकळी हो त्याची फुले मनकळी ।। २ ।।
क्लेश निंदा सहन करुनी प्राण क्रुसी अर्पुनी
देई आरोळी ख्रिस्त देई आरोळी ।। ३ ।।

## २२७. ख्रिस्त प्रीतीची मोजणी

ख्रिस्त प्रीतीची मोजणी करण्या आले विश्व सगळे
तरी तिची ती उंची लांबी रुंदी कोणा ना कळे ।। धृ ।।
देह धारुनी नर जन्माचे हीत काय ते जगा दाविले
प्रतिरुपा परी मानव सगळे परमेशाचे अंशच ठरले
म्हणूनी नरा रे हीत कोणते जाणून घे आपुले
पिता पुत्र पवित्र आत्म्याने तुज त्यासम केले ।। १ ।।
ख्रिस्त नर हा जगी एकला त्रय रुपामध्ये गणलेला
खऱ्या जगाचे पाप मुळाचे ओझे वाहून तो मेला
मरणा मधुनी पुन्हा उठले ऐसे दैवत ना दुजे
म्हणूनी ख्रिस्तामध्ये तारण आले साऱ्या पतिता भले ।। २ ।।
येथे पाप्या खोल रे आता सर्व सुखाचे आगर पुरे
नव जन्माचा लाभ एक हा प्रभू भोजनी जय ख्रिस्त खरे
घे घे पाप्या पोस रे आत्म्या हेच अमृत साचे
जय ख्रिस्त तो अंत:करणामधे
राही युगानयुगे ।। ३ ।।





## २२८. कैसी वर्णू मी तव प्रीती

कैसी वर्णू मी गा तव प्रीती बा तूच माझा धनी बा
तूच मन्मनी कैशी वर्णू मी गा तव प्रीती ।। धृ ।।
कडाडूनी घात करण्यास वीजपडे अंगावरी
तरी तू तयाशी दूर सारी बा ।। १ ।।
पाही डोळयांनी का न जगा सांगू प्रभूजी तुझी रे प्रचिती
निवारी अन्य संकटाशी बा ।। २ ।।
भाव भक्तीचा तूच पाहून राही सदा भक्तापाठी
ठेवी आश्चर्याच्या राजी बा ।। ३ ।।

## २२९. दे परमपित्या

दे परमपित्या कृती दयाशीला मज दे नीती
जाणू सकला तुझीच ख्रिस्ता प्रीत जगा उद्धारती ।। धृ ।।
मृतजण सुखाया जितजण हिताय श्रद्धेवरती जागू
सहिष्णुतेचा बाणा आपुल्या अंगी घेऊन वागू
मृत्युंजयाचे जीवनकार्य शिकवी पाहा जगा तो उपकृती ।। १।।
बहुजण नमाय दु:खी जण सखाय स्वदेहा विसरून जाऊ
अंध पंगुंचे भार वाहुनी साथी तयांचे राहू
ख्रिस्त प्रभुची शिकवण सांगे ठेव नरा सेवा कृती ।। २।।
त्रय नाम जपाया सुखकर उपाय नामं सुवंदे गाऊ
आस तयावर फार ठेवुनी क्रुस आपुला वाहू
मृत लाजरा होऊन साक्षी म्हणे ख्रिस्ताविन ना मुक्ती ।। ३।।

## २३०. प्रेमयुक्त जीवनाची किल्ली

प्रेमयुक्त जीवनाची किल्ली तूच ना
खोल अंतरीच्या द्वारा ख्रिस्ता तू ये ना ।। धृ ।।
असे सैतानाने जिंकून नेले राज्य स्वत:चे स्थापित केले
घाव घाली जीवना तू क्लेश होती ना ।। १।।
फसवून त्याने मज भ्रष्टविले तव आज्ञेला मी धिक्कारिले
जीवलगा ख्रिस्ता माझ्या ऐक प्रार्थना ।। २।।





पाप अंधेरी मन व्याप्त झाले घालुनी बंधन मज वेष्टीयेले
तोडी पाश प्रकाश देई सत्य जीवना ।। ३।।

## २३१. प्रीती धर्म हा सत्य

प्रीती धर्म हा सत्य जगी एकला ख्रिस्ते दाविला प्राण अर्पुनी कित्ता
प्रीती धर्म नसे भित्ऱ्यांचा किंवा निद्रावसे आळशांचा
जो स्व धर्मा रक्षण्या सांडी रक्ता ।। १ ।।
नरा होवो प्रीतीसाठी हाल तेने होईल तुझे रे तारण
सुख शांती मिळे तव अचिंता ।। २।।
छळ होतो वाढे तैसा धर्म कोण सांगे मर्म काय त्यात
म्हणूनी बा पाया जाण ख्रिस्ता ।। ३।।

## २३२. प्रेमे तुजला धरी

प्रेमे तुजला धरी धरी मी पातकी
पुढती प्रभू हा चाले अधा गिरीवरती ।। धृ ।।
रजनी रमली पुरी पाहूनी चांदणी
क्लेश दु:खे हरी देखी मुख पाहोनी
चढली उभये वरी त्याच्या पाठी राहोनी ।। १ ।।
चढुनी जाई का गिरी वरती मी पातकी
जर धरीली हाती कास त्याची खरी
परी शांती प्रीती घेउनी संगती ।। २ ।।
अंतकाळ जरी येऊ दे मजवरी
असता तू जवळी भिती ना कुणाची
जैसा क्रुस कालवरी वाहीला पार ही ।। ३ ।।

## २३३. प्रेमाने देवा आलो

प्रेमाने देवा आलो तुज जवळी
स्वीकारुनी घे तव पदकमली ।। धृ ।।
तुझ्या भक्तीची देवा लागू दे गोडी
आयुष्याची वेळ राहीली थोडी
आशा हीच मना देवा ।। १ ।।





जगी भरला देवा पापांचा बाजार
संसारी जीव देवा झाला बेजार
आशा हीच मना अरे देवा ।।२।।

## २३४. हे रूप तुझे डोळे भरुनी

हे रूप तुझे डोळे भरुनी पाहू दे
ख्रिस्त देवा तुज चरणी मला राहू दे ।। धृ ।।
ना जीवनात सेवा मी केली कधी
ना मंदिरी आलो मी देवा कधी
आज आलो मी आता गुण गाऊ दे ।। १ ।।
तूच माझ्या जीवनाचा धनी कैवारी
हेच समजून आलो मी तुझ्या द्वारी
भावनांची फुले तुझ्या पायी वाहू दे ।। २ ।।
माया लाविना जीवनात दूर करी
तव दासाला हे जग बघू दे तरी
तव पदकमलाशी लीन होऊ दे ।। ३ ।।

## २३५. तुज जवळी

तुज जवळी मी असावा रे देवा ऽ ऽ ऽ ।। धृ ।।
हाक मारिता तुझ्या मी द्वारी
पातक माझे पुसुनी सारे
आरशासम मी दिसावा रे देवा ।। १ ।।
पापी मन हे मजला कळेना
नयनी माझ्या काही दिसेना
प्रकाश तूच असावा रे देवा ।। २ ।।
हात तुझा तो मज गोंजारी
भरुनी द्यावी जीवन झोळी
प्रसाद हाच असावा रे देवा ।। ३ ।।





## २३६. तव सहवास घडावा प्रभू रे

तव सहवास घडावा प्रभू रे झणभर विरह नसावा ।। धृ ।।
राहो सुंदर सदनी नगरी किंवा रानी पर्वती
देह झिजो हा माझा कोठेही स्वर्गच जीवा ।। १ ।।
मृदुल फुलांची सुखकर शैया
किंवा प्रस्तर खंडणी जाया
हृदय तव टेकुनी आसता कष्ट न राहो ही सेवा ।। २ ।।
हे प्रियकरा सर्व सुखाच्या
घे घे माझी तन मन वाचा
ख्रिस्ता मम प्रिय ख्रिस्ता अविनाशी तू मात्र विसावा ।। ३ ।।

## २३७. काय मागणे

काय मागणे कशास मागू सन्निध प्रभू राहो
मिळाले मला सर्व काही ।। धृ ।।
ख्रिस्त पित्याचा मी ख्रिस्ताचा
लोभ न मजला नाही कुणाचा
तूच बाप—आई ।। १ ।।
या जगातील सौख्य निमाले राज्य स्वर्गाचे मला मिळाले
लागलो तुझ्या पायी ।। २ ।।
जगतासाठी स्तंभी चढला पाप जगाचे घेउनी गेला
शुन्य दिशा दाही ।। ३ ।।

## २३८. प्रभू सहवासे

प्रभू सहवासे मन माझे रंगले
प्रेमे जीवन मज ठायी लाभले ।। धृ ।।
विश्वासाने भोगू सारे सुख ऐश्वर्याचे
ख्रिस्त मम हृदयी आले झाले मन शुद्ध
मोह मायेचे नीर मनी दाटले ।। १ ।।
भक्तीभाव पाहुनिया वेगळा आनंद
सदा अंतरी या माझ्या धाव घेई देव
ज्योत आत्म्याची सदा पेटवू या रे ।। २ ।।





कष्टीत भ्रष्टीत मना त्राण जगी दिले
ख्रिस्तामध्ये पापीयारे शोभिवंत सारे
श्रद्धा सेवेची सदा वाढवू या रे ।। ३ ।।

## २३९. असो सदा संयोग

असो सदा संयोग असावा
चंद्र चंद्रिका यात जसा ।। धृ ।।
पिता नि पुत्र पवित्र आत्मा
तव आत्मा जणू मम आरसा
पाहुनी नमितो त्या माजी तुला ।। १ ।।
ख्रिस्ता ख्रिस्ता प्राण कुडीचा
हो माझा तू तरी दुसऱ्याचा
सोडू नको रे मजला ख्रिस्ता
मम देहाचा श्वास पिता ।। २ ।।
नाद ध्वनी सूर पेटीतूनी हा
वाजे मृदुंगातूनी तव ठेका
प्रभू संगाचा विरह नसावा
मातेचा प्रेम झरा ।। ३ ।।

## २४०. जो देतो प्रभुला

जो देतो प्रभुला तन मन धन
त्याला नाही मुळीच मरण ।। धृ ।।
प्रभू वचनाचा विचार तुम्ही करा
तोच आहे हो जीवनाचा झरा
सत्य भावनेने करीता स्तवन
त्याला नाही मुळीच मरण ।। १ ।।
ज्याने ठेविला प्रभुवर विश्वास
तो होणार नाही निराश
त्याला मिळेल प्रभुचे वरदान
त्याला नाही मुळीच मरण ।। २ ।।





क्रुसावरी प्रभूचे मरण
शूद्धतेने केले तारण
लीन व्हावे धरुया चरण ॥ ३ ॥
प्रभु ख्रिस्ताला हृदयी द्या हो स्थान
स्वर्गी आहे हो तारणाची खान
त्याला नाहीकृ ॥ ४ ॥

**२४१. तन मन धन**

तन मन धन प्रभुतवचरणी सकल तुझे हे तूच दिलेशी
आगतिक तव करणी ॥ धृ ॥
मी मम भार्या कन्या सूत हे
दास तुझ्या चरणाचे सारे
प्रियकर तूच धनी ॥ १ ॥
बेत विचारही हर मम करणी
अवलंबे इच्छेवर तव बा
करितो मन धरणी ॥ २ ॥
वाटे खरे पण जीवन मम तू
शरणागत मी पतित तुला गा
जय दे भव चरणी ॥ ३ ॥

**२४२. नव्हे ख्रिस्तीपण फुकाचे**

नव्हे ख्रिस्तीपण फुकाचे जीवन युद्ध हे दारूण सैतानाशी ॥ धृ ॥
इंद्रीय दान दिले देवा मा ते भ्रष्टोनी कदा पापाने
देई प्रेमे घालवून सदाचे बा माझे उणे पण हे
ख्रिस्ताची सुवार्ता सुंदर भजन शोभेल वर्तन ऐसे राखीशी ॥ १ ॥
बोलविले मा ते जिंकावया पण पापाची ती खुण मरण
माझ्या पापाचे देवाशिरी काटे करी पायी दाटे खिळे खोल
ख्रिस्त मंडळीचे केवळ मस्तक त्याचा मी हस्तक आहे कुठे जगी ॥ २ ॥





## २४३. काव्य फुले उधळू

काव्य फुले उधळू काव्य फुले उधळू
प्रभू अर्पी काव्य फुले उधळू ।। धृ ।।
तन मन रंजन सामावूनी वाही जगाला पुत्र म्हणोनी
दावी जगा सुमने ।। १ ।।
सेवकापरी जगती राहुनी हर्षी जगाला देह झिजवूनी
येउनी या भुवरी येशू ।। २ ।।
शिरी कंटकांचा मुगूट लेवूनी
देही क्रुसाचा भार वाहूनी
चढण चढे कालवरी येशू ।। ३ ।।

## २४४. तुझी सेवा करण्यासाठी

तुझी सेवा करण्यासाठी
शक्ती मला दे रे देवा साथ तुझी ही असावी ।। धृ ।।
देह माझे आहे एक मंदिर रचिले तुझ्या हस्ते तूची हे घर
प्रभू मंदिरामधुनी गोड तुझे नाम निघावे ।। १ ।।
पाप मी करीतो क्षणक्षणाला तरी क्षमा करीतो अशा जीवनाला
पाप्यांसाठी जगती आला प्राण त्याने अर्पिला ।। २ ।।
सैतानाशी युद्ध कराया साहाय्य कर रे तू ख्रिस्तराया
तुझ्या वचनाप्रमाणे आज ये ये सारं घडावे ।। ३ ।।

## २४५. मी भक्त बनावा

तुझ्या पावलाचा मी भक्त बनावा
तुझ्या सेवेपायी माझा देह झिजावा ।। धृ ।।
तू माझा स्वामी मी तुझा दास
लाभावा ऐसा मजला सहवास
दिनरात मी तुला नित्य भजावा ।। १ ।।
मिळावी मजला तुझी कृपाशांती,
मग पामराची ऐक विनंती
मनी ध्यानी जीवनी प्रभू तू असावा ।। २ ।।





गाउनी देवा मी तुझे गुणगाण
सुखी होई माझे अवघे जीवन
तुला आळवीत जीवन सरावा ।। ३ ।।

### २४६. हाती घेउनी पातक माला

हाती घेउनी पातक माला
दीननाथा तुझ्या सेवेला आलो ।। धृ ।।
तूच दैवत तूच सहारा
नाही आम्हा कोणी दुसरा
माया तुझी आघात प्रभूजी देई आम्हास थारा
पसरुनी झोळी द्वारी तुझ्या मी पामर हाच भुकेला ।। १ ।।
उत्तम आहेस तू मेंढपाळ मेंढरे तुझी वनमाळ
चुकलेल्यांना आणि सर्वांना रक्षी सांज–सकाळ
सुकल्या कंठी हाकामारी देई साद हाकेला ।। २ ।।
शुद्ध झाली पापी स्त्री ती दंड कोण ठरविता
शुद्ध झाली रक्तस्त्रावी तव वस्त्राला शिवता
दासाचा ही स्वीकारुन घेई
भाव फुलांची माला ।। ३ ।।

### २४७. अशी घडावी सेवा

अशी घडावी सेवा निरंतर तुझे स्मरावे नाम
परमेशा लाखो लाखो प्रणाम ।। धृ ।।
अरुंद मार्ग क्रमता क्रमता दूधामधाची लागे सरिता
प्राषण करण्या दिली योग्यता आम्ही सुखाचे धाम ।। १ ।।
रुंद मार्गी अनेक जाती क्षणिक सुखाच्या मोहापडती
दुष्ट लालसा नरकी नेती चुकती सत्य विधान ।। २ ।।
असोत तुमची पापे रक्तासम क्षणात बनवी ती बर्फासम
अनुतापे जो येईल होउनी देईल मुक्ती धाम ।। ३ ।।





## २४८. त्याची धिंड काढावी का

त्याची धिंड काढावी का उघड्यावरी
शास्त्री परुशी हे काढे प्रभु मार्गावरी ।। धृ ।।
दैवी नामांकित हिरे स्टेफन, यशया
दानियल योहान ते सारे प्रभू पाया
पेत्राला मारी टांगुनी क्रुसावरी ।। १ ।।
अधिकार आमचा म्हणे धर्मावरी
सारे प्रभू ख्रिस्ताचा हेवा करी ।। २ ।।
देवाच्या कार्यात सदा हेवा देवा
सुवार्ता गाजविणारा ढोंगी नसावा
गर्वाने भरल्याचा नाश तो करी ।। ३ ।।

## २४९. प्रभू पाहू गाता भक्ता

प्रभू पाहू गाता भक्ता अंतरी तनूरूप धारी नरा प्रवर्तनी ।। धृ ।।
मानव जन्मी तो कैवारी पवित्र आत्म्याची पाखर घाली
जो दूर अज्ञानी त्याला नाकारी दया दाखवी तो पर बंधू पाशी
माझ्यावरती प्रीत ही भूवरी ।। १ ।।
जो निराधारी त्या सावरी तो मेंढराशी आधार देई
जो ख्रिस्ती शिलाशी चिटकून राही ओसाड वाळवंटे निरझरे दावी
तैशी दुर्दशा हाटवी संकटी ।। २ ।।

## २५०. झालो अनुयायी प्रभुख्रिस्ताचा

झालो अनुयायी प्रभुख्रिस्ताचा
केले तयाने स्वर्गी स्थान माझे, मी वतनदार साचा ।। धृ ।।
करील तयाशी करार सदाच जग देह सैतानाचा त्याग कारण्याचा
धरी दृढ आढळ विश्वास ।। १ ।।
जरी झाले माझे हाल प्रभू नामासाठी
कधी तरी मोडेल काठी सैतानाची
न लगे वाटा हा जग सौख्याचा ।। २ ।।
देह नाशवंत नाव नेटाने राखीण
साथी तो घेऊन जन्मे येशू आत्मन
भरी भरणा हा सत्कर्माचा ।। ३ ।।





## २५१. अंतरी सुख नाही आले जीवन वाया गेले

सारे जीवन वाया गेले
माझे जीवन वाया गेले ।। धृ ।।
आजवरी रमलो संसारी
अधर्माच्या जाउनी आहारी
ज्ञान दुजे मग कसले राही
निज आत्मा डागाळिले ।। १ ।।
संकट येता तुज मी स्मरलो
मंगल देवा पायी बिलगलो
इश सुता आज मी वावरलो
मरण उराशी ठेले ।। २ ।।
उत्पादक तू सकल महीचा
मुक्तीदाता तू अधर्माचा
जपतो जप तुझिया नामाचा
शोकाकुल मन झाले ।। ३ ।।

## २५२. मानव प्राणी नेहमी

मानव प्राणी नेहमी पुरा चुकणारा परी तू जवळी घेणारा
योग्य नसे तव नामा प्रभुवरा परी तो जवळी घेणारा ।। धृ ।।
स्वाभाव हा वेगळा साताच्या सत्तर वेळा
गर्जेचा सागर सगळा माझा जगा वेगळा
दे सहवास चुकलेल्या कोकरा ।। १ ।।
तो मी हा लीन असे झाड अंजिराचे जसे
भूवरी भार असे मेंढपाळा, चुकलेल्या कोकरा ।। २ ।।

## २५३. नवे वस्त्र

नवे वस्त्र मी परिधान करी
विनीत राहील प्राण प्रभूजी ।। धृ ।।
गत वर्षे ही सरुनी गेली
नव वर्षाची पहाट फुलली
देवा माझा सांभाळ करुनी
ठेवी सुखाच्या पदी ।। १ ।।





होती पापे मम दुष्टाची
अगणित ह्या तनी हिम नगा परी
त्याहुनी किती तरी क्षमा करुनी
दावी तुझीच प्रीती ।। २ ।।
तव छायेच्या वृक्षाखाली
दृढ विश्वासे तुइया पाउली
नव वर्षाची कृपा साउली
गावी तुझी महती ।। ३ ।।

## २५४. रुसला का असा मजवरी

रुसला का असा मजवरी देवा
घडली नाही थोडी तुझीच रे सेवा ।। धृ ।।
चूक घडली निज हाते का ?
नावडते तुज घडले का ?
चुकलेल्या अशा मजवरी
राग का धरावा ।। १ ।।
धगधग अग्नी हा पेटे अंतरी
वाटे जळते तनुही सारी
कंठी आला प्राण
आजवरी किती करू धावा ।। २ ।।

## २५५. इच्छा प्रभुची

जगणे मरणे इच्छा प्रभुची काय तुझ्या हाती
मानवा तू केवळ माती (२) ।। धृ ।।
मी मी म्हणणे व्यर्थ तुझे रे
तुझ्या हातचे काही नसे रे मायाजाळी का फसलाशी
व्यर्थ जगी नाती ।। १ ।।
विचारुनी घे आपुल्या मनाला
शांती मिळाली का जीवनाला
नसे भरोसा कधी अचानक
विझेल ही ज्योती ।। २ ।।





प्रभू ख्रिस्ताची आस धरावी
जन हीताची सेवा करावी
मना पाहा रे शोधून अंती
कोण तुझा साथी ।। ३ ।।
जगतामधुनी जाईल मूर्ती
पण राहील जगी तुझीच कीर्ती
अरे राहील सदाच जगती
फक्त तुझी प्रीती ।। ४ ।।

## २५६. तुझे नाम पवित्र

तुझे नाम पवित्र मानिले जावो जगी या
हे आमुच्या स्वर्गीय बापा सदया ।। धृ ।।
तुझे राज्य येवो या जगती
जैसे स्वर्गी तैसे पृथ्वीवरती
अपराधाची आम्हा क्षमा करूनिया ।। १ ।।
नको पडू देऊ आम्हाला मोहात
वाईटापासून सोडीव जोडीतो हात
कारण की हे राज्य तुझे प्रभुराया ।। २ ।।

## २५७. करुनी प्रार्थना अखंड

करुनी प्रार्थना अखंड नका पडू देऊ खंड ।। धृ ।।
होतो प्रार्थनेचा त्रास, होता सैतानाचा वास ।। १ ।।
प्रार्थनेचे मोठे बळ नाशी संकटा समुळ ।। २ ।।
प्रार्थनेने देव मैत्री होती जैसी पत्रोपत्री ।। ३ ।।

## २५८. येशील जेव्हा न्याय

येशील जेव्हा न्याय कराया हीच माझी प्रार्थना
प्रभूवरा आठवण माझी करा ।। धृ ।।
फसलो मी होतो एके काळी पापाच्या त्या मोह जाळी
दया करावी मज पामराची ।। १ ।।
दु:ख कर्माने झालो मी पापी शरण मी आलो पश्चातापी
क्षमा करावी मज पामराची ।। २ ।।





## २५९. प्रेमळ देवा

प्रेमळ देवा मजवरी रुष्ठ का झाला कळेना मजला ।। धृ ।।
आंधळे पांगळे कुष्ठरोगी त्वा बरे केले
मीच काय केले ।। १ ।।
अबोल असा तू कुठवर राहशील राया
नको अंत पाहू ।। २ ।।

## २६०. मनुजा तुझ्या देहाचे केले एक मंदिर

मनुजा तुझ्या देहाचे केले एक मंदिर
नाशवंत शरीर आत्मा हा अमर ।। धृ ।।
देवाने केला स्वत: एक मानव
मातीपासून तूच घडव
प्राणवायूचा केला फुंकार ।। १ ।।
देवाने केले किती हे सुंदर
सैतानाच्या मोहाने लागे पाठीमार
तेथूनच झाले नाशवंत शरीर ।। २ ।।

## २६१. माझा मी केला देवा

माझा मी केला देवा वरासम हा देह
पुरा वधू सारीखे ठेवी मना ।। धृ ।।
सदा वागविले तया गुलामापरी
वाकुडे आणिले तुझे माझे
झालो त्या योगे दोषी खरा ।। १ ।।
तूच जोडियले सुत्र सदाचे
एकजीव करण्या आत्म्याद्वारे
सकल जीवाच्या प्राणोद्धारा ।। २ ।।
दास म्हणे देवा कळू दे रे माते
देह मन नाते काय आहे
आत्म सुखाचा दिव्य जोडा ।। ३ ।।





## २६२. मन रुपी किल्ल्या

मन रुपी किल्ल्या देह तटे त्याते तया दोन दारे
कर्णानी डोळे कर्णानी डोळे त्या बाजू घात हल्ले
होती आरीचे रक्षी सावधाने ।। धृ ।।
तैसे तटा ती ते दडुनी सदा शडरिपू हेरांचा नाशास थवा
मोह करवी हल्ले लढवी सदाचे डोळया मार्गी येण्या सैन्य सैतानाचे
अंर्तगत हेराने संदेश दिला शस्त्र मीपणाचे फोडील कर्णा ।। १।।
ऐकूनी हेरांचे संदेश घाताचे दुष्टे विंधीयले कर्ण दाव साचे ।। २।।
आत्मशुद्धतेचे घेउनी अस्त्र हाटवी दुष्टांच्या मृत्युच्या आर्ता
विश्वासाच्या द्वारे विजयी हो बा रे ख्रिस्तराज्यापुढे दान कर्म साचे ।। ३।।

## २६३. पातकाच्या राशी पोहचल्या आकाशी

पातकाच्या राशी पोहचल्या आकाशी
तरी कोणापाशी जाऊ आता ।। धृ ।।
अगणित पापे त्याचे ओझे झाले
शरीर चेपले काय करु ।। १ ।।
जप तप यात्रा बहू यज्ञ केले
भोंदुनिया खाल्ले बहुतांशी ।। २ ।।
केली क्षमा त्याने पूर्ण शांती दिली
मुक्ती प्राप्त झाली बहुतांशी ।। ३ ।।

## २६४. वाणी तव ख्रिस्ता

वाणी तव ख्रिस्ता मज पाप्या लागते मधूर
पातकाचा भार सारी दूर ।। धृ ।।
म्हणशी मी आहे जगाचा प्रकाश
अहो कष्टकरी भाराक्रांत
पापाने अशांत या मजपाशी ।। १ ।।
म्हणशी मी आहे जगाचा प्रकाश
तुम्ही प्रकाश या जगाचे ।। २ ।।
म्हणशी मी जीवनी भाकर
प्यावया रुधीर प्रेमे जैसे ।। ३ ।।





## **२६५. शास्त्रलेख वदतो**

शास्त्रलेख वदतो नीतीमान न कोणी
एक देखिला प्राणी भूवरी मानव ना कोणी ।। धृ ।।
शोध करणारा कोणी नाही
सर्व बहकले स्वार्थापायी
सदगुणांचा लवलेश नाही
अंतरयामी दुर्गुण कमाई
ना जानता कोणी
भूवरी मानव ना कोणी ।। १ ।।
नाही उरला सत्कर्म कर्ता
असत्त्याची बाजू न धरता
अन्यायाचा साठा करता
ख्रिस्ताची ना शिकवण स्मरता
ना श्रेष्ठ कोणी भुवरी ।। २ ।।
वाईट शापाने तोंड त्याचे भरले
रक्तपात करण्या पद सरसावले
दुष्टाइचे मार्ग त्याने धरले
शांतीच्या मार्गाला ते मुकले
ना धरीले भय कोणी देवाचे ।। ३ ।।

## **२६६. अंतरयामीच्या पापांची**

अंतरयामीच्या पापांची धुंदी नच कळते
परी अंतरी माझ्या तेची ना वळते ।। धृ ।।
नव्या कपडयाने देह जरी झाकला
वर अंगी रुपाने जसा रंगविला
कबर चुन्याने जशी रंगविली बाह्यरूपी दिसते ।। १ ।।
बुरखा घालुनी सभ्यतेचा असा
आव आणती धार्मिकतेचा कसा
कसे असावे कसे नसावे ज्याचे त्याला कळते ।। २ ।।





ज्ञान असोनी मनुजा जर केलेस पाप
झाली नाही तुला रे त्या पापांची माफ
तीराप्रमाणे झण हा गेला आश्रू तुझे गळते ।। ३ ।।

**२६७. वास हा सुटला रे**

वास हा सुटला रे पापांचा डौलदार देहाचा
नाश अमोल रुपाचा ।। धृ ।।
शुद्धकर्मे कल्पना रात्रंदिनी
धरली वाईट नीती धुंदीही नयनी
ऐकीले नाही नोहा माझे कोणी
अवनी वरती मी सोडीले पाणी
जीव जंतुचा नाश पाहा साऱ्या जगाचा ।। १ ।।
फारो राजा असे भारी अन्यायी
माझ्या जनांचा छळकरी ठायी ठायी
दहा पीडा घेउनी तो ऐकत नाही
सागरात त्यांचा अंतच होई
मोशे नयनी पाही देव सत्त्याचा ।। २ ।।
पापाने बेल शबर बैल झाला
चंडी देवाला तो खाई गवताला
अग्नी गंधक नको देऊ देहाला
सुमार्गी त्याला जगी बोध दासाला ।। ३ ।।

**२६८. मन ऐकेना ऐकेना**

मन ऐकेना ऐकेना दुर्विकारी केली माझी दैना
प्रभुमध्ये मन राहो मनी प्रभू घेवो ठावो
होऊ देवाचे लेकरू ।। १ ।।
मी मी म्हणूनी नकोस मरू
दास म्हणे तो मोकळा
प्रभुला जो पाहिलेला ।। ३ ।।

## **२६९. नाही उमगले**

नाही उमगले अजुनी अनेका सत्य हे ख्रिस्ताचे
जहाले दास त्या वैऱ्याचे ।। धृ ।।
वैरी आमुचा चतूर भारी नजर त्याची भक्तगणावरी
फसविण्याचे कसब त्याचे सदैव नाशाचे ।। १ ।।
दगड धोंडे मानुनी दैवत तांत्रिक मांत्रिक यांची सोबत
बसले गमवूनी आज या घडीला वैभव स्वर्गाचे ।। २ ।।
जमले लोभी धन द्रव्याचे स्वैराचारी दृष्ट मनाचे
दावी प्रदर्शन स्वंयशक्तिचे स्नेही मद्याचे ।। ३ ।।
एकच शक्ती ठरे प्रभावी शरण मानवा प्रभुला जाई
नको लालस प्रभुमय होई द्वार मुक्तीचे ।। ४ ।।

## **२७०. मन झोपी गेले**

मन झोपी गेले बा जागू बा सांग कैसे जागू
मन झोपी गेले ।। धृ ।।
भावनेच्या पडे मी शयनी चढे धुंदी नेत्री मोहाची
तू हरघडी करी इशारे परी मी नच मानी बा ।। १ ।।
या निद्रा वसे स्व देवा केव्हा लागेल तुझा सुगावा
हे अवखळ मज नाव रे भ्रष्टीत देह माझा बा ।। २ ।।
पांघरली मी माझिया अंगी पापरुपी पांघरण
मुर्छीत होऊन पडे मृत्यूच्या शितल छायेमध्ये
मृत्यंजया तू निद्री जागला खडकन करी मज जागे बा ।। ३ ।।

## **२७१. वितभर पोट पापाचे कारण**

वितभर पोट पापाचे कारण आलो मी शरण
तूच तारी प्रभूजी ।। धृ ।।
सैतानाचे बोल वाटे रुचकर म्हणे खा तू फळ तुझिया जीवन
हा ते खाई मी खाई मारीला घाव जीवा ठायी बा ।। १ ।।
दिन रात्र देवा करी मी हे कष्ट
निढळाच्या हे घामाने मी खातो भाकर





हा ऽऽऽ ती असुरा परी परी नच तृप्ती कधी होई बा ।। २ ।।
दास म्हणे देवा शाप भोगिता हे मरणाचे मूळ पोट हे माझे
हा ऽऽऽ ते सनातनी नेई मज स्मशना ठाई बा ।। ३ ।।

## २७२. मन मंदिर तुझे बा

मन मंदिर तुझे बा नच जाणिले कदा मी
स्वार्थ आणुनी करिला पाप केर त्यामध्ये मी ।। धृ ।।
गोड वाटे कर्णे त्याचे साथ शडंरिपुयाचे
माते वेष्टीले तयाने मोह माया पाश कर्मे
करिले घायाळ मजला डाव साधिला दुष्टाने ।। १ ।।
दिवा लावूनी मंदिर धुंडाळी तू सारा केर
हाती लागे मी घायाळ कोण तुजला आनंद
नको मोजू आपराधा करी मुक्त त्या मधुनी ।। २ ।।
सेवकाची दैन्यावस्था तुची जाणीशी बा ख्रिस्ता
हाती घेउनी या फटका काढी झोडपुनी त्या दुष्टा
रक्षुनिया सेवकाशी लावी नित्य मन मंदिरी ।। ३ ।।

## २७३. आम्ही घोर पाप केले

देह वास निर्मोनी आम्ही घोर पाप केले
पाप शापात पडोनी तयामध्ये मेलो सारे ।। धृ ।।
मूळ उत्पत्ती नराची जगी विशिष्ट हेतुची
होती आधी देवाजीची परी अंती सिद्ध न झाली
इश आज्ञाशी भ्रष्टीले दुष्ट सैताने नरा ते ।। १ ।।
पुर्वजांचे मूळ पाप झाले जीवना अडखळ
नरा लागे पाप जाळ आत्मा होरपळे त्यात
देह नाशवंत झाले अमर आत्मा तळमळे ।। २ ।।
भक्तासाठी देवभक्त सारे वाचविया भक्त
झाले ख्रिस्ताचे मरण त्यात विश्वाचे तारण
साऱ्या पाप्यासाठी केले ख्रिस्त स्वर्ग दार खुले ।। ३ ।।





## २७४. तुझा नीतीचा प्रकाश

तुझा नीतीचा प्रकाश प्रिया माझ्यावर पाड
सुमार्ग मला दाव तुझ्याकडे माझी ओढ लाव रे देवा ॥ धृ ॥
चालवी दयाळा प्रकाशात पुढे अंधारात ठेचा खाणे
झाले चालुनी बेजार पुढे लागे पाप आड
होई तयामध्ये ठार वाचीव तूची बा मला रे ॥ १ ॥
नसता मी येशू तुझ्या कुळातील
बनविलेस मुळ देवाजीचे
परी झालो मी बेईमान अनितीचे परिधान
अंगीलेलो पाप घाण टाकी तू सत्वरे ॥ २ ॥
त्रेधा पाहून या आत्म्याची दिली माते त्वा हो वरदाने
नवजन्मीचा हा लाभ पश्चातापाचा प्रताप
देउनिया पतितास जीवन दावी तू आपुले ॥ ३ ॥

## २७५. आलो प्रभुच्या द्वारी

आलो प्रभुच्या द्वारी आम्ही आलो प्रभुच्या द्वारी ॥ धृ ॥
ओझे झाले पापांचे हे दु:ख मला सहवेना
थकल्याशी तू देशी विसावा तुज वाचुनी रहावेना ॥ १ ॥
धाव घेउनी ये प्रभुराया शिणली रे ही काया
तुजविना समर्थ कोण जगी या आम्हाशी ताराया ॥ २ ॥
जीवन सत्य मार्ग हा सत्य आहेस राजा जगाचा
प्रभुजी आम्हा टाकू नको रे आज आम्हा दीनाला ॥ ३ ॥

## २७६. मुकलो मी प्राणा

मुकलो मी प्राणा केला अधमपणा ॥ धृ ॥
खंडी तव त्या आज्ञेला राहू टपे मज नाशाला
ऐकुनी तव हाकेला नग्न आहे असे दिसे मजला
मुकलो मी एदेना केला अधमपणा ॥ १ ॥
शोधीयला जरी त्वा तारणोपाय
पाठवी स्व पुत्र ख्रिस्त राया
पतीतांचा राणा जिंकीतसे मरणा ॥ २ ॥





## २७७. पतिता मिळे शान्ती

पतिता मिळे शान्ती पतिता मिळे
शान्ती प्रभू भोजन साक्रामेन्ती
कष्टाने भारावले भ्रष्टीत जन सारे निरर्थ
जगा माजी मृत्युच्या गेले पंथी ।। धृ ।।
म्हणूनी नरा रे जाण येशुला पुनरुत्थानी तो एकची गेला
विजयी हो मृत्युवरती त्रय येशू विश्‍वपती ।। १ ।।
हृदयी तयाचे शरीर तयाचे पोशक खाद्य नर आत्म्याचे
करुणी हृदयी अनुतापी नरा घे घे ऐश्‍वर्य प्राप्ती ।। २ ।।

## २७८. देह धारी होऊन

देहधारी होऊन जगी आला हो... त्रय येशू हाच पापहरा ।। धृ ।।
मानवाने केला भंग देवाजीचा म्हणुनी पाप जगी आले
भ्रष्टीत जगती मानव सगळे मरणदंड पावले
सैतानाने डाव साधिला हो परी कोण मुक्त करी त्याला ।। १ ।।
जो आत्म्याकडुनी गर्भरूप झाला कुमारी उदरी जन्मी आला
पतितांसाठी स्व प्राणाची खंडणीभरीता झाला
मरुनिया पुनर्जिवीत झाला हो मरणा समूळ नाश केला ।। २ ।।
दास म्हणे जगी नच दुजे दैवते मरणातुनी पुन्हा उठले
ख्रिस्तच माझे जीवना अक्षय युगा न् युगी रुधी खेळे
पाप मुक्त करी जगताला हो ख्रिस्तामध्ये तारण मिळे नरा ।। ३ ।।

## २७९. तू आहे जिवंतांचा देव

बा तू आहे जिवंतांचा देव
नको मृत्यू भेव मला प्रभू दाऊ रे ।। धृ ।।
देवा द्यावी दिव्य दृष्टी दाखवावी दिव्य सृष्टी
माझे फुटके नयन पडे रोज ठेचाळून ।। १ ।।
करी पाप्यावरी दया माझ्यावरी पाप भया
तुझ्या घरचा मी चोर पाहू कोणा कैसे वर ।। २ ।।





माझे विटाळलेले हात केला ख्रिस्ता तुझा घात
तेच लावी मला रक्त करी पश्चतापे मुक्त ।। ३।।
प्रेम देवराज्याशी तारी कोण का तयाशी मारी
भाव भक्तीचा जबर सैतानाशी दे टक्कर ।। ४ ।।

## २८०. प्रभुराज मंगल सुख धामा

जय जय जय प्रभुराज मंगल सुख धामा ।। धृ ।।
पतिन पावना विध्ननाशना राजा सर्व जगाच्या पाप हरणा
दीन चरणाच्या मधुगुण गाना सदनी ये वसना ।। १ ।।
भव भय हरना सदगुरू मरना सकल मने धरी तव चरणा
उद्धरिले त्वा सकल पतिता सारुनीं दूर तमा ।। २ ।।

## २८१. प्रभूजी जीवन हाले

प्रभूजी जीवन हाले मम हृदयी घुसले भाले ।। धृ ।।
हळू उपटोनी काढी प्रभू रे
सैतानाने भोसकलेले
खुपती प्रभू हे रूधीर गळाले
पसरी आणखी जाळे ।। १ ।।
गळती चरचर धारा
व्रण किती पडले पाहा ते
चरचर कापिती पशू तनुला
आश्रू प्रवाह वाहे
घनघोर मृत्युचे जाळे ।। ३ ।।

## २८२. मी केले घोर पातक

जगी मी तुझ्याशी केले घोर पातक मुळाचे
तव प्रीतिवीना झाले माझे व्यर्थ जीणे ।। धृ ।।
तव प्रीतिच्याच मुळे मिळे मज गोड जीणे
अंधकारामध्ये गेले कित्त्येककांचे व्यर्थ जीणे
केला अहंपणा मी पापाशी सारे नेले





दैदिप्यमान तुझ तव सुख मी सोडीले
पाहू लागे डोळे आमुचे व्यर्थ नग्न आम्ही त्याच्यापुढे ।। १ ।।
नच देवाशी साहिले स्व पुत्राशी धाडीले
करी नराशी मोकळे पाप बंधनाची मुळे
पुनरुत्थानी उठले ख्रिस्ताविन कोण दुजे ।। २ ।।

## २८३. दोषी असे प्रभू मी

दोषी असे प्रभू मी कैसे वदू विमला ।। धृ ।।
संगे तुझ्यात होता हा भाव माझा खोटा
तू दाविलेस मजला देवुनी प्रेम ख्रिस्ता
धिक्कार मी सुखाचा केला तुझ्या सुखाचा
विश्वासघात ख्रिस्ता जगती तुझा मी केला ।। १ ।।
जे पाहीजे ते मजला ठावे तुझ्या मनाला
शब्दांनी नाही कळला हा सूर अंतरिचा
कोण्या मुखाने देवा सांगू मी सोबत्याला
कोणी तुझा मी नाही मन बोलते मनाला ।। २ ।।
जळते शरीर आता तू सोडूनी का जावा
प्रीतीत भंग आपुल्या त्या सैतानाने केला
दु:खात सुख त्रात्या भरुनी तुझ्या कुशीला
हा काय लाभ आता पापी अशा मनाला ।। ३ ।।
शब्द तुझा भूमीला वरदान हाच ठरला
कैसा स्मरू पदाला सांगे तुचि रे देवा
मी भाग्यवान माझा जीव हा तुझ्यात रमला
घेताना फास आता सोडीतो प्राण जाता ।। ४ ।।

## २८४. डोइवरी गुंडी पापाची

डोइवरी ही गुंडी पापाची
घेउनी प्रभू मी चालू किती ।। धृ ।।
रंगी ढंगी दुनिया सारी
मोह मायेच्या कुंटनखानी





घे घे वरती माते तू वरती
भवरात्रीतुनी तू वैभवी ।। १ ।।
भक्त भुवरी व्यापुनी गेली
तव नामाचा दंभ ती करीती
एकाकी का येती दयासनी
सांभाळी तू त्या गा संप्रती ।। २ ।।
नाही कुणाचा जगती कोणी
तुज वाचुनी जगी दुसरा कोणी
सोडीले ख्रिस्ता तरल्या भुवनी
सांभाळुनी जगी तू घेशी ।। ३ ।।

## २८५. देवाचे भय

देवाचे भय धर मानवा होण्या सुखी जीवन
क्षणभंगूर असे हे जीवन ।। धृ ।।
अनिष्ठ दिन पाहा येणार
सूर्य, चंद्र तारे पाहा नष्ट होणार
मरण यातना जगी योणार, रडती सारे जन ।। १ ।।
धन संपत्ती व्यर्थ ही सारी
संकटी पडता तू रडणार सोडवी तुला कोण ।। २ ।।
बऱ्या वाईट गुप्त गोष्टींचा
देव करीतो न्याय संगळयांचा
काळ येईल झाडाझडतीला वाचवी तुला कोण ।। ३ ।।

## २८६. तव हात आश्रयाचा

देवा मला दे आता तव हात आश्रयाचा
सोडू नको तू मजला आधार तूच माझा ।। धृ ।।
तू घातलेशी जन्मी लावी आता तीराला
खोटे हे सर्व नाते प्रभू एकलाची आपुला ।। १ ।।





## २८७. देवा देवा

देवा देवा टाकीला तुजवरी भार
पाठींबा तुची मज दीनाचा नाही कधी ढळणार ।। धृ ।।
देव बाप तू या जगताचा
लाभ मजला तव सेवेचा
भाग्यवान मी या जगताचा नाही तुला सोडणार ।। १।।
मन हे माझे स्वैर निरंतर
चित्त हे माझे एकाग्रस्तव
गाईन गीत मी परमेशाचे तुजला गौरवीणार ।। २ ।।

## २८८. होडीवाल्या होडीवाल्या

होडीवाल्या होडीवाल्या होडीवाल्या वल्हव तुझी होडी रे ।। धृ ।।
सागरावर तुफान आले तुफान आले
होडी माझी डगमग डोले डगमग डोले
सागराला ख्रिस्त नावाडी होडीवाल्या ......।। १ ।।
आला किनारा (सागराचा) तारणाचा, तारणाचा
मेळा भरला ख्रिस्तजनांचा, ख्रिस्तजनांचा
तारणाचा ख्रिस्त नावाडी होडीवाल्या... ।। २ ।।
शुभ्र झेंडा फडकत आला, फडकत आला
परोपकारी देह झिजविला देह झिजविला
तारणाचा ख्रिस्त नावाडी होडीवाल्याकृ ।। ३ ।।

## २८९. पंखी तुझ्या दे आसरा

पंखी तुझ्या दे आसरा अनादीअंता राखी सदा लेंकरा ।। धृ ।।
पातक भारे शिणली काया मार्ग दिसेना मज गुरूराया
देई नवी दृष्टी मजला दीन पामरा बा ।। १ ।।
पापक्षमेचे गूढ तुजपाशी व्यर्थची भ्रमलो सोडूनी तुजशी
क्षमा करी या अज्ञाना ज्ञान सागरा बा ।। २ ।।
आप्त गणांनी भरले भूवन उद्धारक ना कोणी तुजवीन
अनुतापी आलो चरणी त्रैक्य ईश्वरा बा ।। ३ ।।





## २९०. ख्रिस्ताच्या पुनित कार्याने

ख्रिस्ताच्या पुनित कार्याने विश्व सारे लोपले
स्व प्राण अर्पण करुनी साऱ्या पाप्या तारीले ।। धृ ।।
आंधळयाशी डोळस कराविले बहिऱ्या बोल ऐकिले
करिले नानाविध चमत्कार त्याने मृताशी उठविले ।। १ ।।
हातपाय आरी ठोकी क्रुसी खिळे प्रीतीचे बोल बोले
करी क्षमा तू बापा यांची रे तयाना काही नच कळे ।। २ ।।
आर्त क्लेश जरी अंतरी तळमळे गूढ बोल पूर्ण झाले
घे मम आत्म्या पित्या तुजकडे करी रे तारण द्वार खुले ।। ३ ।।

## २९१. गोड तुझ्या त्या पंखाखाली

गोड तुझ्या त्या पंखाखाली देशील मजला तुझी सावली
देशील मजला तुझी सावली हा.... ।। धृ ।।
विश्वपित्या रे प्रभू भगवंता अवघ्याची तू करशील चिंता
आस मी धरली तव पद कमली छाया तुझ्यावरती सोपविली ।। १ ।।
पाप करता रुतलो भारी बनलो देवा तुझाच वैरी
तुजवीन ख्रिस्ता मज कोण तारी लावू नको फिरुनी माघारी ।। २ ।।
तूच जाण बा संसार गाडा आहे सैतानाचा वेढा
तुजवीन ख्रिस्ता मज कोण तारी
लावू नको फिरुनी माघारी ।। ३ ।।

## २९२. मरण नाही कधी चुकणार

एकच एकच मरण नाही कधी चुकणार
कसे होईल तारण तुझे माझे रे कसे ।। धृ ।।
सत्याठी संत ही मेले नाव अमर झाले
भविष्य कथिले संदेष्ट्यांनी तेच जगात चाले
मोहा दारी गेले तरूण
नाही कुणा दिसणार ।। १ ।।
घेशील बोध होशील शुद्ध देवाच्या राज्यात
नित्य करीशी त्याचे स्मरण





मिळे आशीर्वादी मरण
नको विसरु प्रभू ख्रिस्ताला
तेच तुला समाधान ।। २ ।।

## २९३. दु:खे भोगी देवासाठी

दु:खे भोगी देवासाठी
मरण मला जरी आले रे मरण मला जरी आले ।। धृ ।।
महाकाळाचा फेरा आला
संतती संपत्ती नाश केला
सोडणार मी देवाला जीवनी हाल झाले रे ।। १ ।।
जगात सुखे मागे सारी
पण इयोब दु:ख स्वीकारी
होता विश्‍वास देवावरी, कसोटीला तो तरला रे ।। २ ।।
सत्त्याचा तो विजय झाला
संतती संपत्ती पुन्हा त्याला
तो सत्य भक्त कित्ता त्याला नवे जीवन दिले रे ।। ३ ।।

## २९४. चिखलातुनिया का जन्मावी

चिखलातुनिया का जन्मावी कळी बघ कमळाची
झिजविते जीणे दुसऱ्यासाठी ।। धृ ।।
तृषांत रजनी तव बिंदुनी व्यापून गेली कमळा देही
भार किती हो आवरी ।। १ ।।
आपुला म्हणूनी त्या तुडविती आपुला म्हणूनी त्या सोशिती
मुखे वदेना काहीं ।। २ ।।
प्रभू बागेतील सेवा पाही कित्येकांनी जीवने झिजविली
मेल्यावरी म्हणती ।। ३ ।।

## २९५. मरता माझी विझता ज्योती

मरता माझी विझता ज्योती कोण तुझ्यावीन पेटवितो
मी तव कार्यी तुझाच राहील भार तुझ्यावर सोपवितो
मरता माझी विझता ज्योती ।। धृ ।।





माझ्या मना रे वेडया तू दैवी लिला तू भोगिशी
दोष नको तू देऊ कुणाशी भजनी प्रभुच्या संगती
निंदकांची निंदा सारी पदोपदी तू झेलशी ।। १ ।।
रंग ढंग तू साऱ्या जगाचे शांतपणे तू पाही
सोडू नको रे ताल तुझा तू भजन प्रभुचे गाई
स्वार्थासाठी तुझ्याच पाठी बंधू प्रितीच्या भावना ।। २ ।।
माझ्या कलांचा गर्व मनाशी आठवू नको रे प्रभू जगी
मम दुष्टांच्या त्या सुखासाठी स्वर्गी प्रभुला मी आळवी
जीवनात तुझ्यात माझी पेटवितो मी निंदा स्तुती ।। ३ ।।
पाश मोहाचे हटवी माझे दुष्ट कृतीची नको मती
दिसते जरी ते जग निंदेचे काही काढुनी तुझ्या प्रती
तव सेवेच्या सुखात न्हाली उल्हासीत ही तनु दिसे ।। ४ ।।

## २९६. आत्म्या देशील का शान्ती

म  त आत्म्या देशील का शान्ती सुखाची निद्रा बा ।। धृ ।।
मरणी नरा जावा निश्चय हे जाणा
भेटेल माझा दैवी राजा स्वर्गामध्ये जागा
न लागे मजला भूक तृषा हाटवी राजा ।। १ ।।
गौरवी स्वर्गाला गौरवी आत्म्याला
दु:खीत आमुचा प्राणपती हा भ्रांती असे रुधिरा
दु:खितांच्या हरता अंत समयी येशू ये म्हणा ।। २ ।।

## २९७. मातीच्या उदरात

मातीच्या उदरात झोपला बंधुभगिनींच्या ऋणांतुनी हा
कष्टची केले होते सारे जगी या नाही विसावा जीवनाला ।। धृ ।।
का मग चिंता क्लेश कशाला प्राणविसाव्या येशुवरा ।। १ ।।
मोहमायेचा जगती पसारा प्रभूवीन मजला तारी कसा
क्षणभंगूर या व्यर्थ वल्गना लाटी मातीला माती पुन्हा ।। २ ।।
माझ्याचपाठी हो तू आसरा भोगी कशाला या वेदना
दु:खितांचा तू दु:ख हर्ता अनंतकाळी उठवी पुन्हा ।। ३ ।।





## २९८. मेला भूमीमध्ये दाणा

मेला भूमीमध्ये दाणा अंकुरी दावी निज रुपा
तैसा नाही मरणी मेला देह तुझ्या ख्रिस्ता देह तुझ्या ।। धृ ।।
हो–हो म्हणता सृष्टी केली अवघी आपुल्या त्वा शब्दी
रचिले मानवाशी स्वहाते, करिले स्वप्रतिमेपरी
शब्द प्रगटीकरण झाला देह तुझा ख्रिस्ता देह तुझा ।। १ ।।
अन्य धर्मीयांचा मेळा जमला, मृत्यू मला हारण्या
जो तो मार्ग तत्व डावा तोडी, मला होउनी आडवा
उडवी बापुडयांचा धुवा देह तुझा ख्रिस्ता देह तुझा ।। २ ।।
दास म्हणे अमरवेली ख्रिस्तापाई नरा फुलली
अन् चाल मोद भरी लावू आपुल्या चित्ती
पाहू विश्‍व भरून डोळा देह तुझा ख्रिस्ता देह तुझा ।। ३ ।।

## २९९. स्व प्राण अर्पण करुनी

स्व प्राण अर्पण करुनी खंडीले या सकला वसुधा त्वा बा रे
करिले पतिता तारण द्वार खुले मारी हाका प्रमोदे या या रे ।। धृ ।।
तव प्रेम जीवन गुणी कोण पुसे ते अथांग भरले रे साचे
मी शुन्यांकित बा वसू मरे तू प्रेम सागरा वाचीव रे ।। १ ।।
जे होई मिलन वसू निलांतरे तवसन्नीध ठेवी तू माते
ते मुळारंभी नाते आपुले ते जडीत केले ख्रिस्तास रे ।। २ ।।

## ३००. मरणे काय म्हणुनी

मरणे काय म्हणुनी मरणे काय म्हणुनी
तुम्ही विचारा स्व मनाशी विझते आता ज्योती ।। धृ ।।
जमिनीतील त्या माती पोटी
पहिला मानव पापमुळाशी
कारण झाला घटका करवी
म्हणूनची गेला मरणी ।। १ ।।





माती म्हणुनी मातीत मिळशी
दिधला देवाने शाप नराशी
जिवात्मा हा आत्म्या सोडी
शुन्य जगती पडे कुडी ।। २ ।।
आदाम हा मानी अहंपणाची
मरणी ना ती पुन्हा उठली
म्हणूनच मरणे धरणी ।। ३ ।।
ख्रिस्त निर्मिती ना मातीची
देवरुपाची परी प्रकृती
देह रूपानी मातीत मेली
परी न कुजली कुडी ।। ४ ।।

### ३०१. कशाला रे देवा

कशाला रे देवा घातिले जन्मी
नाही आलो कामी देव बापा ।। धृ ।।
नाही केली सेवा देवा वारंवार
व्यर्थ माझा भार भूमीवरी ।। १ ।।
पापरुपी फासा पडे वेळोवेळी
बांधली मोळी आत्म्या जन्मी ।। २ ।।
दास बापा जो ना करे सेवा
जन्म ना घ्यावा व्यर्थ जीणे ।। ३ ।।





# जुना करार

## उत्पत्ती

### ३०२. मानव केला देव पित्याने

(संदर्भ—उत्पत्ती ३: १—२४)

मानव केला देव पित्याने घडिला पृथ्वीवरी
ईश्वरा तुझीच रे करणी ।। धृ ।।
आदाम हावेने आज्ञा मोडली ।
मना केलेले फळ खाऊनी
भ्रष्टी झाली त्या फळाने ।। १ ।।
आदाम हावेला नेत्र आली
झाडामागे लपू लागली
अंग झाकीती त्या पानाने ।। २ ।।

### ३०३. अजब तुझी कारागिरी रे

अजब तुझी कारागिरी रे देवा उत्पन्न करुनी नर नारीला
करवली तव सेवा ।। धृ ।।
प्रारंभी रे तूच बनविली या पृथ्वीची पाठ
निरंकार तिजवरी पसरला अंधकार हा दाट
केले उत्पन्न त्या भानूला आले यौवन या सृष्टीला
झाला अमोल हा ठेवा अजब तुझी ।। १ ।।
शक्तीशाली तू परमेश्वर आहेस या जगताचा
निर्जीव देह मातीपासूनी बनविला मनुजाचा
दिले जीवन या मातीला केले उत्पन्न या मनुजाला
वाटे सैताना हेवा, अजब तुझी ।। २ ।।
अफाट जगती एकटाच तो गोड दिसेना तुजला
घालून पाखर निद्राधीन केले त्या मनुजाला
काढी फासळी त्या मनुजाची केली उत्पत्ती त्या नारीची
दिले नाव तिला येवा, अजब तुझी ।। ३ ।।





## ३०४. बाई कशाला ग खोटे बोलली

बाई कशाला ग खोटे बोलली
त्यामुळे तुम्हाला मरण आले ग मरण आले ग ।। धृ ।।
प्रेषिताने प्रश्न केला हनन्याला विकली संपत्ती
विकली संपत्ती तू केवढयाला
त्यामुळे तुम्हाला मरण आले ग मरण आले ग ।। १ ।।
संतापाने सप्पिरा आली चौकशीला
तोच प्रश्न केला हो तिला
त्यामुळे तुम्हाला मरण आले ग मरण आले ग ।। २ ।।

## ३०५. केले हे जग निर्माण

(संदर्भ—उत्पत्ती २:४—३:२४)
केले हे जग निर्माण प्रभू माझा समर्थ्यवान ।। धृ ।।
लावला बाग देवाने भरला फुलाफळाने
नाहीं त्याची कुणाला जाण ।। १ ।।
पुतळा केला मातीचा पहिलाच पाया पृथ्वीचा
स्त्री एवा दिली त्यास जोडी
किती ही रचना महान ।। २ ।।
घात केला सैतानाने खाल्ले ते फळ दोघाने
मग झाली पापाची जाण ।। ३ ।।

## ३०६. बघ झाडाला लागलेत फळ

(संदर्भ—उत्पत्ती ३: १—२४)
बघ झाडाला लागलेत फळ झोके सैतान खेळं
पारादीस बाग सुखाचा ठेवा राहती आदाम हवा
बोले हसुनी झाडावर बसुनी फसविले त्याने तेव्हा
त्याच्या नारीने केले वाटोळे ।। १ ।।
केले भक्षण दिसती नग्न गुंडाळी झाडाची पानं
झाला थरकाप घडलंय पाप झाले देवाला कृतज्ञ
झाला बागेमध्ये गोंधळ ।। २ ।।





झाली उत्पत्ती वाढे संतती
झाली पृथ्वी स्थापन एका मातेची आम्ही लेकरे ।। ३ ।।
आदाम हवेची आम्ही लेकरे करी देवा सांभाळ
दिसते जगणे होऊन नग्न गुंडाळी झाडाची पाने
नाचे झाडावरी वटवाघुळ ।। ४ ।।

## ३०७. बाई कशाला गं फळ तोडलं

(संदर्भ–उत्पत्ती ३: १–२४)
बाई कशाला गं फळ तोडलं तुला कोणी भुरळ पाडलं
देवा नाही घडावं ते घडलं ।। धृ ।।
जसा पारधी अडकवितो ससा जाळयात
देवाच्या मळयात आला तो पळत
मला फसवून नाग तो डुलं ।। १ ।।
दया क्षमा नाही तुम्ही केले महापाप
भोग भोग पाप्या देवाचा हा शाप
स्वर्गी पापांचे नारळ फोडील ।। २ ।।
दास म्हणे सैताना आलास कोठुनी
अवघड कोडे माझे कोण उलगडील
ख्रिस्तराया काव्य गायील ।। ३ ।।

## ३०८. तू शब्द बोलला झाले

(संदर्भ–उत्पत्ती ३: १–२४, मार्क १६: १–८)
तू शब्द बोलला झाले
ह्या मातीमधुनी मानव घडुनी सजीव त्याला केले ।। धृ ।।
हे आकाश तू सागर जल धरतो आपल्या सहज अंगुलीत
तू उधळुनी सारे देतो आकाश अंगणात
तव विश्वासावर विश्वासाचे सुत्र चालले बरे ।। १ ।।
तू मानव निर्मिला आपुल्या प्रतिमेचा म्हणुनी
आज्ञेचा भंग केला मृत्युला कवटाळुनी
तव मूक शापाने मनुष्यावरती मरण हेची आले ।। २ ।।





तू मरण मारिले खांबी रुधिराचे देउनी मोल
पुनरुत्थीत झाला फिरुनी तुज कोण जगी समतोल
तव मुख श्वासाने आकाशतील सैन्या आहे निर्मिले ॥ ३ ॥

## ३०९. देहाचे एक मंदिर

(संदर्भ—उत्पत्ती २:४—३:२४)

मनुजा तुझ्या देहाचे केले एक मंदिर
नाशवंत शरीर आत्मा हा अमर ॥ धृ ॥
माळी म्हणोनी बनविला नर
प्राण वायूचा घालुनी फुंकर ॥ १ ॥
मानवाने केले पाप भयंकर
आगमन प्रभुचे जाणावे समीप
परमपित्याचे शुद्ध हे विचार ॥ २ ॥

## ३१०. थोर तुझे उपकार

(संदर्भ—उत्पत्ती २:४—३:२४)

थोर तुझे उपकार माझ्या देवा
थोर तुझे उपकार ॥ धृ ॥
बनविला पुतळा देह मातीचा
श्वास फुंकीला त्याने स्वतःचा
केला मानव निर्माण प्रभुने ॥ १ ॥
बजाविली आज्ञा देव बापाने
फसविले जोडीला त्या सापाने
झाला जगी अंधार पापाचा ॥ २ ॥

## ३११. कशी देवाने केली उत्पत्ती

कशी देवाने केली उत्पत्ती ऐका कथा सार (२)
सांगतो शास्त्राचा आधार ॥ धृ ॥
अवती भवती या भव जगती, निव्वळ अंधकार ऽ ऽ ऽ
निव्वळ अंधकार होती पृथ्वी निराधार ॥ १ ॥





चंद्र सूर्य आणि निर्मळ तारे आकाश झाल्यावर
त्यामध्ये निर्मिला सागर ।। २ ।।
करुनी मातीचा पुतळा बनविला प्राणाचा फुंकार
भरविला मायेचा बाजार ।। ३ ।।
डाव्या बाजूची काढी फासळी केली तिची नार
जोडीला आदाम अपरंमपार ।। ४ ।।
एदेन बागी त्या मधल्या भागी पूर्ण दिला अधिकार
राहा तुम्ही सौख्यभरे ।। ५ ।।
देव गेले त्या सांगुनी तोडा फळ चौफेर
नका करू मधल्याचा संहार ।। ६ ।।
तोडीले फळ हे वचन मोडिले भक्षण केल्यावर
नशिबी कायमचा संसार ।। ७ ।।

## ३१२. हेवा कशी भुलली

हेवा कशी भुलली मधूर वाणी हेवा कशी भुलली ।। धृ ।।
सर्प रुपाने सैतान आला
अतिकपटाने हेवेशी वदला
मधूर वाणी हेवा कशी भुलली ।। १ ।।
मधल्या झाडाचे फळ खाशील
देवा सारखी तू होशील
मधूर वाणी हेवा कशी भुलली ।। २ ।।
आकाशातून वाणी झाली
अशी कशी ही चूक केली
मधूर वाणी हेवा कशी ।। ३ ।।

## ३१३. सामोरा तू आला नाहीस

सामोरा तू आला नाहीस दिसते आज उलटे
आहेस तू कोठे आदामा आहेस तू कोठे ।। धृ ।।
प्रतिरुपाचा तुज मी केला
नारी दिधली तुज संगतीला खेद मना वाटे ।। १ ।।





सुटला वारा शिळोप्याचा
संदेश देण्या प्रभू येण्याचा भय मज वाटे ।। २ ।।
देवा मी नग्न आहे आज
पुढती येण्या वाटे लाज भय मज वाटे ।। ३ ।।

## ३१४. दोन जीवाची जोडी

दोन जीवाची जोडी बागेत ती नागडी
पापाची घडी कडी उघडी ।। धृ ।।
मद्य धूर्त सैतान हा बदली रुप
मानवास बोले गोड गोड साप
फळाची सांगे गोडी स्वर्ग द्वार उघडी ।। १ ।।
आदाम हावाने एक आज्ञा मोडली
पापाचे मूळ हेच नरनारी काढी ।। २ ।।
शापग्रस्त मानवा रे जगी तू भटके
अंती पापे योगे भोगावे फटके
जीवाचा घात करी या सैतानाची गोडी ।। ३ ।।

## ३१५. खाण्या मधूर रुची लागे गोड

खाण्या मधूर रुची लागे गोड
फळ तोड ना येवा फळ तोड ।। धृ ।।
सैतानाने फसविले पवित्र येवेला
केले प्रवृत्त तिला फळ खाण्याला
फळ खाण्याचे भरले तिला वेड ।। १ ।।
सांगोनिया मंत्र तो गेला निघोन
येवाबाई गेली भुलोनी फळ खाण्या
झाली बेफाम काही तिला सुचेना ।। २ ।।

## ३१६. जेव्हा झाली तिला जाण

जेव्हा झाली तिला जाण मोडीलं वचन
दाही दिशा टाहो फोडी येवाबाइच्या नावानं ।। धृ ।।





बाग ती एदेन अतिसुखाचा ठेवा
राहत होते जोडीनं आदाम आणि एवा
सुख समाधान तयांचे घेतले हिराऊन ।। १ ।।
गेली भुलून त्याच्या मधूर वाणीला
कपटी डाव तयाचा तिने नाही जाणिला
फळ खाउनी आज्ञा मोडिली तिनं ।। २ ।।
देव येण्याची झालीया वेळ
कसं दाखऊ देवाला तोंड हे काळं
तेव्हापासून मानवाला ग्रासिलं पापानं ।। ३ ।।

## ३१७. सैतानाने फसविले एवेला

(संदर्भ — उत्पत्ती ३: १—६, १०)
सैतानाने फसविले एवेला केले प्रवृत्त तिला फळ खाण्याला
फळ खाउनी आदाम एवा लागे नग्न दिसायला
हे पाहुनी सैतान लागे खुदू खुदू हसायला ।। धृ ।।
फळ खायाला लय चवदार
कळू लागलं भलं नि बुरं
नेती तोडून झाडाचं पान लागलेत नेसायला ।। १ ।।
देव येण्याची झालीय वेळ कसं दाखऊ तोंड हे काळं
दडू लागले झुडुपा आड ते लपून बसायला ।। २ ।।
देवाने क्षणात सगळं ताडलं
घडू नये तं असे कसं घडलं
शापीत करून सांगीतले देवाने लावले कष्ट सोसायला ।। ३ ।।
आदामापासून झाला पक्का मानवाला लागलाय पापाचा शिक्का
पापरुपी या चिखलात माणूस लागलाय फसायला ।। ४ ।।

## ३१८. देव बागेत

देव बागेत नर नारीच्या मनात
नर नारीच्या मनात कशी झाली या फसगत ।। धृ ।।
जसा पवित्र तळयात पडे दगड पापाचा





पडे दगड पापाचा होता कपटी सर्पाचा
त्याने पाडीलं भूरळ कसं केलं या मोहीत ।। १ ।।
मध्यभागी झाड होतं फळ त्याचं ज्ञानवंत
फळ त्याचं ज्ञानवंत घेतलंय नारीनं हातात
आज्ञाभंग झालं तिथं फळ टाकुनी मुखात ।। २ ।।
बऱ्या वाईटाची दृष्टी कशी आली या क्षणात
कशी आली या क्षणात बसे गुपचुप लपत
हाक मारीली देवाने त्यांना केलं या शापीत ।। ३ ।।

## ३१९. हळू हळू आले जीवन

हळू हळू हळू आले जीवन जगी नरा
ख्रिस्ता पायी नरा ।। धृ ।।
शब्द प्रारंभी होता शब्द देवासह होता
शब्द देह रूप झाला वसे जगी नरा अंतरा
ओ ऽऽऽ जाणी नरा म्हणे तोची आपुला धनी
आत्म्या नवलाई ।। १ ।।
झाली पुरी युगाची समाप्ती पाप वाढे जगा मध्ये भारी
होई येशू देहधारी नर जन्म घेई पाप्यांसाठी
ओ ऽऽऽ प्राप्तविण्या कर विश्वाचा विसार मुखाने स्वीकार
वाट तारणाची ।। २ ।।
उठे छातीवर देऊन पाय माझा येशू राया मरणाच्या
हटविला दुष्ट सैतान खुल्या केल्या वाटा जीवनाच्या
ओ ऽऽऽ तोचि खरा तोचि खरा सारी सृष्टी तारी
शोनित करूनी ।। ३ ।।

## ३२०. शब्दानी शब्दानी केली

शब्दानी शब्दानी केली आधी उत्पत्ती प्रारंभीच ।। धृ ।।
प्रारंभाच्या आधी नांदे त्रय रूपी
सदा शुन्य माजी एक तोचि
प्रेमरूप धारणेची करिली प्रकृती ।। १ ।।





प्रारंभाच्या गर्भी सृष्टी विश्व
जन्मी घाली तोचि धनी काम कर्वी
म्हणूनी बा कळेना तुजशी प्रारंभाची गती ॥ २ ॥
दास म्हणे शब्द आत्मा एक जाण
तोचि येशू प्राण आपुलाच
येणे जाणे क्रिया तोचि करीतो स्वत:ची ॥ ३॥

**३२१. उपासना करण्यास**

उपासना करण्यास आदाम निर्मिला रे
स्वर्गा गौरव, शांती, मुखी नाम घ्यावे ॥ धृ ॥
प्रतिरूप निर्मिलेला देवाशी असावे
राज्य व्हावे पृथ्वीवरी गुण्यागोविंदाने
देवाचीच इच्छा होती पूर्ण त्या प्रीतीने ॥ १ ॥
निश्चयाचा महामेरू, सुरूंग लाविले
देवाजीच्या हेतूला हो बंड पुकारीले
ऐशा सैतानाने जेव्हा सर्प रूप ल्याले ॥ २ ॥
एदेन बागेत आला हवेशी ग्रासिले
फळ दिले खाण्या त्याने, मृत्युदान केले
उपासना भंग झाली, शाप भोगिताहे
पापाचे वेतन जगी मरणच आले ॥ ३ ॥

**३२२. प्रतिरूप दिधले**

प्रतिरूप दिधले किती हे सुंदर
पाहा दिवाचे लेकरू झाले देवाशी फितूर
त्याने मोडिला करार ॥ धृ ॥
अति ममताळू देव पडे मानवा विसर
आपुल्याच मर्जीवर वागू लागला तो स्वैर
आज्ञाभंगामुळे झाले शापित शरीर ॥ १ ॥
ईश्वराचे कृपादान गेले तेव्हा ते सोडून
स्वयं बुद्धीचे भ्रमण बसे गमावूनी स्थान





मिळे प्रतिफळ दू:खे भोगी जन्मभर ।। २ ।।
संसार चक्रामधी गुंतला तो मायेपोटी
वितभर पोरासठी कष्ट लागले त्या पाठी
आद्य कर्तव्याचा त्याला पडला विसर ।। ४ ।।

## ३२३. पाप करोनीया बसले ग

पाप करोनिया बसले ग बाई मी झाडाखाली
पापसागराला कशी माझ्या भरती आली ।। धृ ।।
अवचित सैतान आला गोडीनं बोलू लागला
खा ग बाई या फळाला मरणच नाही तुजला
वधू–वरी वृक्षाची कशी झडती झाली ।। १ ।।
तोडून तिने फळाला अर्धे देई स्वपतीला
सैतान निघून गेला पाप कळले हो तिजला ।। २ ।।
देव बोले आदामाला काय केले हे आदामा
जी दिली तू संगतीला तिने दिले फळ खायाला
वधू–वरी वृक्षाची कशी झडती झाली ।। ३ ।।

## ३२४. स्वर्गी देवाजीच्या

स्वर्गी देवाजीच्या कार्यी दृष्ट लागली तेव्हा दृष्य आदृष्याची
झोंबी लागली हिच्या करवी आले हे जगी पाप ।। धृ ।।
आहे आज पृथ्वी नाव, होती आदृष्यात
जाणत आहे घडविणारा एक कारागीर
त्याच्या बुद्धिाबळावरती दंड थोपटी ।। १।।
मी करी ऐसी करणी म्हणे एक दूत
देवाजीच्या कृत्यावरती केला अहंकार
दिव्यगणातुनी त्याला लाथ मारली ।। २।।
जगी मानवाच्या मागे लागला सैतान
पाडीत आहे पापामध्ये जगी मानवास
ह्या नरासंगे त्याने मैत्री जोडली ।। ३।।
पृथ्वीवरी आहे म्हणे तो धन्य एक गाव





गावामध्ये होती एक धन्य कुमारीका
नाव मारियेच्या उदरी उडी मारली ।। ४ ।।

### ३२५. तृष्णा

तृष्णेने वसति केली अंतरी हो
सुख गेले नराचे तेव्हापासुनी हो ।। धृ ।।
नाही ठाऊक आधी दु:ख काय त्यास
वेदनेने केला जोर स्पर्शाचे कारण
घडोघडी यातना तोशुनी हो ।। १ ।।
निरखू लागला नर आयन्यात रूप
हरपुनी गेले पार दिव्य ते विज्ञान
संस्कार दृष्टी नच लोचनी हो ।। २ ।।
झाले अष्टांग पुरे अदृष्य शरीर
मन माझे देवस्थान करिले मी घाण
मेलो पापात अवज्ञानी हो ।। ३ ।।

### ३२६. देवा देवा

देवा देवा देवा ऽऽऽ पाहू नको मम पाप
आता झाला मला पश्चाताप ।। धृ ।।
मम शरिरात मोहमायेचे बंडरुपी बी रुजले
म्हणुनी देवा हेवा आणि मी नग्न आम्हा हे उमगले
सैतानाने डाव साधिला, आणियले बहुकोप ।। १ ।।
दोष कसा मी दूजास देऊ देवा मी आहे त्यात,
स्वत:च बुद्धी इच्छा शक्ती म्हणुनी हा अपघात,
दडुनी बसलो भिउनी तुजला, दाऊ कसे मम मुख ।। २ ।।
कष्टची आले मम वाटयाला, तरी मी शांतच नाही,
प्रसूतकाळी वेदना स्त्रीला, जी स्वतंत्रच नाही,
पोटाने हा सर्प चालतो, माती भरी पोटात
असा भोगती शाप ।। ३ ।।





# राजे ग्रंथ

## ३२७. ऐका वचन परमेश्वराचे

(१ राजे ९:१०—१२)

मी केला निवास अंधारात तू राहावे सदा मंदिरात
आहे बोल हे देव पित्याचे ।। धृ ।।
राजा शलमोन मागे पहातो
आशीर्वाद मंडळीस देतो
करा गौरव देव पित्याचे
करा समर्पण मंदिराचे ।। १ ।।

## ३२८. बाल देवाच्या संदे टयाचे

(संदर्भ — १ राजे १८: २०—४०)

बाल देवाच्या संदेष्टयाचे चालेनाच काय हो
हरले ते रीस धरी एलीयाचे पाय हो ।। धृ ।।
दोन्ही बाजुचे गेले डोंगरावरी
एक संदेष्टा बोले करा तयारी
ठेवा अर्पण तुम्ही लाकडावरी
पाहु कोणाचा देव येईल सत्वरी
बोले एलीया तुमचा देव झोपेमध्ये हाय हो ।। १ ।।
सांज सकाळी देवाला पुकारी
नाही वाणी आली कुणा कानावरी
वारांच्या जखमा केल्या अंगावरी
रक्त बंबाळ झाली निरोगी सारी
रिस पैजेची हरल्याने हो केली सारी धाय हो ।। २ ।।
या रे या इकडे पाहा दैव शक्ती
टाकाल पाणी त्या लाकडावरती
तव सेवकाचे कार्य घे देवा हाती
हीच अंत:करणाची विनंती
हाती नाही अग्नी पण होम पेटला जाय हो ।। ३ ।।





# अब्राहाम

## ३२९. अब्राहामा घेउनी त्याच्या मुलाला

(संदर्भ–उत्पत्ती २२: १–१२)

अब्राहामा घेउनी त्याच्या मुलाला,
घेउनी अब्राहामा त्याच्या मुलाला
चालला बलिदान करण्याला
मुलाचे बलीदान करण्याला ।। धृ ।।
एकुलता एक पुत्र तयाचा भारी म्हातारपणाचा
त्याने तो देवाला अर्पिण्याला चालला ।। १ ।।
वेदीवरती लाकडे रचिली होम अर्पणाची तयारी झाली
त्याने तो सुरा उचलीला...... चालला ।। २ ।।
आकाशातून वाणी झाली मोकळे कर तू इसहाकाला
मागे पाहा जाळीमध्ये एडका गुंतलेला... चालला ।। ३ ।।

## ३३०. अर्पण काय करणार

(संदर्भ–उत्पत्ती २२: ७)

अर्पण काय करणार, करणार अर्पण
केली तुम्ही सर्व तयारी सामान घातले गाढवावरी
अर्पिण्या काय घेणार ।। १ ।।
सीमा नाही त्या दु:खाला
जाऊ लागले त्या डोंगराला
वेदी केली तयार ।। २ ।।
निजविले वेदीवरी बाळाला
हाती सुरा त्याने घेतला
हात धरी तारणार तारणार ।। ३ ।।

## ३३१. झाली देवाची वरुनी अब्रामा हाळी

(संदर्भ–उत्पत्ती २२: १, १२)

झाली देवाची वरुनी अब्रामा हाळी
नको इजकाचा मजला देऊ बळी ।। धृ ।।





परीक्षा जरा मी तुझी पाहिली
भक्ती तू दाविली मला मान्य झाली
मागे बघ वळुनी हा मेंढा आहे जाळी ।। १ ।।
जरी पुत्र तुझा आज झाला माझा
दृढ विश्वासाचा देतो तुजला ठसा
घेतली ऐकोनी ही तुझी रे भुपाळी ।। २ ।।
दीन दास आता होई तो बोलता
चालू सत्यपथा शिकवी तो पतिता
धरा लीन होउनी ही आशांची झोळी ।। ३ ।।

### ३३२. सत्य अब्राहामाचा परिवार

(संदर्भ—उत्पत्ती २१: २—३, २५:२१, ३२:२८)
सत्य अब्राहामाचा परिवार । करी देवाचा जयजयकार ।। धृ ।।
पत्नी तयाची साराबाई । वृद्धपणी पुत्र देव देई
त्याच्या पोटी इसाहाक जन्म घेई । वचनाचा वारसदार ।। १ ।।
राणी रिबेका वांझ असतानी । करी देवा इसाक विणवणी
जुळी मुले दिली देवाने । होईल संतती अगणित फार ।। २ ।।
याकोबाचा इस्त्रायल होई । हे नाव तयाला देव देई
बारा वंशज याकोबाठायी । चार पत्नीचा विस्तार ।। ३ ।।

## नोहा

### ३३३. असा एक वनपक्षी

(संदर्भ—उत्पत्ती ८: ११)
असा एक वनपक्षी आहे तो इमानी
जैतुनाच्या झाडाची फांदी आणली त्याने ।। धृ ।।
पृथ्वीवरचे पाणी गेले ओसरुनी असे पाहिले त्या नोहाने
उत्पत्तीचा आठवा अध्याय ऐकोनी ।। १ ।।
पृथ्वीवरील पृष्टभाग गेला वाळोनी असे दाखविले त्या नोहाने
नोहा आला बाहेर पुत्र सुना घेऊनी ।। २ ।।





## **३३४. अरारत पर्वतावर तारू टेकले**

(संदर्भ—उत्पत्ती ८: ४—११)

नोहानं पहिल्यानं कावळयाला धाडलं
कावळयाला धाडलं नि सारंच नडलं
भक्षामध्ये गुंग होउनी परत नाही आला
कावळा परत नाही आला । प्रेत पाहून तो
लागला काव काव ओरडायला ।। धृ ।।
जगात झालं अमाप पाप
पापामुळे लागला शाप
चाळीस दिवस जोराचा पाऊस
लागला पडायला पाऊस लागला पडायला ।। १ ।।
देवाने हेरलं नि तारवास तारलं
पाण्यात बुडवूनी जग सारं मारलं
पाण्याचा डोह पाहुनी नोहा पृथ्वीसाठी रडला
नोहा पृथ्वीसाठी रडला ।। २ ।।
कावळयानी केली जरी बेईमानी
कबुतर पक्षी खरा इमानी
ऑलिव्ह झाडाची फांदी चोचीमध्ये आणी
फांदी चाचीमध्ये आणी ।। ३ ।।

## **३३५. नोहाची कथा**

(संदर्भ—उत्पत्ती ६: १—९: १३)

देव बोलतो नोहाला जगी कोणी ओळखिना मजला
कोणी भजती झाडाला कोणी पुजती दगडाला
कोणी देव लाकडाचा केला ओळखिना कोणी परमेशाला ।। धृ ।।
देवाने नोहाशी वृतांत दिधला जाउनी कळीव तू आपुल्या लोकाला
कठीण वेळ जगावरी आली ।। १ ।।
नोहा तेथुनी निघाला गावामध्ये आला नाना तऱ्हेने विनाविती लोकांना
कठीण वेळ जगावरी आली ।। २ ।।
थट्टा करुनिया बोलती लहानथोर कोण ऐकणार नोहा कोण, कोण ऐकणार





पाण्यापासून जग कसे बुडणार थट्टा करुनिया बोलती लहान थोर ।। ३ ।।
नोहा तेथुनी निघाला घराकडे आला सर्व हकीगत कळविता कुटुंबाला
ओळखिना कोणी परमेशाला ।। ४।।
देवाने नोहाशी वृतांत दिधला तारू बांध तू आपुल्या बचावाला
दोन ताळ पशू आणि पक्षाला एक ताळ ठेव तुझ्या कुटूंबाला
नोहाने गोफेर लाकडाचा तारू बनविला तिनशे हात ठेवूनी लांबीला
पन्नास हात ठेंविले रूंदीला तीस हात ठेविले उंचिला ।। ५ ।।
नोहाने त्या काळात उपदेश केला लोकांना
परंतु सोडीना कोणी पापाला ऐका पुढे नाश कसा झाला
एके दिवशी सायंकाळ सुमार झाला लहान लहान ढग होते आभाळाला
ढगाने वेढिले साऱ्या पृथ्वीला पाउस टिपी टिपी आला
फार जोर केला पाहा त्या पावसाने मुसळा सारख्या धारा येतात वरून
झाडे व झुडपे जाती वाहून माड्या व हवेल्या जाती ढासळून
ओरडून म्हणती वाचवा हो कोणी ।। ६ ।।
देव गेले आता द्वार बंद करुनी फार जोर केला पाहा त्या पावसाने
चाळीस दिवसानंतर पाऊस समाप्त झाला तारू टेकले एका पर्वताला
आरारत नाव आहे त्याला शास्त्रामध्ये आहे तो लिहिलेला ।। ७ ।।
नोहाने विचार केला पाणी किती आहे कळेल मजला
पक्षांमध्ये पक्षी कावळा पहिला नोहाने त्याशी बोहर सोडला
पाखरा पाखरा म्हणे जा तू पृथ्वीला पाणी किती आहे कळीव मजला ।। ८ ।।
कावळा तेथुनी निघाला प्रेते पाहुनी बहू आनंदला
भक्षण्यासाठी गुंग झाला परत येईना तारवाला ।। ९ ।।
खरा शोध केला पाहा त्या कबुतराने इमानी म्हणतात कबुतराला
नोहानी त्याशी बाहेर सोडीला पाखरा पाखरा म्हणे जा तू पृथ्वीला ।। १० ।।
पाणी किती आहे कळीव मजला
जेव्हा निघाले तारवामधुनी
गरगर घिरटया मारी पाण्यावरुनी
जैतुनाची फांदी आणिली चोंचीत धरूनी
खरे खरे लिहिले पूर्वीच्या भक्तांनी
खरा शोध केला पाहा त्या कबुराने





दिडशे दिवस लागले पाणी ओसरण्याला
नोहा तारवातूनी उतरला
नोहाने देवास होम बली आर्पिला
देवाने दर्शन दिले नोहाला
नोहा बोलतो देवाला
काय करू मी या शुन्यमय पृथ्वीला
देव बोलतो नोहाला
नाही मारणार कधी पाण्यापासून जगाला
तुजमध्ये मजमध्ये मी जो करार केला
त्याची खूण इन्दधनुष्याला ।। ११ ।।

### ३३६. पाप झाले फार

(संदर्भ–उत्पत्ती ६: १–६)
पाप झाले फार आता–अनर्थ झाला
घडवूनी दुनिया देव पस्तावला ।। धृ ।।
सात्विक सरळ होता नोहा भक्त त्याचा
दिधला विसारा त्याला जलप्रलयाचा
होम अर्पुनी त्याने होम तीर्थ केला ।। १ ।।
आकाश पाताळ खोली नाही, वाही जलधारा
चाळीस दिवसाचा होता कार्यक्रम सारा
कराराची खूण त्याने धनतीर्थ केला
घडवूनी दुनिया देव पस्तवाला ।। २ ।।

## लोट

### ३३७. क्षणभंगूर जग

(संदर्भ–उत्पत्ती १९: १–२९)
क्षणभंगूर जग संसाराच्या मोहाला फसली
मागे का वळली बाई मागे का वळली ।। धृ ।।
सुपिकतेला केवळ बघुनी देश निवडला तो लोटानी





त्या देशातील दुष्ट जणांनी नीती ही बदलली ।। १ ।।
पापघडा भरला नगराचा निरोप कळला तुज देवाचा
झिडकार करी ती दूताचा मरणाने थकली ।। २ ।।
हात प्रभुचा जो सोडितो । मरणावीन तो काय पावतो
भाव प्रभूवर जो ठेवितो काय आम्हा कळली ।। ३ ।।

# रिबेका

## ३३८. उंटावरती

(संदर्भ—उत्पत्ती २४: १०—३२)

उंटावरती करूनी स्वारी प्रवास हो सत्वरी शोधण्या इसकाला नवरी ।। धृ ।।
सूर्य मावळता त्याच प्रहरी तांडा बसवी विहिरीवरी
कन्या आल्या घेउनी घागरी पाणी तेथे भरी ।। १ ।।
सेवक बोले त्या कन्येशी पाजीते का पाणी मजशी
दया झाली माझ्यावरी आणि त्या उंटावरी ।। २ ।।
मालीके पासूनी बेथवेलाशी कन्या रिबिका ही त्याची
जोडी जाते उंटावरती लाबानाच्या घरी शोधण्या ।। ३ ।।

## ३३९. नवरी शोभे कुलवंताची

(संदर्भ—उत्पत्ती २४: १०—६१)

नवरी शोभे कुलवंताची बांगडया नथ सोन्याची
येऊन सांगे रीत लग्नाची ।। धृ ।।
पाणी देऊनी रिबेकेने मजशी तृप्त केले दहा उंटांशी
पूर्ण झाली मनिषा ऐसी थोर कृपा देवाची ।। १ ।।
अब्राहाच्या पित्याच्या घरी म्हातारा सेवक जाई घरी
होती माणसे त्या बरोबरी बोली एका रात्रीची ।। २ ।।
घडले सारे देवापासूनी इसहकाला रिबेका देऊनी
जेवण करी सारे आनंदाने तयारी केली मुलीची ।। ३ ।।
माता पिता वर देई सारेची जननी तू लक्षावधींची
तव संतती पावे सत्ताची वैऱ्याच्या नगराची ।। ४ ।।





# योसेफ

## ३४०. याकोवाची वाणी परंतु

(उत्पत्ती २७: २२—२९)

याकोवाची वाणी परंतु येशवाचे हात
बाळा घे संदेह महान बाळा ।। धृ ।।
सरला माझा प्रवास जीवनी । अंधही झालो दोन नयनांनी
आशीर्वाद ते गमते देउनी । व्हावया जीव शांत ।। १ ।।
लाभे कैसी सत्वर मृगया । अनुकुल झालो की विधुरा या
सेवू देई अन्न तुझिया । व्हावया जीव शांत ।। २ ।।
नमतील तुजला नैश्वर जग हे । स्वामीत्वा तुझे आपले गणामध्ये
तवपदी वसतील विश्व सदोदर हा आशीर्वाद ।। ३ ।।

## ३४१. योसेफाची कथा

(उत्पत्ती ३७: ५—२८)

एक रक्ताची बारा जीवाची जीवलग त्या भावाची
हो ऐका कथा योसेफाची त्याच्या त्या जीवनाची ।। धृ ।।
हा पुत्र बहू पित्याचा होता आवडता सर्वांचा
मन निर्मळ सद्‌गुणांचा प्रिय सेवक तो देवाचा ।। १ ।।
बोले योसेफ भावाशी कळवितो स्वप्न आपणाशी
पेंढ्या अकरा गोळा झाल्या त्या नमल्या माझ्या पेंढीशी
या मानवाची झाली तयारी सूड घेण्याची ।। २ ।।
नीच कृत्य पाहा हे झाले त्या भावांनी ते केले
त्या परदेशियांना तीस रुपयास त्या विकले
निर्दयांनी काय म्हणूनी किंमत केली मायेची ।। ३ ।।
दीन दास वदे हे जाणा त्या कर्मी असे हे माना
देव तारी नीच जना देव तारी सत्या जना
अनमोलाची बहुमोलाची शिकवण त्या धर्माची
हो ऐका ज्योत ही जगाची सन्मार्गी चालण्याची ।। ४ ।।

## ३४२. स्वप्न पडले योसेफाला

(उत्पत्ती ३७: ५–२८)

तुच्छ मानू लागले त्याचे भाऊ त्याला
स्वप्न पडले योसेफाला सांगे बापाला ।। धृ ।।
एक मास गेले भाऊ कळप राखण्याला
रानात सापडले सापडले त्याला
चार रुपयाला तो देउनी टाकला
सांगा आई बंधू ते पटेल का तुम्हाला ।। १ ।।

## ३४३. का छळीता बंधुंनो मला

(उत्पत्ती ३७ : ५–३६)

का छळीता बंधुंनो मला?
काय झाला हा माझा गुन्हा ।। धृ ।।
बाापाचे प्रेमभारी आम्हा सर्व भावावरी
का भेद असा हा केला काय झाला ...।। १ ।।
दया करी मजवरी आई बाप वृद्ध घरी
ठेवा पायी आज अंत:करणा काय झाला ।। ३ ।।
परदेशी मजला नेले या पाप्याच्या हाती दिले
का बेत असा मनी केला काय झाला ।। ३ ।।
घायाळ मला केले व्यापाऱ्याला विकले
वस्त्र रक्ताने भिजविले काय झाला ।। ४ ।।

## ३४४. सांगा मुलांनो

(उत्पत्ती ३७: १४–३६)

बाप विचारी सांगा मुलानो लहाना कुठं आहे तो
लाडका पुत्र योसेफ माझा सांगा कुठं आहे तो ।। धृ ।।
देवभक्त याकोबास बारा पुत्र होते त्यास
सखा जीवाचा होता माझा बाळ कुठं आहे तो ।। १ ।।
शेळया मेंढया संगतीला जातो म्हणे मी शोधायला
काढी खुशाली नाही कळली वाट मी पहातो ।। २ ।।





मोठया भावाला शोधायला मी जातो म्हणे बोलला
मार्ग धरीला त्या क्षणाला निघुनी जातो तो ।। ३ ।।
पाही दुरून योसेफाला साऱ्या भावांनी विचार केला
मारून टाकू आपण त्याला हेवा का करतो ।। ४ ।।
मारू नका हो आपण भाऊ याला खड्डयात टाकून देऊ
काही विचारी व्यापाऱ्याला विकून टाकू तो ।। ५ ।।
झगा काढून अंगातला मारून एका बकराला
रक्त लावी तयाच्या झग्याला बापास दाखवू तो ।। ६ ।।
ओळखिला पित्याने झगा काय झाले त्यास मज सांगा
वन पशुंनी खाल्ले त्याला कुठे दिसेना तो
लाडका पुत्र योसेफ माझा ... ।। ७ ।।

## ३४५. सात गायी

(उत्पत्ती ४१ : १७—२४)

सात गायी पहिल्या तरुण सात नुसती हाडे
सांगाना या स्वप्नाचे कोडे ।। धृ ।।
पहिले स्वप्न पडले दाराशी स्वप्न पहिले द्राक्ष वेलाशी
तीन फाटे त्याला आसशी पिकलेले द्राक्ष तया दिसती
त्या द्राक्षाचा रस काढोनिया ठेविता राजापुढे ।। १ ।।
स्वप्न सांगतो दुसरा आधारी तीन टोपल्या मम डोइवरी
टोपली मध्ये शुभ्र भाकरी
होती माझ्यापाशी ही शिदोरी
डोइवरच्या पक्वन्नाला खाती घारी गिधाडे ।। २ ।।
सात गायी निघाल्या नदीतुनी
सात अशक्त तया मागुनी
तरुण गायीला टाकीले गिळोनी
सात कणसे भक्षिले कणसांनी
प्रभुच्या दासाचे स्वप्न ऐसे ठेविता तुमच्यापुढे ।। ३ ।।





### **३४६. बांधवा ओळखिले का मला**

(उत्पत्ती ४५: १–१५)

बांधवा ओळखिले का मला
पाहा निरखुनी असा जवळुनी कोण मी कोठला ।। धृ ।।
प्रासादाला नको बावरू सरदरा ही नको घाबरू
तुझ्या स्वकृतीचे उधळे वारू परतुनी आपल्या स्थळा ।। १ ।।
वैभवाला माझ्या बघुनी नकोस जाऊ इतका दीपुनी
जरी ही आपुली एकच जननी एकच पिता बापुडा ।। २ ।।
काळ झाला तीन तपांचा संदेश दिधला प्रभू येण्याचा
तोच असे मी बांधव तुमचा योसेफ धाकला ।। ३ ।।

## **मोशे**

### **३४७. तारी तो भक्ताला मोशे**

(संदर्भ–प्रयाण २: ३–७)

तारी तो भक्ताला मोशे हा राजा झाला ।। धृ ।।
लव्हाळयाचा पेटारा करुनी घट्ट केला राळ डांबराने
आत बाळ निजविला ।। १ ।।
येई फारो कन्या नदी स्नानाला । पेटारा दासीच्या जवळी आला
आत बाळ निजविला ।। २ ।।
दायी आणू का इब्र्यामधुनी । निज मातेशी आली घेउनी
राजग  ही वाढला ।। ३ ।।

### **३४८. निवडीले आहे तुला**

(संदर्भ–प्रयाण ३.: ३–२२)

निवडीले आहे तुला देव मोशेस हे बोलला ।। धृ ।।
अग्नीरुपाने दिले दर्शन झुकवूनी माथा करीतो नमन
अग्नीद्वारे प्रभू बोलला ।। १ ।।
जड ओठाचा जड जिभेचा असला जरी तू भक्त देवाचा
मी आहे तुझ्या जोडीला ।। २ ।।





इस्त्रायलचा अधिपती होशील कळप माझा तू पहाशील
उणे पडणर नाही तुला ।। ३ ।।

### ३४९. हात वर करी माशे

(संदर्भ—प्रयाण १४ : २१—२३)
सुटे वारा पुर्वेकडचा मात पाण्यावरी ।। धृ ।।
हाटविला समुद्र त्याने शक्ती देवाची
झाले दुभंग पाणी रस्ता इस्त्रायलाशी
इस्त्रायल लोक चाले शक्ती देवाची ।। १ ।।
फारो राजा वैरी केले प्रवृत्त इस्त्रायली धराण्याशी
प्रभू उभा राही अग्नीच्या रुपाने ।। २ ।।
म्हणे प्रभु मोशेला समुद्रावरी हात वर होई पुन्हा एक धार पाणी
सर्व सैन्य फारोचे गेले बुडोनी ।। ३।।

### ३५०. काठी घे म्हणाला

(संदर्भ—प्रयाण २० : ११—१३)
पाणी निघेल कर आज्ञा खडकाला ।। धृ ।।
आणली काठी त्यांच्या समोरुनी उभे केले मंडळीसह मोशे अरोहन
ऐका बंडखोरांना म्हणतो मंडळीला ।। १ ।।
उचलूनी हात काठी मारी खडकावर
वाहे पाणी पीती मंडळी त्यांची जनावरे
नाही तुम्ही माझ्यावर विश्वास ठेविला ।। २ ।।
देश दिला मी ज्या मंडळीना
धाडणार नाहीं तुम्हा देशी येण्या
नाव मरिब्बा ठेविले त्या झऱ्याला ।। ३ ।।

### ३५१. देवाजीची लीला

(संदर्भ—प्रयाण २: ३—१०)
देवाजीची लीला ऐका हो अशी
धाडीले मोशाला त्या वैऱ्यापाशी ।। धृ ।।





फारोचा हुकूम सुटला मारण्याशी बाळ
तीन महिने लपवी बाळ माता टाळी काळ
पेटाऱ्यात ठेवी बाळ पहा ती कशी ।। १ ।।
पेटाऱ्यात ठेवी बाळ एका नदी काठी
राजकन्या दासीसह आल्या स्नानासाठी
बहिणीची तेथे माया दाविली कशी ।। २ ।।
दूध पाजण्यास म्हणे आणा त्या बाईला
गृहिणीचा पगार देऊ केला मातेला
माय लेकराची भेट झाली अशी ।। ३ ।।

## ३५२. झुडुपामधोनी

(संदर्भ—प्रयाण ३: १—१७)

झुडुपामधोनी अग्नी रुपानी झाली देवाची वाणी
मोशे मोशे हाक देवाची आली कानी ।। धृ ।।
जागा पवित्र आहे उभा तू काढुनी जोडे थांब जरा तू
देव तुझा मी अब्राहामाचा इसाहकाचा याकोबाचा
लोकांची माझ्या मिसरामधुनी द्यावी सुटका करोनी ।। १ ।।
वाहे प्रवाह दुधामधाचा शोध तू घ्यावा त्या देशाचा
जाउनी सगळे त्या देशाला सोडा गडे या
संकटाला सोने रुपे आणि पोशाख भारी
आणा सारे लुटुनी ।। २ ।।

## ३५३. मोशे

(संदर्भ—प्रयाण २: ३—१०)

लव्हाळयाच्या गं पेटाऱ्यात बाळ खेळतं, खेळतं गं कुणाचं ।। धृ ।।
चंद्रापरी रूप दिसे गोड फुलावानी हसे
मला दिसतंय गं दिसत हे गुणाचं ।। १ !!
नका गं लावू कोणी नजर उचलून घ्या गं कडेवर
ह्याला पाजाया नाही गं आता कोणी ।। २।।
नाव ठेवी सुंदर मोशे शोभून याला दिसे कसे
राजदरबारी मिळेल याला मान ।। ३ ।।





# बलाम

## ३५४. बलाम

(संदर्भ – गणना २२: २१–३१)

बलाम गाढवीवर स्वार हो झाला देवदूत त्याला आडवा झाला
जाण्या निघाला इस्त्रायलाशी शाप देण्या
दिली देवाने वाचा तिला लागली गाढव बोलायला ।। धृ ।।
का मारिले तीनदा मला असा अपराध काय मी केला
जन्मापासुनी जिच्यावर बसला ठाऊक नाही तुला? ।। १ ।।
बलाम बोले त्या गाढवीला माझी चेष्टा का केली
माझ्या हाती जर असती तलवार छाटले असते तुला पार ।। २ ।।
विपरीत मार्गाला जाऊ नकोस बोले देवदूत त्या बलामास
हाती पाहुनी नंगी तलवार नत मस्तक तो झाला ।। ३ ।।

## ३५५. क्रुसावर त्या सर्प

(गणणा २१: ४–९)

क्रुसावर त्या सर्प भुलला जाऊन पाहू चला रे
उतरेल सर्प चावलेला रे ।। धृ ।।
इस्त्रासल ते महान त्यागी जात त्या आणली खोडयामोर करीत
सर्व मिळोनी ती बोलती मोशाला मारण्यासाठी का आणले आम्हाला
वेळ आमचा सारखा धरिला ।। १ ।।
दिली आज्ञा देवाने मोशाला सर्व प्रतिमा द्याव्या जगताला
जो कोणी पाहील तिजला ।। २ ।।

# यहोशवा

## ३५६. यॉर्देनचे पाणी

(यहोश्वा ३: ३–१४)

यॉर्देनचे पाणी हटविले कोणी ऐकताच राजे गेले घाबरुनी ।। धृ ।।
दिस सुगीचे अति आनंदाचे दुथडी भरुनी जल वाहे एकदाचे
यहोशवाला आज्ञा केली देवाने ।। १ ।।





कराराचा कोष लोकांपुढे चाले चालत असता नदी तिरी आले
वाट दिली सागराने माघार घेउनी ।। २ ।।
कोष वाहणारे झाले मध्यभागी स्थीर चाळीस हजार योद्धे झाले नदी पार
यहोशवाचे राही भय धरुनी ।। ३ ।।
समर्थ आहे परमेश्वराचा हात सेवा तयाची कर आल्या आयुष्यात
यहोशवाचे देती सारे वचनी ।। ४ ।।

# शमुवेल

## ३५७. असो गरीबी

(संदर्भ– १ सॅमुयेल १:–२: २१)
असो गरिबी नसो नशिबी हा वांझुटेपणा
देवा माझ्या घरी हलू दे पाळणा ।। धृ ।।
रामाधाई साफी मागावी राहतसे रहकमा हे नाम तयाचे हन्ना पातिताना
नाही पोटी हन्नाच्या लहानसा एक मुन्ना ।। १ ।।
हन्ना सांगे एकदिन प्रभू ते नाही पोटी पुत्र प्रसव ते
शुभ कार्यात मला घेईना कोणी हीनविती जग सारे
पुसते तुजला आज रडोनी काय केला मी गुन्हा ।। २ ।।
आनंदाने मन हे भरले शमुवेल नाम हे त्याला
पाळण्याची धारिते मी दोरी ठेवीन बाळा तुझ्या समोरी
हे जगदिशा तुझीच आशा पुन्हा ।। ३ ।।

## ३५८. शमुवेल जाणी अवाज कानी

(१ सॅमुयेल ३: १–२०)
धन्य धन्य शमुवेल जाणी अवाज हा कानी
मंदिरात उठुनी पाही तो ती कोणाची ही वाणी ।। धृ ।।
पुण्य काम करण्या तुझिया नामे साक्षी द्यायाला देवा वदणे
तूच घडविले स्पर्शे देवूनी कोणचीही वाणी ।। १।।
पाही तर ऐसा जगी नसे कोणी निरंतर भक्ता असू दे ध्यानी
पुण्य नाम ठेविले त्वा पारखुनी कोणाची ही वाणी ।। २।।





### ३५९. दाविदाला म्हणे प्रभू

(२ सॅमुयेल ७: ७–१७)

दाविदाला म्हणे प्रभू बांधावे मंदिर
धरीला मनोदय खरा पण होणार नाही जाण ।। धृ ।।
म्हणे परमेश्वर निवडी अंधार वस्ती जेथे मीच करीन
नामाच्या निस्वार्थ बांधिले मंदिर ।। १ ।।
मागे वळोनी पाहिले राजाने उत्तर दिले स्व मुखाने ।। २ ।।
जो तुझ्या पोटी पुत्र जन्मेल तोच माझे मंदिर बांधील
देवाच्या आज्ञेनुसार शलमोन बसला गादीवर ।। ३ ।।

### ३६०. सिंहाच्या लागेल का रे हा नादी

(१ सॅमुयेल १७:३४–३६)

सिंहाच्या लागेल का रे हा नादी ।। धृ ।।
दिव्य साह्य देवाचे मजला मिळाले
पाठलाग करुनिया सिंहा ठार केले
पलिष्टा तूच लेखलेस नीच वादी ।। १ ।।
झाले पाहा आता हे सुरू देवयुद्ध
घेउनीया हातामध्ये काठी घेई दाविदा
मारिला घेउनिया गोटा गोफनीमधी ।। २ ।।
छातीवर पद ठेऊन शिरच्छेद केला
पाहुनी पलिष्टाने पळ काढीला
सांगतो गोष्ट ही दासाची आधी ।। ३ ।।

## इयोब

### ३६१. इयोब दाखला

(संदर्भ – इयोब १: १३–२२, ४२: १०–१७)

दु:खे भोगी देवासाठी मरण मला जरी आले देवा रे ।। धृ ।।
महाकाळाचा फेरा आला संतती संपती नाश केला
सोडणार नाहीं मी देवाला जीवनी झाले हाल रे ।। १ ।।





जगात सुखे मागे सारी पण इयोब दु:ख स्वीकारी
होता विश्वास देवावरी, कसोटीत तो तरला ।। २ ।।
सत्त्याचा तो विजय झाला संतती संपती पुन्हा त्याला
तो सत्य भक्त कित्ता त्याला नवे जीवन दिले रे ।। ३ ।।

## उपदेशक

### २६२. सांभाळून टाक पाउले

(संदर्भ– उपदेशक ५: १–४)
सांभाळून टाक पाउले मंदिरात देवाच्या
काही कळत नाही बोलणे अधर्माचे ।। धृ ।।
अधर्म आपण करितो त्यासी कळत नाही
सदा सदा करितो बोलण्याची घाई
उतावळे नको मन उभा समोर देवाच्या ।। १ ।।
बोलणे तुझे रे अल्पसे असावे
देवा तुझा आणि माझा स्वर्गात आहे
आहे पृथ्वीवर तू स्वप्न पाही स्वर्गाचे ।। २ ।।
तोंडामुळे शासन नको देवा
बोलला चुकून असे दूता समोर नको जाऊ
उपदेशक पाचवा अध्याय शास्त्राचा ।। ३ ।।

## दानिएल

### ३६३. सिंहाचे तोंड बंद

(संदर्भ – दानिएल ६:८–२४)
सिंहाचे तोंड बंद करितो दानिएल गुहेमध्ये शिरतो ।। धृ ।।
प्रांत अधिकारी जमवूनी सगळी गुहेमध्ये ते फिरुनी पहाती
पूजा करावी देवाची सत्यानी दानिएल ऐकतो ।। १ ।।
नित्य नियमाने तिनदा उठोनी खोलीमध्ये त्या प्रार्थना करोनी
गुडघे टेकूनी तो बसला धन्यवाद ऐकतो ।। २ ।।





### ३६४. दानिएल

(संदर्भ – दानिएल ६:१०–२३)

फार्मावरती सही झाली आजला फसविले त्याला ।। धृ ।।
पाहुनी दानिएल घराकडे गेला गुढघे टेकुनी नमतो देवाता ।। १ ।।
पकडुनी आणिले दानिएलाला राजाने मनी विचार केला
कसे सोडू तुला सुचेना रे मजला अरे दानियेला ।। २ ।।
गुहेमध्ये टाकियले दानियेलाला रात्रभर राजा उपाशी बसला
मोठया पहाटे गुहेकडे गेला हाक मारी त्याला ।। ३ ।।
गुहेमधुनी दानिएल बोले राजाला अपराध तुझा काय मी केला
जीवंत देवाचा खरा भक्त ठरला काढा बाहेर त्याला ।। ४ ।।

### ३६५. भिऊ नको दानिएला

(संदर्भ – दानिएल ६:८–२४)

भिऊ नको दानिएला मीच तारी मीच तारी रे प्रार्थना करी ।। धृ ।।
राजाने चौकशी नाही केली गुन्हा नसताना आज्ञा केली
व्यर्थ आरोप हा त्याच्यावरी ।। १ ।।
गुहेमध्ये त्याला धरुनी टाकिती वाघ सिंह त्याचा सांभाळ करिती
व्यर्थ आरोप हा त्याच्यावरी ।। २ ।।

## योना

### ३६६. योना जहाजाच्या तळाशी झोपला

(संदर्भ – जोना १: १–१२)

योना जहाजाच्या तळाशी गाढ झोपला
आले तुफान वारा त्यात कोपला ।। धृ ।।
येऊन म्हणती तांडेल त्याला सुटले वादळ झोपी का गेला
उठवी तयाशी विनवी देवाला
सर्व मिळूनी चिठ्ठया त्यांनी टाकल्या ।। १ ।।
संकट आम्हावर आले कोणामुळे
घाबरी झाले खलाशी सगळे
धंदा काय विचारी त्या बोले
आहे इब्री मी उपासक म्हणाला ।। २ ।।





चालला पळून हो त्याशी कळाले
व्हावा समुद्र शांत त्याजला विचारले
टाका उचलूनी मज योना त्यांना बोले
नको दोषी ठरवू प्रभू तू आम्हाला ।। ३ ।।

### ३६७. योना निनवेला

(संदर्भ — जोना १: १—२: ११ व उपदेशक ५)
परमेश्वर बोलला त्या योनाला
उठून तू जावे आता निनवेला ।। धृ ।।
दुष्टतेचा कहर हा निनवेत झाला
जाऊ कसा मी आता त्या निनवेला
देव दृष्टी आड होता हो योना याफोला तो गेला ।। १ ।।
आज्ञा मोडुनी देवाची तार्शिसाला जाणाऱ्या जहाजात बसला
भडकला कोप देवाचा वायू तयाने सोडला
घाबरले जन सारे हो घात कैसा झाला चिंतामग्न झाला ।। २ ।।
करीती विचार सारे आपुल्या मनाला
संकट आले कैसे आपुल्या नाशाला चिठ्ठया टाकुनी ते पाही हो
त्याच घडीला महासागराला ।। ३ ।।
योना बोले सर्वजनाला चिंता ही कशाला
फेकून टाका मला महासागराला
सोडीती सागरी तयाला हो दर्या शांत झाला यज्ञ तो कशाला ।। ४ ।।
योनासाठी परमेश्वराने मासा सिद्ध केला
त्याच क्षणी त्या माशाने योनाशी गिळला तीन दिवसांनी तो पुन्हा हो
भूवरी टाकिला उद्धार तू केला ।। ५ ।।

### ३६८. योना सांग सुवार्ता

(संदर्भ — २ राजे १४: २५)
देव आज्ञा तुज झाली योना निनवे नगरी जा
सांग सुवार्ता सांग तू ।। धृ ।।
भय तूज वाटे बहू देवाचे त्याहुनी वाटे त्या निनवेचे
सोडुनी तारू त्या निनवेचा स्तवू या परमेशा ।। १ ।।





जनता तेथली अती बहकली परमेशाला विसरून गेली
भय चिंता तुज नसे ही असली सांग तयाला सांग ।। २ ।।
देव दासाचे रक्षण कर्ता निशीदिनी त्याचे साहाय्य कर्ता
त्या करवी गौरवूनी घेतो धाव प्रभुपदी धाव ।। ३ ।।

### ३६९. योनाचा दाखला

(संदर्भ – जोना १: १–२: ११, ३: १०)
ते काम देवाजीचे, भक्ताचे कर्तव्याचे
वाणीस पण तो भ्याला भ्याला
योना पळुनी गेला ।। धृ ।।
संदेश अनमोल अनीती जना बोल
पाहा देव तो कोपेल निनवे धूळ होईल
बैसे धक्का मनाला पाही त्या जहाजाला
वाणीस पण तो भ्याला ।। १ ।।
जहाजाच्या त्या तळाशी जन घाबरे खलाशी
दैवी आयुच्या क्षणाशी गाढ निद्रा लागे त्याशी
विचारी उपाय त्याला म्हणे टाक पाण्यात मला
वाणीस पण तो भ्याला ।। २ ।।
तीन दिन तीन रजनी मच्छ पोटात राहुनी
प्रार्थना देवा नमोनी मच्छ देवाच्या आज्ञेनी
ओकिता त्या योनाला वाचवी निनवेला
वाणीस पण तो भ्याला भ्याला ।। ३ ।।

## नवा करार

## ख्रिस्तजयंती

### ३७०. मारियेला संदेश

दिला संदेश दूताने मारियेला धक्का बसला तिच्या हो देहाला ।। धृ ।।
स्त्रियांमध्ये आहे तू महान तुला होईल पुत्राचे दान
शब्द ऐकता (२) मारीया गेली ती घाबरून ।। १ ।।





धन्य धन्य तू मारियाबाई पुत्रदान जगा देई
शब्द ऐकता (२) मारीया गेली ती हर्षूनी ।। २ ।।

### ३७१. नमो नमो मारीया

नमो नमो मारीया दूतांचा नमस्कार
तुझ्या पोटी जन्म घेई प्रभू तारणहार ।। धृ ।।
सर्व स्त्रिया मध्ये तू आहेस धन्य
देव बाप झाला आहे तुजला प्रसन्न
मारियेने केला देव पुत्राचा स्वीकार ।। १ ।।
योसेफाच्या मनामध्ये संशय तो येई
निष्कलंक मारीया का गर्भवती राही
धर्म पत्नी सोडण्याचा योजला विचार ।। २ ।।
स्वप्नी योसेफाच्या येई देवाचा दूत
निष्कलंक मारियेला देऊ नको दोष
गुण्या गोविंदाने नांदे पवित्र परिवार ।। ३ ।।

### ३७२. मना वाटे

मना वाटे भरोनी आनंद । नाम घेता प्रभू नंद ।। धृ ।।
बसले मी होते माझ्या महाली । वार्ता आणली देवदुतांनी
तुझ्या उदरी देवाचा अवतार ।। १ ।।
भयभित होऊन या शब्दास । जाणत नाही मी पुरुषास
कसा येईल हा अवतार ।। २ ।।
पवित्र आत्मा तुजवर येईल । ईश्वर शक्ती प्राप्त होईल
पतितांचा करील उध्दार ।। ३ ।।

### ३७३. जन्मले मारियाबाईचे बाळ

जन्मले मारियाबाईचे बाळ
उठा ग उठा आज दौंडीही पिटा आनंद लुटा
सोन्याची आली सकाळ ।। धृ ।।
मारीया उदरी ख्रिस्त जन्मला आनंद झाला जगाला
तनमन धन अर्पूण त्याला प्रभुबाळाच्या चरणाला
स्वर्ग सोडुनी भूवरी आला आशिश दे आम्हाला ।। १ ।।





जनता सारी धावत आली प्रभुबाळाच्या दर्शनाला
टाळ विण्याचा करुनी गजर दुमदुमला दरबार प्रभूचा
साऱ्या जगतीचा तू राजा झाला आम्हासाठी अवतरला ।। २ ।।

## ३७४. जगाचा तारणारा ख्रिस्त राजा

जगाचा तारणारा ख्रिस्त राजा जन्मी आला
तो गायीच्या गोठी अन् मारियेच्या पोटी ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा तुटला मागी जनांनी तो पाहिला
चला रे चला प्रभू दर्शनाला गायीच्या गोठी जन्मी आला
चला बंधू प्रेमाने वंदू त्या बाळाला ।। १ ।।
साधे भोळे मेंढपाळ हे रानी लागली नाचाया
उद, बोळ, सोने घेउनी अर्पण करु त्या बाळाला
दाविद नगरी बेथलेहेमी, पाप्यांचा वाली जगी अवतरला
वार्ता कळली दाही दिशला, येशू जन्मी आला ।। २ ।।

## ३७५. जो जो रे बाळा

जो जो रे बाळा गाते अंगाई तुजला
तव जन्माने धन्य मी झाले बाळ अवतरला ।। धृ ।।
झोप तू लवलाई मी तव आई मारीया बाई गाते अंगाई
मातृसम कर सुखकर नाही दुसरा जगी कोणी ।। १ ।।
जगी ना तुला थारा तव जन्माची वार्ता सांगे नभी तारा
आला म्हणोनी दाविद नगरी संगे दूत मेळा ।। २ ।।

## ३७६. बाळा जो जो रे

स्तुतीस्तोत्रे ही गाती अवनी नाचती दूतगण सारे बाळा जो जो रे ।। धृ ।।
शांती–प्रितीचा राजा खेळे सृष्टपाळणा तयातून लोळे
स्वर्ग प्रीतीचा दोर बांधुनी हालविते मी तुजला रे
सोनेरी किरणांनी नटल्या दाही दिशा तुजलाही नमल्या
लीन मने तुज नमन करोनी गर्जती हिंस्त्र पशू रे
बाळा जो जो रे ।। १ ।।





पक्षीराय ते जमवून मेळा गाती स्तवने तुज वेल्हाळा
अती आनंदे सैरावैरा धावती वनपशू सारे
बाळा जो जो रे ॥ २ ॥
हरिण प्रेमे कुरवाळी पाडसा पाजिती गायीगोठी वासरा
चोंच पसरुनी बसली पिल्ले चिमण्यांची गोजीरे
बाळा जो जो रे ॥ ३ ॥
मागी धावती दर्शन घ्याया लागे धनगर मार्ग क्रमाया
पुस्तक उघडूनी बसले ज्ञानी शोधिती जन्म तुझा रे
बाळा जो जो रे ॥ ४ ॥
कणक केवळ तुज अर्पिती राया छकुल्या राजा तव चरणा या
नव जन्म हा आमुच्या हृदयी घेई सदैव असा रे
बाळा जो जो रे ॥ ५ ॥

## ३७७. हालविते तुज पाळणा

निज निज ना मन रमना रे हालविते तुज पाळणा ॥ धृ ॥
रडतो किती तू किती ही उगा ना रात राणी ही चिवचिव करीती
लुकलुकती ही काजवे घरटी खोड काढी का उगा रे ॥ १ ॥
सुप्त चांदणे हसवी तुला रे शांत प्रकाशी नीज तू बाळा रे
कुठे जावू तुझ्या विना रे ॥ २ ॥
पाजिते म्हणे मी दूध ही पिईना मांडी घेवू का म्हणतो नको ना
का करशी वल्गना ॥ ३ ॥
येशू बाळ का तुजला सारीखा होता हटील का आई मारी का
तू तर जगा वेगळा ॥ ४ ॥

## ३७८. आनंद झाला

आनंद झाला येशू बाळ जन्मी आला ॥ धृ ॥
प्रथम कळले मेषपाळाला म्हणे जाऊ बाळ बघण्याला
ऊद बोळे साने घेउनी अर्पिती हो त्या बाळाला ॥ १ ॥
वार्ता कळली हेरोदाला म्हणे जाऊ बाळ मारण्याला
दूत बाले यासेफा निघुनी जा मिसर देशाला ॥ २ ॥





## ३७९. तुझ्या मंदिरामध्ये

तुझ्या मंदिरामध्ये बाळाला वाहिले
नेत्राने माझ्या देवा प्रभुला पाहिले ॥ धृ ॥
शत वर्ष पूर्ण जहाले बाळास पाहून माझे मन आनंदले
हातावर घेउनिया गीत मी गाइले ॥ १ ॥
धन्य धन्य धन्य देवा धन्य तुझी करणी
हर्षाने फुलली माता धरणी
तुझ्या पुत्राला देवा जगी तू धाडिले ॥ २ ॥

## ३८०. सिमोन नितीमान

येरुसलेम सिमोन नितीमान धार्मिक होता भक्तीमान ॥ धृ ॥
पवित्र आत्म्याची कृपा तयाला नाही तोवरी मरण हे जीवदान ॥ १ ॥
विधी नेमाने शुद्धी करण्या योसेफ मारीया निघाले जाण्या
सवे घेउनी येशू बाळ तान्हा ॥ २ ॥
योसेफ मारीया मंदिरी आली सिमोना हाती बाळास दिधले
जगतारक पाहिला नेत्रानं त्या सिमोनानं
देव मंदीरी पहा हो आले ॥ ३ ॥

## ३८१. ऐका गडयांनो हर्षाची वार्ता

ऐका गडयांनो हर्षाची वार्ता धनगर वाडीला कळले आता
दाविद नगरी जन्मला म्हणती आमचा तारणदाता गडयांनो ॥ धृ ॥
नवल जाहले कालच्या रात्री धनगर असुनी मेंढया राखिती
वेळ झाली मध्यरात्रीची तोच अचानक गगनामधुनी
प्रकाश दिसला लोका गडयांनो आमचा तारणदाता ॥ १ ॥
देवदुतांची गाणी मनोहर उर्ध्व लोकी देवाला गौरव
कृपायुक्त ते झाले मानव गायीच्या गोठी जन्मला म्हणती
आमचा तारण दाता गडयांनो ॥ २ ॥
गरिबांचे हे दैन्य संपले शांती प्रीतीचे राज्य पसरले
मृत्युचे भय ना उरले
गायीच्या गोठी मारियेच्यापोटी जन्मला तारणदाता ॥ ३ ॥





दूत पाहुनी सर्वच भ्याले भिऊ नका ते दूत वदले
गायीच्या गोठी मारियेच्यापोटी जन्मला तारणदाता ।। ४ ।।

### ३८२. हे मनात बसता

हे मनात असता ख्रिस्त वसे हे गुपित कुणाला सांगू कसे ।। धृ ।।
रानामधे देवदुतांनी वार्ता कळविली मेंढक्यांना
वाणी ऐकूनी होउनी भयभित उलथुनी पडले धरणीला ।। १ ।।
मेषपाल ते तयार झाले तारा पाहुनी ज्ञानी निघाले
आले धाउनी पाहुनी प्रभुच्या चरणी देह अर्पियले ।। २ ।।
पापी जगाच्या उध्दारकाला जयजय येशू नाम बोला
उठा त्वरेने जाऊ प्रेमाने मारियेच्या त्या पुत्राला ।। ३ ।।

### ३८३. शांती सागराच्या जाऊ दर्शनाला

शांती सागराच्या जाऊ दर्शनाला, राजे मेंढपाळ आले
दिसला तेज तारा ।। धृ ।।
नभोमंडळात जयघोष झाला, गाती गायना
ख्रिस्ताला गौरविती देवाची प्रीती पृथ्वीलाही शांती
देवाचा शब्द आला शब्द देह झाला ।। १ ।।
जाउनी सांगा वार्ता जगाला बाळ जन्मला
अजुनही धुंडाळीती देवाची दिव्य प्रीती
मरियमच्या नंदनाने जगविले मानवाला ।। २ ।।

### ३८४. गगनी तारा तुटला

गगनी तारा तुटला वारा हर्षाचा सुटला
चला जाऊ चला प्रभू मंदिरा ।। धृ ।।
दावीद नगरा बेथलेहेम गावी तारणरा जन्मी आला
मोदे सारा जाऊ चला प्रभू मंदिरा ।। १ ।।
रानात रात्री मेंढपाळ धावले दर्शना
लीन मनाने वंदिती प्रभूच्या चरणा प्रभूच्या चरणा
मोदे सारे जाऊ चला प्रभू मंदिरा ।। २ ।।





### ३८५. दुताने मेंढक्याला

दुताने मेंढक्याला वाणी दिली रात्रीला
बेथलेम नगराला तारणारा जन्मी आला ।। धृ ।।
गावामध्ये नव्हती जागा त्या बेथलेम नगराला
गायी गोठी पाप्यासाठी थंडीत जन्मी आला ।। १ ।।
तीन ज्ञानी गेले होते बाळाच्या दर्शनाला
ऊद बोळे आणि सोने अर्पिती त्या बाळाला ।। २ ।।

### ३८६. जाग रे मनुजा

जाग रे मनुजा जाग जरा
तुझ्यासाठी ख्रिस्त जगी अवतरला ।। धृ ।।
मेंढक्यांनो उठा पळा बाळंत्यात पाहा बाळ
वंदूया चरणा प्रभू बाळा ।। १ ।।
सोने घेऊ उदबोळ चला पाहू ख्रिस्तबाळ
जगताचा तारणारा जगी अवतरला ।। २ ।।

### ३८७. प्रभू जन्माची वार्ता

प्रभू जन्माची वार्ता कळाली बेथलेम नगराला
आनंद बहू झाला आम्हाला ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा उगवला मागी लोकांनी तो पाहिलेला
मार्ग त्यांनी धरला ।। १ ।।
उद बोळ सोने घेउनी हाती जयघोष करिती मिळुनिया साथी
जाऊया दर्शनाला ।। २ ।।
स्वर्ग सुखाचा तारण दाता पाप्यांसाठी तो जगती आला
बेथलेमी जाऊ चला ।। ३ ।।

### ३८८. प्रभू जन्माची वार्ता

प्रभू जन्माची दाही दिशेला वार्ता ही पांगली
बाळ दर्शनाला माय धरणी लोभली ।। धृ ।।





रानी वनी मेषपाल मोदभरे वार्ता कळता नाचू लागले हर्षभरे
सोडून सगळे रान मेढरे प्रभुकडे धावली ।। १ ।।
ज्ञानी लोक हे बेथलेमी पावले प्रभू येशूच्या पवित्र चरणी ते नमले
उद बोळ घेउनी त्यांनी प्रभू पदी वाहीली ।। २ ।।
देवदुतांनी गगनामधुनी पाहिले देव पुत्र हे बेथलेमा जन्मले
जय जय जय गर्जू लागले ख्रिस्त गुरुमाउली ।। ३ ।।

## ३८९. धनगर होते झोपेत रं

धनगर होते झोपेत रं देवदूत आलंय गर्जत ।। धृ ।।
मेढरं बसली अवती भवती मध्ये शेकोटी पेटवली होती
घोंगडी घेऊन अंगावरती कोणी घेत होते विश्रांती
पडलाय प्रकाश ऽऽऽ अवचित रं ।। १ ।।
भिऊ नका तुम्ही बहादूर माझ्या शब्दाचा करा विचार
गाव बेथलेमनगर तेथे आवतरला तारणहार
झाले ते एकून ऽऽऽ हर्षित रं ।। २ ।।
पहिली वार्ता मेढपाळांना दुसरी खबर ती राजांना
तिसरी खबर सर्व लोकानां तारा पूर्वेचा आकाशी आला
मेढपाळ चालले या ऽऽऽ धावत रं ।। ३ ।।

## ३९०. कोठे जन्मला बाळ

कोठे जन्मला बाळ सांगावे येऊनी वदे हेरोद मागी लोकांशी ।। धृ ।।
वर्तमान सांगे दूत योसेफाशी बाळाला घेऊनी जा तू मिसराशी ।। १ ।।
त्वरा करुनिया शोध करा झाली देऊळ दर्शन आली ।। २ ।।

## ३९१. देवपुत्र येशू जगती आला

देवपुत्र येशू जगती आला तारण आमचे करण्याला ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा उगवला मागी लोकांनी तो पाहिला
त्याच दिशेने निघाले शोधायला प्रभू ख्रिस्त राजा जगती आला ।। १ ।।
गायीच्या गोठी मारियेच्या पोटी बाळंत्यांनी गुंडाळलेला गव्हाणीत निजलेला
मेंढक्यांनी पाहिला ।। २ ।।





## ३९२. ऐका सुवार्ता

ऐका सुवार्ता बेथलहेमा जन्मे येशू बाळ
उद बोळ सोने घेउनी अर्पू प्रभुपदी प्राण
या वंदू बाळा एकूलत्या पुत्रा गातो जगाचा तार
या हर्षे गाऊ गर्जुनी सांगू आला राजा जगाचा महान ।। धृ ।।
स्वर्गी देवा गौरव नांदो शांती भूमीवरी
देवे दिधले वरदानच हे सांगू गावोगाव ।। १ ।।
देवे आळवू सारे मिळुनी करू या ही विनंती
या स्तुतीगाणा तव पदकमली स्वीकारुन घेई
परम पवित्रा निशीदिनी गाऊ करू या जय जय कार ।। २ ।।
निश्चय पुरता आपुला करुया विसरुनी आपला हा भेदभाव
जगता वाढो बंधू भाव
परम पवित्रा निशीदिनी गाऊ करू या जय जय कार ।। ३ ।।

## ३९३. दाविद घराणं

होतं एक दाविद घराणं तरीले जगा पाहा त्यानं त्यानं ।। धृ ।।
पिता योसेफ मारीया माता आशीर्वादाचा पुत्र होता
ठेवी कर्तव्याची ती जाण जाण ।। १ ।।
दाविद घराणं ते नितीमान देवा पदी ते वाही जीवन
दिले इश्वराने दान दान ।। २ ।।
या अवनीला आहे अंत या घराण्याला नाही अंत
स्वर्गाची आहे ती शान शान ।। ३ ।।

## ३९४. ज्याच्या काठीस येतील फुले

ज्याच्या काठीस येतील फुले असा वर शोधा मारीया बोले
माझे जीवन प्रभुला वाहिले, प्रभुला वाहिले ।। धृ ।।
भावी पती शोधा निर्दोष ज्याच्या काठीला फुलाचा घोस
जो तो पाहून होईल खुश कितो सुगंधी हा पुष्प घोस
शुभ मंगल मारियेचे झाले झाले ।। १ ।।
ठरला लग्नाचा शुभ मुहूर्त दिले निमंत्रण हातो हात





केला योसेफ हा पसंत केला लाखात पसंत
स्वप्न मारियेचे साकार झाले ।। २ ।।
देवाच्या आशीर्वादाने ठेवी पवित्र आपुली मने
स्वर्गी बाळाचा पाळणा हाले ।। ३ ।।

## ३९५. योहान जन्माचा दाखला

ईश्वरा तुझ्या मंदिरात भक्त होता हा
नीतीमान दान दिलेस तू त्याला
दीप कुळाचा लावीला ।। धृ ।।
वदे जखऱ्यासवे साक्षात भिऊ नको असे मनात
तुझी विनंती ही स्वर्गात पुत्र लाभ अलीशबेला ।। १ ।।
बोले वयोवृद्ध अविश्वासी ही घटना मी समजू कशी
प्रचिती येई त्या शब्दाशी वाचा गेली त्या क्षणाला ।। २ ।।
यश आले खऱ्या सेवेला दिन गेले त्या पवित्र्येला
डोळे भरून पाही पुत्राला योहान संदेष्टा तो झाला ।। ३ ।।

## ३९६. ख्रिस्त राजा येणार

ख्रिस्त राजा येणार गौरवाने येणार
केले भविष्य खरे ठरणार ।। धृ ।।
बाया पृथ्वी अदृष्य होणार
सैरावैरा मानव धावणार
काळ कठीण होणार चोरासारखा येणार ।। १ ।।
चंद्र सूर्य तळपूनी जाणार
प्राणीमात्रांना कंपही सुटणार ।। २ ।।

## ३९७. वाणी योहानाची

अरण्यात कडाडली वाणी योहानाची
प्रभू मार्ग नीटकरा वाट तारणाची ।। धृ ।।
उंट कातडयाचे वस्त्र पायघोळ
बाप्तिस्मा कर्मक्रिया बाप्तिस्मा कर्मक्रिया
जल शिंपण्याची, जल शिंपण्याची ।। १ ।।





करा बंधु प्रीती त्याजळो का मोह
ओलांडुनी जाऊ पातकांचा डोह
पादत्राण त्याचे जोडे बंध तोडण्याची ।। २ ।।
मसिहा नसे मी सुवार्तिक दीन
माझ्या मागून येणारा तोच खरा देव
अब्रामाची शिक्षा मोठी बघ जाळण्याची ।। ३ ।।

**३९८. हेरोदाची कन्या नाचे**

हेरोदाची कन्या नाचे छुम छुम कशी
बांधीले पायाला चाळ नाचे नागीन जशी ।। धृ ।।
आज महालात होते सारे न्यायाधीश
पाहुन कन्येचे नृत्य झाले सारे खुश
म्हणे माग हवे तुजला देतो बक्षिसी ।। १ ।।
आधी वचन द्या हो सर्वांसमोर
शब्दाचा माझ्या करू नका धिक्कार
धन द्रव्य नको मजला चैन विलासी ।। २ ।।
योहानाचे शिर मजला पाहिजे पिताजी
अशी राणीच्या तुमच्या आहे मर्जी
ऐकुनिया दु:खी झाला राजा मनाशी ।। ३ ।।

**३९९. हा राजा बाई हेरोद इथला**

हा राजा बाई हेरोद इथला मारण्याला टपला
बाळाला घेऊन आता चला
बाळाला घेऊन आता चला ।। धृ ।।
बाळ सुंदर बाप जगाचा असे महान राजा राजांचा
बेत त्याने केला ।। १ ।।
मजहुनी हा श्रेष्ठ जन्मला तोचि तलवार घेई हाताला
क्रोध त्याशी आला ।। २ ।।





## ४००. आज सारी गजबजली

आज सारी गजबजली बेथलेहेमी वाट नव्या वर्षाची मंगल पहाट ।। धृ ।।
किलबिल किलबिल पक्षीगणांची साथ तयाला वनवृक्षांची
उजळून गेली घडी जीवनाची—घडी जीवनाची
हर्षभरे उसळती आनंदाची लाट ।। १ ।।
प्रभू बाळाच्या अवती भवती जमुनी सारे नवे गीत गाती
नवीन वर्षात पाऊल पडती—पाऊल पडती
दूर हटला संसाराचा काळोखी रहाट ।। २ ।।
झिजवी फुलांना तो वनमाळी प्रभुजन्माची गाऊ भुपाळी
स्वर्गात गाई दुतांची टोळी— दुतांची टोळी
दास म्हणे आज ख्रिस्तजयंतीचा थाट ।। ३ ।।

## ४०१. ख्रिस्त राजा जन्मी आला

ख्रिस्त राजा जन्मी आला झाला आनंद आम्हा पतिताला ।। धृ ।।
यशया वदला धीर धरा देव येईल तारणारा
बाळ जन्मला — प्रकटला ।। १ ।।
दूत वदतो मेंढपाळांना गव्हाणी निजला ख्रिस्तराणा
चला जाऊ भेटू तयाला ।। २ ।।
पूर्व दिशेला तारा उगवला मागी लोकांनी तो पाहिला
उद बोळ सोने अर्पिती त्याला ।। ३ ।।

## ४०२. देवपण ते सगळे

देवपण ते सगळे ऽऽऽ देवपण ते सगळे
घेई जन्म ते बाळ चिमुकले मानव कुळी खेळे ऽऽऽ ।। धृ ।।
शुभ मंगल दूत करिती वादन स्वर्ग धरणी गेली दणानून
वंदिती दूत मेळे देवा वंदिती दूत मेळे ।। १ ।।
जगताचे हे पाप हराया केली जगती मानव काया
गव्हानीत लोळे देवा गव्हानीत लोळे ।। २ ।।





## ४०३. गा हो ख्रिस्त जन्माची कहाणी

गा हो ख्रिस्त जन्माची कहाणी बाळ जन्मले बहुगुणी ।। धृ ।।
देवदुताने गीत गायले परमेशाचे गौरव केले
मानव पुत्रा शांती वदले मेषपाळ धावती गायी गव्हाणी ।। १ ।।
पूर्व दिशेला तारा झळकतो मागी लोकांना खूण कळवतो
उंट पळवतो करंडक भरले उद बोळ सोने । । २ ।।

## ४०४. जन्मी आला ख्रिस्त

जन्मी आला ख्रिस्त मारियेच्या पोटी
निवाऱ्याची जागा तुझी गायीच्या गोठी ।। धृ।।
भर थंडीचे दिन काय त्याचे हाल
जन्मभेदी झालो आम्ही त्याचे बहुमोल
शिकवण त्याची सारी टाकू नका पाठी ।। १ ।।
तारा तुटे आकाशात सुवार्ता सांगे दूत
बेथलहेमी जन्मी आला मारियेचा सुत
मेंढक्यानो त्वरा करा रे जाऊ भेटीसाठी ।। २ ।।
लीनपण ठेवा सारे तुम्ही ध्यानी
राजा हेरोदासारिखे होऊ नका कोणी
झुगारुनी स्वर्गसुख आम्हा पाप्यांसाठी ।। ३ ।।

## ४०५. आम्हाकडे आला

आम्हाकडे आला आम्हाकडे आला । धनी तो सृष्टीचा निर्माणकर्ता सर्वांचा
आवडता हृदयाचा आम्हाकडे आला ।। १ ।।
अखंड सुख द्यावया इच्छा तुझी प्रभुराया । आम्हा सुखी करायला ।। २ ।।
अनंत कृपा घेऊन हाका मारितो नावानं । म्हणे द्या अंत:करणा ।। ३ ।।
दरिद्री आम्ही दुर्बल लाचार मीच चांडाळ । हलके पापी असुनही
आम्हाकडे आला ।। ४ ।।

## ४०६. चला जाऊ गव्हाणी

चला जाऊ गव्हाणी बाळ पाहू दान देऊ अन् गाणं गाऊ ।। धृ ।।





तारा पूर्वेकडे चमकला मागी लोकांना आनंद झाला
ते निघाले झणी गेले बेथलेहेम गव्हाणी
दान अर्पिले ख्रिस्तराजाला ।। १ ।।
देवदुतांनी संदेश दिधला रानामधे हो त्या मेंढक्यांना
तुम्हा तारायला ख्रिस्त हा जन्मला जा बेथलेहेमाला त्या भेटण्याला ।। २ ।।
टाळ मृदंग वाद्ये वाजवूनी टाळ विण्याचा गजर करुनी
प्रेमे गाऊ गान अर्पू तनमन धन वाहू सर्वस्व त्या बालकाला ।। ३ ।।

## **४०७. दाविदाच्या पवित्र नगरी**

दाविदाच्या पवित्र नगरी राजा येशू जन्मला
ज्याचे कर्म त्याचे फळ
हेरोद करी मळमळ जीवा लागे त्याच्या झटका
प्रभूच्या जन्मामुळे बर का प्रभूच्या जन्मामुळे बर का ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा तुटला मागी लाकांनी तो पाहिला
बाळ शेधण्यासाठी आले धाऊनी ।। १ ।।
मागी लोकांचे अमोल दान सोने हिरे आणि चंदन
बाळ शोधण्यासाठी आले धाऊनी ।। २ ।।

## **४०८. झाला आनंद मारीया मातेला**

झाला आनंद मारीया मातेला
येशू बाळ तो गव्हाणी जन्मला ।। धृ ।।
लखलख विजेचा झाला दाही दिशेला तारा तुटला
मंढपाळांनी तो पाहिला मागी लोकांनी तो पाहिला
वस्त्र फाटके वस्त्र फाटके मारीया गुंडाळी त्याला
येशू बाळ तो गव्हाणी जन्मला ।। १ ।।
बेथलेहेमाला चला जाऊ या ख्रिस्त बालक तो पाहू या
ख्रिस्त राजा जन्मी आला आम्हा पाप्याला तारायाला
येशू बाळ तो गव्हाणी जन्मला ।। २ ।।





## ४०९. तुटला नभात तारा

तुटला नभात तारा सुटला आनंदी वारा
येशू बाळ जन्मी आला झाला आनंद न्यारा ।। धृ ।।
यशयाने जे कथिले भविष्य पूर्ण झाले जग सारे धन्य झाले
प्रभू भेटी ते धावले गव्हानीत निजलेला, तृणाने वेढीलेला
तेजाचा महान तारा ।। १ ।।
दूत बोले मेंढक्याला तारणारा जन्मी आला जा बेथलेहेमाला (२)
सुवार्ता सांगा या जगाला (२) सदा स्मरा हो तयाला (२)
झाला आनंद न्यारा ।। २ ।।

## ४१०. अंधारात होते जग

अंधारात होते जग आणि आकाश
प्रभूबाळ जन्मी आले पडला प्रकाश ।। धृ ।।
पापाने दुनिया सारी व्यापून गेली समजत असता नच कोणी मानी
जन्मामुळे त्याच्या जळाले मानवी दोष ।। १ ।।

## ४११. भूपाळी कोण गातो

भूपाळी कोण गातो माझ्या ग अंगणात ।। धृ ।।
गव्हाणी चला जाऊ बाळाला चला पाहू
बाळाला चला पाहू बाळाचे दर्शन घेऊ ।। १ ।।
देवाने दिली वाणी मला गं गोडवानी
देवाची गोड गाणी माझ्या ग अंगणात ।। २ ।।

## ४१२. गेलं माझं तान्हुलं बाळ बाई

गेलं माझं तान्हुलं बाळ बाई तयासाठी मनी माझ्या हळहळ ।। धृ ।।
हेरोद राजा हा दुष्ट कसा पाहा झाला माझा काळ बाई ।। १ ।।
घार कावळे मगर सर्प करतील बाळाचे हाल माझ्या ।। २ ।।

## ४१३. बेथलेमी गावी झाली पुकार

बेथलेमी गावी झाली पुकार नावनिशीसाठी जमले हजार
गायी गोठी जन्मी आले मारियेचे बाळ ।। धृ ।।





इसविसनापूर्वी बेथलेम नगरी तृणावरी झोपी गेले ।। १ ।।
प्रभू येशू ख्रिस्त असे ठेविले बाळाचे नाव
शुभदिनी जन्मी आले ।। २ ।।

## ४१४. सुवार्ता सांगू जगाला

गव्हानी निजलेला बाळवस्त्राते गुंडाळलेला ।। धृ ।।
पृथ्वी वरती मानवाने घोर पाप फार केले
प्रलय आणीन नष्ट करील भस्म करीन दुष्टाला
बाप क्रोधाविष्ट झाला मेघ जणू गडगडला
पुत्र उभा बापापाशी विनाविती दयाळाला
पृथ्वीवरी मानवाने प्राण माझा आर्पियेला
शुर वीर अवनीवरी आला दंड भरण्याला ।। १ ।।
गगन मंडळात जेव्हा उल्का तारा अवतरला
उदरी माता मारियेच्या प्रभू ख्रिस्त अवतरला
मागी पुसती हेरोदाला कोठे राजा जन्मी आला
शोधा तुम्ही सांगा मला जाऊ आम्ही दर्शनाला
शुर वीर अवनीवरी आला दंड भरण्याला ।। २ ।।

## ४१५. जन्मला देवाचा कोकरा

जन्मला देवाचा कोकरा करुया मुजरा ।। धृ ।।
वर्णू किती मी महती पित्या तुझी या जगती
धाडिले पुत्रा जगती द्याया दीनास मुक्ती
निर्मळ प्रीतीच्या सागरा ।। १ ।।
खुलले नभात तारे ख्रिस्ता तुझीया द्वारे
नमले पदी तुझ्या रे राजे व रंक सारे
प्रीतीने जाउया सामोरा ।। २ ।।
झाला जीवा आनंद बनलो मी पाप शुद्ध
कैसे करु मी सिद्ध ना पात्र मी निर्बुद्ध
शांतीचा उफाळला झरा ।। ३ ।।





## ४१६. जमल्या ह्या आया बाया

जमल्या ह्या आया बाया अंगाई गीत गाया
पाळण्यात झाला भाग्यवान बाळ हे गोरे गोरे पान ॥ धृ ॥
आई म्हणे मी आता, बाळाची झाली आई
पित्याच्या आनंदाला, हर्षाची सीमा नाही
लाडाचं हे गुलगुलं, जन्माशी बाळ आलं
पाळण्यात झाला भाग्यवान ॥ १ ॥
आजी म्हणे मी आता, पिकलेलं पान आहे
बाळा म्हणे मी आता, पिकलेलं पान आहे
तरीही बाळावर या, आमचा जीव आहे
ख्रिस्तभजनाचा मेळा, जमलाय हो आज सगळा
पाळण्यात झाला भाग्यवान ॥ २ ॥

## ४१७. मारियेच्या नंदना

मारियेच्या नंदना ऽऽऽ येरे घरी माझ्या पाहुणा ॥ धृ ॥
सांज सकाळी उठले मी आज भेट व्हावी मना लागे आस
हृदयाचा पाळणा ऽऽऽ येरे घरी...॥ १ ॥
ऋण हृदयाचा करीते चौरंग हा न्हावू घालीते तुजला बाळा
पायी घाली पैंजणा ऽऽऽ येरे घरी...॥ २ ॥

## ४१८. तुझ्यामुळे मी झाले बाळा

तुझ्यामुळे मी झाले बाळा देवाची आई
गाते अंगाई रे बाळा गाते अंगाई ॥ धृ ॥
दूत वदला तो प्रकटुनी, तू देवाची होशील जननी
देवपुत्र तो उदरी आला, घडली नवलाई ऽऽऽ गाते... ॥ १ ॥
मेंढपाळ ते साधे भोळे, धावत आले पावन झाले
संत महात्मे तृप्त ती होती, वंदन तव पायी ऽऽऽ गाते...॥ २ ॥
करी तृणाचा मऊ बिछाना दोन करांचा तुज पाळणा
आणि गेली वासरे पक्षी किलबिल ती गाई ॥ ३ ॥
अमंगलाचा तूच त्राता, अभाग्याचा भाग्य विधाता
दीन दुबळयास्तव बाळ माझा जन्मी हो आला ऽऽऽ गाते... ॥ ४ ॥





## ४१९. येशू आलास पुन्हा जन्मा

येशू आलास पुन्हा जन्मा, ठेविल्या प्रीतीच्या खुणा ।। धृ ।।
मारियाबाई होती गोठ्यात, बाळाला घेऊन हातात
विनविते गाऊनी गाना, ठेविल्या प्रीतीच्या खुणा ।। १ ।।
मेंढपाळ होते रानात, मधुकाव्य गीत गात,
चमत्कार करितो तो नाना ठेविल्या प्रीतीच्या खुणा ।। २ ।।
ज्ञानी लोक होते प्रवासात येऊन त्यांच्या स्वप्नात
वाही उदबोळ बाळास ठेविल्या प्रितीच्या खुणा ।। ३ ।।

## ४२०. आनंदी आनंद कोळीवाड्याला

आनंदी आनंद कोळीवाड्याला झालाय गो,
देवाचा पुत्र येशू हा जन्मी आलाय गो ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा हा तुटला
मागी लोकांनी तो पाहिला
सोनं उदबोळ घेउनी ते आलेय गो ।१ ।।
मेंढपाळ होते रानाला जन्माचा संदेश दूताने दिला
पाहून त्याला चकीत ते झालेय गो ।। २ ।।

## ४२१. गव्हानी बाळ ते उघडं

गव्हानी बाळ ते उघडं नेते ग बाई आंगडं टोपडं ।। धृ ।।
सोन्याची सरी त्याला हिऱ्याच्या बिंदल्या
रूण झुण वाजे पायात चाळ बाई
थंडीनं बाळ कुडकुडं नेते गं बाई ।। १ ।।
धान्य मुगाचे पसरीले काड
त्यावर लोळे बाई मारियेचा बाळ बाई योसेफाचं लाड
प्रकाशीत गाईचं झोपडं नेते ग बाई आगडं टोपडं ।। २।।
भेटीस आले पाहा मेंढपाळ
तीन राजांनी बाई अर्पिले दान, अर्पिले दान
जीवाची लागली या ओढ नेते ग बाई आगडं टोपडं ।। ३ ।।





## ४२२. ऐक मारिये माझे म्हणने

ऐक मारिये माझे म्हणने, तुला कसा आवडला येशूबाळ ।। धृ ।।
तुला घेईल रंगीत शालू तुला मिरवीत मंदिरी नेवू गं ।। १ ।।
तू असे देवाची माता तुझ्यापोटी जगाचा त्राता
तुझ्यापोटी जगाचा त्राता गं ।। २ ।।

## ४२३. झाला मोठा हा आनंद

झाला मोठा हा आनंद माझ्या मनात मावेना
आज माझ्या घरी गं आला प्रभू येशू पाहुणा ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा हा तुटला मागी लोकांनी तो पाहीला
तारा पाहून ते आले, प्रभू बाळाला भेटाया ।। १ ।।
जमुनी आया बाया जाऊ प्रभुच्या दर्शाना
लीन मनाने नमवुया माथा प्रभुच्या चरणा
घ्या आशीर्वाद त्याचा आजच्या या शुभदिनाला ।। २ ।।

## ४२४. श्री खिस्ताला दृष्ट झाली

श्री खिस्ताला दृष्ट झाली या छकुल्याला बाई दृष्ट झाली
या बाळाला दृष्ट झाली माझ्या माझ्या मनी वाटते ।। धृ ।।
डचडच नको करू, काजळ घालू कसे
भय भारी माझ्या जीवा माझ्या, माझ्या मनी वाटते ।। १ ।।
किती धीर देऊ जीवाला परी शांत राहीना
तो रडतो मुसमुसतो ख्रिस्त उगा राहीना
बाळ उगा राहीना बोबडे बोल बोल बोलताना
दारी मोठा तो बागुलबुवा तिळमात्र भियीना हौस मनी दाटते
माझ्या माझ्या मनी वाटते ।। २ ।।

## ४२५. ख्रिस्त मुराळी

ख्रिस्त मुराळी आनंद माझ्या मनाला
मला बाई जायाचं नाताळाच्या सणाला ।। धृ ।।
नाताळाला जाईन म्हणते, बाळाला फुलहार वाहीन म्हणते ।। १ ।।





नाताळाला जाईन म्हणते, बाळाला छोटीशी मेनबत्ती लावीन म्हणते ।। २ ।।
नाताळाला जाईन म्हणते, बाळाला प्रार्थना करीन म्हणते ।। ३ ।।
नाताळाला जाईन म्हणते, बाळाचे भलन गाईन म्हणते ।। ४ ।।
नाताळाला जाईन म्हणते, गोड गोड केक वाटीन म्हणते ।। ५ ।।

## ४२६. आई बाळाची थोर कुळाची

आई बाळाची थोर कुळाची वडील बाळाचे थोर कुळाचे
मोठया आनांदात ऽऽऽ आज बाळाच्या **......**ची रात ।। धृ ।।
या गं सयांनो पाळणा गाऊ पाळण्याला झोके देऊ
पायात वाळे बाळही खेळे, सानुल्या रूपात ।। १ ।।
घेउनी आली बाळ मांडीवरी जमली दारी मंडळी सारी
साखर पानाचे ताट सोन्याचे माउलीच्या हातात ।। २ ।।
बाळ आहे खूप गुणी मंजुळ आहे त्याची वाणी
बाळही खेळे चंद्र ही लाजे पाहुनी मनात ।। ३ ।।
आणा बोलावून एक शाहीर तो करील नाव जाहीर
पाचवी (बारावी) गाजे बाळही लाजे सोनुल्या रूपात ।। ४ ।।

## ४२७. दाविद नगरी बेथलेम शहरी

दाविद नगरी बेथलेम शहरी जन्माला आले येशुबाळ
चला एकीनं साजरा करू या नाताळ ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा तुटला, मार्गी लोकांनी तो पाहिला
बाळाची आई ऽऽ मारीया बाई गोठ्यात ठेवी बाळ चला एकीनं ।। १ ।।
तीन देशाचे ज्ञानी आले, बाळाला पाहून दर्शनी झाले
बाळाची आई ऽऽ मारीया बाई, वाही सोनं उदबोळ चला एकीनं ।। २ ।।

## ४२८. जन्मी आले बाळ

जन्मी आले बाळ ते मारियेचे लाड
गाईच्या गोठी खेळे, खेळे येशू बाळ ।। धृ ।।
पुर्वेकडे तारा तुटला संदेश देण्याला
शुभवार्ता कळली ही दाही दिशेला





ख्रिस्तरुपी जन्मी आला हो ऽऽऽ
ख्रिस्तरुपी जन्मी आला हो
कळले जगाला कळले जगाला ।। १ ।।
हेरोदाला कळली वार्ता राजा जन्मी आला
दु:खी कष्टी होऊनी चिंतीत झाला
हेरोदाने मनी हो ऽऽऽ
हेरोदाने मनी भारी, भारी कावा केला ख्रिस्त मारण्याला ।। २ ।।
येशुच्या दर्शनी तीन ज्ञानी आले
उदबोळ सोनं घेऊन अर्पिती झाले
मागे फिरले ते हो ऽऽऽ
मागे फिरले ते आपुलया देशाला वार्ता सांगण्याला ।। ३ ।।

## ४२९. हलू हलू झोका बळाला

लुलू लुलू लुलू लुलू झोका बळाला ।। धृ ।।
आईच्या हाती पाळण्याची दोरी
देवाचा आशीर्वाद बाळाच्या वरती
करूणाकरती देवाची प्रीती ।। १ ।।
सामर्थ्य झाले प्रभो देवाचे
कार्य हे केले देव नामाचे ।। २ ।।
सुंदर बाळ हे पाळण्यात दिसते
देवाचे शब्द बघा गोड हसते ।। ३ ।।

## ४३०. हे प्रभुराया हर्षीत झालो

हे प्रभुराया हर्षीत झालो येता तू भूवरी
खडतरणाऱ्या जीवनी देवा प्रीत दाविली खरी ।। धृ ।।
पुण्य रात्री थंडी कडाकी, वार्ता सांगे दूत
कुमारीकेच्या उदरी येईल पालनकर्ता सूत
पिता पवित्र नेईल तुम्हा ज्ञानाच्या सागरी
खडतरणाऱ्या जीवनी देवा ......।। १।।
सत्याची तू शिकवण देई मिटवी सारे पाप





शास्त्री पंडीत पाहून ज्ञान नमले आपोआप
क्षमा शांती ज्ञान सरीता देवा दिली पदरी
खडतरणाऱ्या जीवनी देवा ......।। २ ।।
दु:खाचा तू उचली डोगर दया तुझी ती न्यारी
पिंडीताना तू केलेस गेली वेदना सारी ।। ३ ।।

## ४३१. पायी पैंजन बाळा

पायी पैंजन बाळा बाळा निज निज रे बाळा
नको वाजवू रे खुळखुळा ।। धृ ।।
किती याचा चाळा हा लागेना डोळा
शैया तुला पनपाचोळा ।। १ ।।
घरदार तुझे रे ख्रिस्त बाळा
गाईचा गोठा तुला ।। २ ।।

## ४३२. हाले मारीया घरी पाळणा

हाले मारीया घरी पाळणा त्यात झोपला बाळ गोजीरवाना
हाले हा मरीया घरी पाळणा ।। धृ ।।
पूर्व दिशेला तुटला तारा जाऊ म्हणे बाळ पाहण्याला ।। १ ।।
तीन ज्ञानी आले दर्शनाला उदबोळ सोने अर्पी बाळाला ।। २ ।।

## ४३३. मारीया कडेवर घेई

मारीया कडेवर घेई मारिया कडेवर घेई
कडेवर धेई, घेई येशू बाळाला ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा तुटला, मागी लोकांनी तो पाहीला
जाई बाळ पााहण्याला ......।। १ ।।
मेंढपाळ होते त्या रानाला देवदूताने निरोप दिधला
जाई बाळ पाहण्याला ......।। २ ।।

## ४३४. सरली सरली

सरली सरली सरली सरली आज प्रतीक्षा सरली हो
प्रभो जन्माची ज्याला त्याला पाहा बातमी कळली हो ।। धृ ।।





अतुरतेने वाट पाहिली आपण तारण कर्त्याची
दर्शन त्याचे घेण्यासाठी लगबग चाले सर्वांची
प्रत्येकाच्या गाली कलिका आनंदाने खुलली हो ॥ १ ॥
उजळून गेला गोठा अवघा दिव्य प्रभूच्या तेजाने
पावन झाली क्षुद्र गव्हाणी भुरळ मनाला पडली हो ॥ २ ॥
येशू म्हणजे आमची भक्ती, येशू म्हणजे जगात शांती
वर्णन त्याचे करता करता कधी तरी का कोणी थकते
आमुच्या वर कलेली प्रीती धरणीवर अवतरली हो ॥ ३ ॥

## ४३५. वेड लागले

वेड लागले हो तुझ्या नामाचे वेड लागले
उच्च असता तो नीच झाला
गायी गव्हाणी तो जन्मी आला
आळवू चला चला वंदू चला
हो ऽऽऽ तुझ्या नामाचे वेड लागले ॥ १ ॥
फुल पुष्पाच्या माळा घालू प्रेमाने प्रभुच्या गळा
चला आळवू चला चला वंदू चला
हो ऽऽऽ तुझ्या नामाचे वेड लागले ॥ २ ॥

## ४३६. चरणी फुले वाहु या

जगमातेचे प्रभुरायाचे गोड गीत गाऊ या, गाऊ या
चरणी फुले वाहू या चला रे चरणी फुले वाहू या ॥ धृ ॥
शास्त्राच्या त्या आचरणाने प्रभुरायाच्या त्या वचनाने
सांगू चला रे उभ्या जगाला, बायबल स्मरुया ॥ १ ॥
आकाशतून झाली वाणी देवमाता झाली स्वामिनी
तारक आमचा मिळाला आम्हा, सूर नभी लाउया ॥ २ ॥
वात्सल्याच्या दोन्ही मूर्ती वंदू या शांतीचे शिखर अवघे बांधू या
हालेलुया बोलु बोलू यात्रेचा सोहळा हा निळया नभाखाली
जसा स्वर्ग खाली आला या भूवरी ॥ ३ ॥





## ४३७. माझ्या मनाला वाटलं

माझ्या मनाला वाटलं तुम्हीं ऐकाजी
कारभारी करा तयारी जाण्याची ।। धृ ।।
खरं सांगा की आपलं ठरलं हा हा म्हणता झाली सकाळ
घेऊ मोठं मधलं खटयाळ घेऊ संगतीला लहान बाळ
गुण्या माना आवरा रं बैल, बैल भारी नखऱ्याची
गाडी जुपा हो खिल्लारी एक जोड घुंगराची ।। १ ।।
हा अरूंद दिसतोय रस्ता, रस्ता वळणाचा खोल दरीचा
जरा गाडी जपून दटवा करा हुशारी धोका चुकवा
गुण्या माना आवरा रं बैलं भारी नखऱ्याची
गाडी जुपा हो खिल्लारी एक जोड घुंगराची ।। २ ।।
पैल थडीला जरा जाऊ याकुबाळाचे दर्शन घेऊ या
अवघड तो डोंगरमाथा आहे बघा पुढं
माझं तुम्ही ऐका थोडं मार्ग आहे अवघड
दिसते कुणाची वाडी इथेच सोडा गाडी
ही तर **....** ची वाडी इथेच सोडा गाडी ।। ३ ।।
सागर हा आडवा भारी आला हो वाटेवरी
लहरी त्या वादळाच्या घेरी त्यास चौफेरी
दटवा हो सोनागाडी लावा हो लाडीगोडी
बोटीत बसून जरा जाऊ चला बाळाचं दर्शन घेऊ चला
हे आलंय समोर गाव, गाव लागलंय बेथलेम नाव ।। ४ ।।
बहू जमलाय लोक जमाव पुढे जायाला मिळेना वाव
गाई गोठयात येशू बाळ, (२)
वेळ मोठी हर्षाची हौस फिटली आज या मनाची ।। ५ ।।

## ४३८. ख्रिस्त गव्हाणी आला

ख्रिस्त गव्हाणी आला
आता मी पातकी राहू कशाला ।। धृ ।।
किती कौतुक हे प्रभू जन्माचे कुमारी आली गायीगोठ्यात
घेतला जन्म बेथलेहेमाला बेथलेहेमाला ।। १ ।।





मंगल मूर्ती मनी भरली सैतानाची भिती न उरली
अमृत आले उशाला उशाला ।। २ ।।
जगणे पळवी आम्हास सदैव राहो ख्रिस्त आस
धन्यवाद ख्रिस्त वंशाला वंशाला ।। ३ ।।

## ४३९. जाऊ चला सारे बेथलेम गावी

चला सारे त्या बेथलेम गावी पाहुया आज बाळ गव्हाणी
प्रसूत होई मारियाबाई पुत्र हा जन्मला
असा मारियेचा बाळ हा लागला गव्हाणी लोळायला ।। धृ ।।
पूर्वेचा हा पाहूनी तारा अवती भवती प्रकाश सारा
देव रुपानी मार्ग दाविती लागलाय खुलायला ।। १ ।।
आंनद मनात होई तीन राजे भेटीस जाई
पाहूनी त्या जमूनी लागलेन डुलायला रानी
लागले डुलायला ।। २ ।।
देवाचा दूत स्वप्नी आला सांगू नका हे हेरोदाला
जाऊ नका तुम्हीं त्या मार्गानी लागलाय बोलायला
दूत लागलाय बोलायला ।। ३ ।।

## ४४०. दिवस वर आला

लय दिवस वरवर आला जीव टाकून भरभर चला
आता निघा हो बेथलेमा प्रभू भेटीला ।। धृ ।।
आलं आता ते बेथलेम गाव, गाव ख्रिस्ताचे हो
येशू राजाचा जय जय झाला ख्रिस्त राजा जय जय झाला ।। १ ।।
त्या क्षणी तारा पूर्वेला तेजाने चमकू लागला
येशू राजाचा जय जय केला आता निघा हो ।। २ ।।
ही वार्ता पाहा ऐकूनी आले तिथे तीन ज्ञानी
येशू राजाचा जय जय केला ।। ३ ।।

## ४४१. आज माझ्या बाळाला

आज माझ्या बाळाला झोप का ग येत नाही
गायीच्या या गोठ्यामध्ये ख्रिस्त जन्मला बाई ।। धृ ।।





कृपा केली त्या देवाने बाळ जन्मले महान
गुण गाऊ आंनद तोच तारील महान
तारण्यासाठी जन्मी आला पाप्यासठी जन्म घेई ।। १ ।।
गुणी गुणवंत बाळ झोपलं ग माझ्याजवळ
धन्य धन्य मारियाबाई आली देवाची आई ।। २ ।।

## ४४२. बेथलेम तुम्ही जावा

बेथलेम तुम्ही जावा दाविदाच्या पुण्य गावा
दर्शन बाळाचे घ्यावा भरुनी डोळे पाहवा ।। धृ ।।
भविष्यवाणी खरी ठरली देव बापाची कृपा झाली
रजनी राणी मनी हसली संदेश देण्या अवतरली
नभी दूतांचा जमला मेळा ।। १ ।।
योसेफा पडे फार धास्ती करावी कोठे आता वसती
उतार शाळेत जागा नव्हती गव्हाणी केली त्याने वसती
जन्मले बाळ मधरात्री ।। २ ।।
ज्ञानी लोक वार्ता कळता धरला बेथलेमचा रस्ता
रस्त्याने हो जाता जाता तारा मार्ग दावी पुढचा
ऊद बोळ सोने अर्पी बाळा ।। ३ ।।

## ४४३. मारियेच्या बाळाला पाहू चला

मारियेच्या बाळाला पाहू चला
भाविक सुमने अर्पू त्याला
जन्मी आला तो आज जयख्रिस्त बोला ।। धृ ।।
राजांचा तो राजा कसा मानव झाला
गायीच्या गोठ्यात कसा शांतीचा राजा हो जन्मला
वार्ता ही कळली जना देवदूत म्हणती ।। १ ।।
थंडी गारठा भारी कुडकुडती तयाची कांती
नाही काही आसरा चहुबाजुनी आहे शांती ।। २ ।।





## **४४४. जन्माशी आलं बाळ**

जन्माशी आलं बाळ सैतानाचा काळ
आम्हासाठी करी प्रार्थना पित्याजवळ ।। धृ ।।
समजले मेंढक्यांशी दूत गात आकाशी
उद बोळ सोनं घेऊन शास्त्री परुशी
हीच आहे आपल्या तारणाची वेळ ।। १ ।।
गोड गोड गीत गाती देवदूत
जन्मी आलं बाळ मारियेचा सूत
सर्व मिळून करू साजरा सण नाताळ ।। २ ।।
तोच आहे जगताचा खरा तारणारा
त्या विना नसे कुणाचा आधार
त्या हाती तारणाचा आहे प्रतिपाळ ।। ३ ।।

## **४४५. येशू बाळाची जयंती**

येशू बाळाची जयंती झाली सुरू
भक्त जनांनो वंदन करू ।। धृ ।।
२५ डिसेंबर दिन गं आज साडी पांढरी नेसून खास
सूर्यासमान येशूचे तेज जन्मी आलं मारियेचं लेकरू गं ।। १ ।।
जगात साऱ्या येशुची ख्याती मारियापोटी उगवला मोती
तोरण पतंगानी सजवली धरती जगात साऱ्या येशुची कीर्ती
नव वर्षाची गुढी आपण उभारू ।। २ ।।
नवनिर्मित हा समाज झाला नूतन वर्षाची नुतन कला
मनदीपांनी येशुला ओवाळा घेऊन फुलांच्या माळा
येशू नामाने आपण सारे तरू गं ।। ३ ।।

## **४४६. थांब पूर्वेच्या ताऱ्या**

थांब पूर्वेच्या ताऱ्या थांब माझ्या राजा रं
सांग कितीक आहे लांब गाव बेथलहेम रं ।। धृ ।।
आम्ही धनगर धनगर जणू डोगरची पाखरं
देवदूतांनी दिधली ख्रिस्त जन्माची खबर
झाला आनंदी आनंद माझ्या मना रं ।। १ ।।





पाहा देवाची करनी जसं नारळात पाणी
समुद्राच्या शिंपल्यात मोती जन्मती कोठुनी
वाढदिवसानिमित्त वाजवा ढोल बाजा रं ।। २ ।।
झाली पहाट पहाट फुटे तांबडं तांबडं
येशुबाळाला आणलं नव अंगड टोपडं
भावभक्तीने करू आज देव पूजा रं ।। ३ ।।

**४४७. हे बाळ दैवी शान**

हे बाळ दैवी शान घेता जन्म भाग्यवान
होउनी हर्षाचा पेला प्राषन करण्या कुळाला
सजविला, सजविला बाळाचा जन्मदिन सजविला ।। धृ ।।
वेळ आज रंगली रातराणी बोलली
लाभू दे रे बाळाला सुखाची सावली
हे देवा तू सत्यवान दे बाळा तू अतिज्ञान
माता पिता उज्वल करण्या देवाला ।। १ ।।
सोनुला रे तान्हुला चिमुकला लाडला
कौतुकाने मोठा झाला तूच एक शोभला
फिरे धनी दोरोदार भजनाचे हे सांगे सार
उठा उठा रे नेत्रांनो बाळाच्या दमतीला ।। २ ।।

**४४८. गोरा गोमटा**

गोरा गोमटा तो झटपटा प्रश्नाचं उत्तर देई
लोक पाहात राही ।। धृ ।।
बोल बोबडे बाळ देखना त्याच्या अंगी किती समंजपणा
तो इवलासा देई खुलासा मंदिरी देवच येई ।। १ ।।
वय लाहान विचार मोठे तया पुढे ना चाले खोटे
उभा तो राही त्याची धिटाई मंदिरी देवच येई ।। २ ।।
शास्त्री परुशी त्या मंदिरात त्याच्या प्रश्नांनी केली हो जीत
बुद्धी त्याची जशी देवाची दास हे गुणगाण गाई ।। ३ ।।





### ४४९. जन्माची वार्ता दूताने गाजवली

रात्रीच्या गप्पा रानात रंगल्या
झोपेच्या लहरी डोळ्यास झोंबल्या
ढगातली बिजली जशी चमकली
अहो धनगर घाबरला
मध्यरात्रीच्या जन्माची वार्ता दूताने गाजवली ।। धृ ।।
भरजरी शालू धरनी ल्याली कुणी गीत गाई कोणी कव्वाली
मध्यानं रात्री जमले वाजंत्री अहो तुतारी वाजवली ।। १ ।।
अंकल आंटी छोटासा बन्टी नाताळ बाबाने वाजवली घंटी
चिमुकली मुले सारे जमली अहो फटाके वाजविली ।। २ ।।
मेंढापाळ राजे उंटाचा तांडा बेथलेम गावाकडे लोकांचा लोंढा
उद बोळ सोने, घेउनी हाती अहो बाळा हो अर्पिती ।। ३ ।।

### ४५०. बेथलहेमा जाऊ

बेथलहेमा जाऊ प्रभुबाळा आपण पाहू ।। धृ ।।
आनंदे भरले जग हे फुलविते प्रकाशासम हे
दरवळती गंधासमही आपुल्या तनुला उजळू ।। १ ।।
राहिलात का तुम्ही मागे सरसावुनी धावा वेगे
हा अमुल्य प्रसाद घेऊ हृदयात प्रभुला ठेवू ।। २ ।।

### ४५१. देवाचा बाळ

देवाचा बाळ आला गं माझ्या अंगणी
आला माझ्या अंगणी आला माझ्या अंगणी ।। धृ ।।
रूप तयाचे मोठे चंद्र सुर्याहुनी
लावू नका ग बाई दृष्ट तया कुणीही ।। १ ।।
भरुनी डोळयात घ्या गं हृदयात साठवा गं
येशू बाळास माझ्या प्रेमाने वागवा गं हो... ।। २ ।।





## ४५२. गाते अंगाई तुजला

जो जो रे बाळा गाते अंगाई तुजला
तव जन्माने धन्य मी झाले बाळ अवतरला ।। धृ ।।
झोप तू लवलाई मी तव आई मारियाबाई गाते अंगाई
मातृसम कर सुखकर नाही दुसरा जगी कोणी ।। १।।
जगी न तुला थारा तव जन्माची वार्ता अमरा सांगे नभी तारा
आला म्हणोनी दाविद नगरी संगे दूतमेळा ।। २।।

## ४५३. दाविदनगरी प्रभू अवतारी

दाविदनगरी प्रभू अवतारी गव्हाणी आश्रय धारी ।। धृ ।।
मेंढके ताऱ्या अनुसरी थबके तो गव्हणीवरी
गोठ्यामध्ये जगउद्धारी बालक गवतावरी खेळे ।। १।।
तीन मागी शोध करी बघण्या त्या येशू नाजोरी
शोधित शोधित हेरोदाघरी जाती बहु सत्वरी
पुसती त्याला जगउद्धारी ।। २।।
असे कोठे आमुचा वाली जो तारी जगता मारी
वाटे भय हेरोदा भारी बालकांशी तो मारी राजा ।। ३ ।।

## ४५४. तृणावर निज

तृणावर निज निज गाते अंगाई गीत
माझ्या येशू तान्ह्या माझ्या येशू तान्ह्या ।। धृ ।।
गात गात अहोरात्रंदिन मी गाते तूज अंगाई
मी वनवाशी निजवी तुजशी झोप न का तुज येई ।। १।।
तृण रुधयाचा करुणी पाळणा निजवी तुज भगवाना
पंचप्राण ओवाळून टाकीन तुजवरुनी जगजीवना ।। २।।
भग्न रूधई लक्तरा बाळंती गुंडाळूनी ठेविते
श्वासोश्वासाचा ताल धरोनी रात्रंदिन तुज थोपटीते ।।३।।
रात्रमध्यानी उलटूनी गेली अंधार पडला जगती
स्वयं प्रकाश तू असे ज्योत तव पाजळते तुजभोवती ।। ४ ।।
प्रेम सुखाची गाउनी गाणी मनमोहना रिझविते
गाऊन चंचल अद्‌भुत बाळा निज रूधई रिझविते ।। ५ ।।





## ४५५. कोकीळ करीत ललकारी

कोकीळ करीत ललकारी सानुला बाळ अवतारी ।। धृ ।।
मारीया बालक पुत्र प्रसवली पर्नकुटी अंधारी
रात्र प्रहरी दिन उदेला जैसा ऐन दुपारी ।। १ ।।
हा तारा असून गुलाल उधळी सारा
स्वर्गी रंजन वदती धराला ये जीव झंकरा
रसिक रंग भुवरा नर्तन करिती मोदे किती किती
तै गमे नव रंग येई अवनीत रंग ।। २ ।।

## ४५६. यहुदियांच्या बेथेलहेमी

यहुदियांच्या बेथेलहेमी प्रभुजी जन्मी आले
धन्य ते पतिताया आले झाले ।। धृ ।।
धावत धावत मागी आले बघुनी तारका बहू ते नमले वदले
राजांचा तो राजा खरोखर पतितांशी ते भले ।। १ ।।
यहुदीगण ते क्रोधीत झाले जिवे मारण्या उठती सगळे
पवित्र अशा त्या बालकांशी वधिले त्यास जिवे ।। २ ।।
रक्तसाक्षी असा धर्म जगी हा नाही कुणाचा परी बा साचा
प्रीती धर्माचा देउनी कित्ता पुनरुत्थानी उठले येशू ।। ३ ।।

## ४५७. मेनबत्ती

मेनबत्ती ती मिनमिनती तेवत ठेवा ख्रिस्तज्योती
तेवत ठेवा ख्रिस्तज्योती आली आली ख्रिस्तजयंती ।। धृ ।।
पूर्व दिशेला तारा तुटला प्रभू जन्माची वार्ता देणारा
अवनी वरती त्याच सुमारा जिकडे तिकडे होता अंधेरा ।। १ ।।

## ४५८. देवाने मनुष्य केला

देवाने मनुष्य केला निर्माण सर्व सत्ता दिली मानवा जाण
त्या मानवात स्त्री पुरुष दोन क्रीडा करिती प्रीती धरुन
जो बाळा जो जो रे जो ।। १ ।।
प्रीतीचे गुज करितो कथन पाप वाढले नोहापासून





तारण झाले ख्रिस्तापासून पाळणा ऐका चित्त देऊन
जो बाळा जो जो रे जो ।। २ ।।
त्या बायामध्ये मारीयाबाई दूताने निरोप दिला तो काही
सर्वस्त्रीयांमध्ये धन्य तू बाई तुझ्या उदरी गर्भ हा राही
जो बाळा जो जो रे जो ।। ३ ।।
घाबरली मारीया भाषणा उत्तर देई धीट होऊन
पतीस जाणिले नाही अजून पुत्र होईल कशावरुन
जो बाळा जो जो रे जो ।। ४ ।।
दूत बोलला तेव्हा मार्येशी देवाचा दूत मी आलो तुजपाशी
मारीयाबाई तू बोल मजशी काहीच अशक्य नाही देवाशी
जो बाळा जो जो रे जो ।। ५ ।।
तेव्हा पासूनी गर्भ राहिला आत्म्याच्या योगाने वाढू लागला
मारीयाबाईचा रंग खुलला पहिल्या महिन्याचा सोहळा झाला
जो बाळा जो जो रे जो ।। ६ ।।
दुसऱ्या मासी पदर बंद मारीयाबाईला झाला आनंद
उदरी आसा स्वर्गाचा कंद सोडवील तो पापाचे बंध
जो बाळा जो जो रे जो ।। ७ ।।
आलीशेबेने तिसऱ्या मासी निरोप दिला मारीयाबाईशी
भेटाया यावे माझ्या गृहाशी तव भेटीचा लाभ आम्हाशी
जो बाळा जो जो रे जो ।। ८ ।।
मारीयाबाई गेली चवथ्या महिन्याला एलीसाबेथीला भेटावयाला
अलिंगन देती एकामेकीला भेटीच्या अंती बाळ हर्षला
जो बाळा जो जो रे जो ।। ९ ।।
पाचव्या मासी पाच सोहळा जिकडे तिकडे लावल्या जाहिरा
योसेफ मारियेला आनंद झाला पवित्र आत्म्याचा बालक खरा
जो बाळा जो जो रे जो ।। १० ।।
सहाव्या मासी साहस केले नाजरेथाहुनी बेथलेमा आले
सर्व गोष्टी त्या जाहीर झाल्या मारीया बघाया बाया हो आल्या
जो बाळा जो जो रे जो ।। ११ ।।
सातव्या मासी सांगतो खुण बालकाचे देव करीं रक्षण





कोण घेईन त्याचा हो प्राण सर्व राजांचा राजा हो जाण
जो बाळा जो जो रे जो ।। १२।।
आठव्या मासी आठ सोहळा बाल रक्षावे देवा दयाळा
द्राक्षवेलीचा लाविला मळा गाणे ही गाती मारीया वेल्हाळा
जो बाळा जो जो रे जो ।। १३।।
नवव्या मासी आनंद किरिती बालक जन्मले मध्यम रात्री
तारा तुटला त्याच्या वरती तेव्हा पासूनी ख्रिस्त जयंती
जो बाळा जो जो रे जो ।। १४।।

## ४५९. इसवीसन पहिल्या सालात

इसवीसन पहिल्या सालात आनंद झाला जेरुसलेमनगरात
तारीख पंचवीस रात्रीच्या वेळेस
जन्मले येशू बाळ गोठयात जो बाळा जो रे जो ।। धृ ।।
देव ईश्वरा पुण्यही थोर तारा झळकता गातेही फार
मारीया यासेफ करती गजर ग्लोरिया ग्लोरिया शब्द मधूर ।। १ ।।
धनगर लोक शेतात राहती देवाचे दूत वार्ता सांगती
प्रकाशले तेज त्यांच्या भोवती आला तारक धरू नका भिती ।। २ ।।
प्रभू आहे तो ऐका तुम्हीच तुम्हाला खूण सांगतो हीच
बाळ गुंडाळून आहे गव्हाणीत सर्व जगतासाठी झाला तो लीन ।। ३ ।।
धनगर लोकांनी विचार केला चला जाऊ आपण बेथलेम नगराला
सर्व जगासाठी प्रभू जन्मला मनोभवे पुजू उत्पन्नकर्त्याला ।। ४ ।।
पृथ्वीचा राजा कोठे जन्मला पूर्वेस तारा नवीन पाहिला
तिघे ज्ञानी आले पाहयाला हेराद राजा मनी घाबरला ।। ५ ।।
राजाने शास्त्र्यास आज्ञा करोनी आपआपले शास्त्र पाहा शोधुनी
पूर्वेस तारा नवीन पाहून कुवारीच्या पोटी प्रभू जन्मुनी ।। ६ ।।
ताऱ्याच्या मार्गाने ज्ञानी चालुनी उद बोळे साने वस्तू अर्पुनी
प्रभू होता तिथे तारा थांबून पाहिले बाळास नगर शोधून ।। ७ ।।
ग्लोरिया ग्लोरिया शब्द ऐकून भंडार फोडुनी उद अर्पिला
गुढघे टेकुनी नमस्कार केला पुजीले त्यांनी येशू बाळाला ।। ८ ।।

### ४६०. आशिया खंडात

आशिया खंडात बेथलेहेम गावात
ख्रिस्त प्रभू हा हो उदरशी आता
स्वर्ग सोडेनी मानव झाला जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। धृ ।।
दूताचे दर्शन मारीयाबाईला देवाचा निरोप सांगतो तुजला
देव स्वत: तुझ्या उदराशी आला तोच तारील सर्व जगाला
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। १ ।।
मारीया भिउनी बोले दुताला आशीर्वाद कैसा दिला हा मजला
जाणत नाही मी पुरुषाला, निरंथ रहाण्याचा नवस केला
कैसे हाईल बालक मजला जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। २ ।।
दूत बोलला शक्ती देवाला पवित्र अत्म्याची कृपा ही तुजला
मसिहा येतो तुझ्या उदराला श्री येशू नाव ठेवावे त्याला
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ३ ।।
मारीया बोलती देवदुताला वचनाप्रमाणे होऊ दे मजला
दासी प्रभूची मी लागते सेवेला तत्क्षणी प्रभू उदराशी आला
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ४ ।।
दोन–तीन महिने गेले मारीयाला योसेफाच्या मनी संशय आला
ऐशी कैसी मारीया शोभेल मजला गुप्त टाकोनी जातो मारियेला
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ५।।
यासेफाच्या स्वप्नी दूत बोलला दोष लावू नको देवमातेला
देव स्वत: तिच्या उदराशी आला तोच तारील सर्व जगाला
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ६ ।।
नाझरेथ गावी जातो कामाला धंदा सुतारकीचा करू लागला
शुद्ध मनाचा कित्ता दाविला आधी वंदन देवमातेला
गुण्यागोविंदाने नांदू लागला जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ७ ।।
पहिल्या दिवशी पहिली प्रतिपदा बाळ जन्मे हो गव्हानीच्या आत
उतार शाळेत नव्हती जागा धन्य धन्य हा जग चालका
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ८ ।।
दुसऱ्या दिवशी द्वितीया, तेथे मेंढके आले बाळ प्रभुच्या भेटी
अर्पिले दान हे सन्मानासाठी परत्पराची महिमा मोठी





जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ९ ।।
तिसऱ्या दिवशी तृतिया तेथे ज्ञानी आले बाळ प्रभुच्या भेटी
अर्पिले दान हे सन्मानासाठी गेले निघून आपुल्या देशी
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। १० ।।
चवथ्या दिवशी चौथीचा चंद्र बाळ खेळते राज मंदिर
रुप सुंदर हे बहु निर्मळ हासू लागले ख्रिस्त कुवार
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। ११ ।।
रानी झाले ते जागृत वार्ता सांगता त्यां दूत
मेंढके कळप राखितो त्यांपुढे उभा राही दूत राही दूत
ऐशा चांदण्या रात्रीचं दूत आला हो गर्जत गर्जत
पुत्र मारियाबाईचा उद्धार करितो जगाचा जगाचा रानी झाले हो जागृत
जो बाळा जो जो जो बाळा जो जो रे ।। १२ ।।

## ४६१. पाळणा

बाळा जो जो जो जो जो रे जो
पहिला संदेश मारीया मातेला देव बाप हा प्रसन्न झाला
बाळ येईल तुझ्या उदराला ।। १ ।।
कसे शक्य हे माझ्या ठायी कुमारी आहे मारीया बाई
सर्व शक्य ते देवबापाला ।। २ ।।
पहिली खबर मेंढपाळांना गायीच्या गोठी बाळ जन्मला
स्वर्गी गौरव देवदूताला ।। ३ ।।
दुसरी खबर तीन राजाला सोनं उद बोळ ते वाही बाळाला
माघारी जाई आपल्या देशाला ।। ४ ।।
ऐशा चांदण्या रातीला दूत आले हो गर्जत
गर्जत गर्जत ख्रिस्त आला हो जन्मास
बेथलेमी गावी ख्रिस्त जन्माला गव्हाणीमाजी निजू लागला
मारीया अंगाई गाते त्याजला ।। ५ ।।





## ४६२. पाळणा

बेथलेमा एवढी का दाटी लोक जमती नावनिशीसाठी
देवदूतांनी घडविल्या गोष्टी
प्रसूत झाली मारीया गायीच्या गोठी ।। धृ ।।
पहिल्या दिवशी जन्मले बाळ रूप दिसे सोनं दंती ढाळ
दीपले नेत्र बाळ पाहुनी ।। १ ।।
दुसऱ्या दिवशी आनंद मोठा तेज ताऱ्याने दाखविल्या वाटा
मेंढक्यांनी तो गाठीला गोठा धूप ऊद बोळांनी भरिल्या ओटया ।। २ ।।
तिसऱ्या दिवशी बाया जमती सोन्याच्या ताटाने अमृत भरिती
खारीक खोबरे लोकास वाटिती गोर गरिबांना धर्म करीती ।। ३ ।।
चवथ्या दिवशी चौथी चाकरी नव्हता पाळणा मारियेच्या घरी
बाळ घेतला हातावरी पाळणा म्हणती नानापरी ।। ४ ।।
पाचव्या दिवशी पाचवीचा राडा तान्ही वासरे गायीला सोडा
तान्ह्या बाळाची दृष्ट ही काढा देवदूताने घातीला वेढा
मारियाबाईचा जीव होई थोडा थोडा ।। ५ ।।
सहाव्या दिवशी कलेचा वारा गाइच्या गोठयात जन्मला हिरा
त्यामुळे आकाशी तुटला तारा पहिल्या दिवसाचा मजकूर सारा ।। ६ ।।
सातव्या दिवशी मागीही धावती जगाचे कैवारी जयजय बोलती
हेरोद बोलवी राजवाडयावरती खरे का खोटे सांगा म्हणती ।। ७ ।।
आठव्या दिवशी ज्ञानी जमती बाळाची सुंता करी म्हणती
धन द्रव्य दान बाळास अर्पिती ।। ८ ।।
नवव्या दिवशी दरबार भरिला हेरोदाच्या मनी क्रोधही आला
मारा बालके हुकूम केला पाठविले शिपाई गाव गावाला ।। ९ ।।
दहाव्या दिवशी देवदूत येती स्वप्नरूपाने भेटही घेती
संकट आले तुझ्या बाळावरती मिसरदेशाचा सांगा हो म्हणती
यासेफाला मारीया रडून बोलली ।। १० ।।
अकराव्या दिवशी तैयारी केली मारीया बसुनी गाढवावरती
येशू बाळाला पुढेही घेती रस्ता चालताना मागे पुढे पहाती
संकट निवारा म्हणुनी प्रार्थना करिती ।। ११ ।।
बाराव्या दिवशी बारावी बाळी आळशा भिंतीहून बाळास न्याहळी





येशू नावानं वाजवा टाळी ॥ १२ ॥
तेराव्या दिवशी वाटे नवल संपूर्ण झाले देवदूतांचे बोल
जन्मापसून किती झाले हाल तोच पापापासुनी तुम्हा तारील ॥ १३ ॥

## ४६३. पाळणा

बेथलेहेम गावी ख्रिस्त जन्मला गव्हानी माजी निजू लागला
मारीया अंगाई गाते त्याजला नीज सानुल्या माझ्या सोनुल्या
जो जो रे जो जो ॥ १ ॥
चंद्र आकाशी तारे हसती गरिबी आपुली म्हणूनी किती
राजसा गडे झाकू दे बाळा नीज जरासा गाते त्याजला
जो जो रे जो जो ॥ २ ॥
गायीगुरांचे स्थान भिकार प्रेम जन्मतः स्वर्ग सुंदर
होते दूतांचे संगीत छान ऐकेल जग तेथे रमून
जे जो रे जो जो ॥ ३ ॥
दिव्य अंगणी खुलेल रूप सांडीत येता जगी अमाप
सृष्टी हसुनी सांगते जप फुल ग माझे प्रेमस्वरूप
जे जो रे जो जो ॥ ४ ॥
तृण रचुनी शयन केले लक्तरी कसे बाळ झोपले
नको ग बाई ये राजा इथे मन्मन कमली ठेवू म्हणते
जो जो रे जो जो ॥ ५ ॥

## ४६४. बाळा जो जो रे

बाळा जो जो रे हे ख्रिस्ता दुरित भयाच्या आस्था
बाळा जो जो रे ॥ धृ ॥
जे जे श्रमले ते घाले तव चरणीच निमाले
बाळा जो जो रे ॥ १ ॥
त्याजिले पापाने संस्तवने तव करिशी हर्षाने
बाळा जो जो रे ॥ २ ॥
सोडून दिव्य स्वर्गाला गोष्टी प्रियंकर रमला
बाळा जो जो रे ॥ ३ ॥





बाळा कवणाचा मातेचा किंवा तो जगताचा
बाळा जो जो रे ।। ४ ।।
जगताच्या राया कृतकार्या निजवी गाऊन मार्या
बाळा जो जो रे ।। ५ ।।

## ४६५. हालविते तुझा पाळणा

हालविते तुझा पाळणा माझ्या बाळा
निज नीज रे बाळा ।। धृ ।।
अवचित येईल कोणीतरी पाहील
उचलून राज महाली नेतील
कसा लागेना तुझा डोळा ।। १ ।।
थंडी आहे भारी नाही अंगावरी
शांत झोपली बेथलेम नगरी
कसा लागेना तुज डोळा ।। २ ।।
रानातील पाखरे गोठ्यातील वासरे
गगनी लुकलुक चमकती तारे
झोप कशी तुला न येई ।। ३ ।।
पहाटेची ही समय झाली
पक्षांची पहा चिवचिव झाली
कशी झोप लागेना तुला ।। ४ ।।

## ४६६. करीते हाताचा झणी पाळणा

करीते हाताचा झणी पाळणा, झोपविते लडीवाळा
लागू दे डोळा प्रभो दयाळा, अंगाई गाते तुजला ।। धृ ।।
सकाळ झाली संध्याही आली, थबकुनी बसली दाराशी
उगे नको बा छकुल्या जागा दिनभर खेळूनी थकलाशी
रडू नाको जरा थांबना सोडून दे तू चाळा ।। २ ।।
पशू पक्षांची पोरं चिमुकली पंख उबेला धावती
बहुप्रेमाने असे धरोनी आई तयाला सांभाळी
उबसेवेला जणू कामी, ना करुनी श्रृंगार सारा ।। ३ ।।





वरूनी बघता थोर ही बाळे, नव हर्षाचे ते तारे
अवती भवती शांत जहाले, विश्वासाचे फिरती तारे
दासच देई अशी कल्पना, तत्व ही त्याचे जाणा
करुनी सोहळा जमवू मेळा, गौरवू या प्रभुरायाला ।। ४ ।।

## ४६७. देवदूत येती संदेश देती

आली आली ख्रिस्तजयंती हेरोदाच्या त्या राज्यात ।। धृ ।।
बेथलेहेमी त्या गावात जन्मले बाळ नभोदीप
गायी गुरांच्या गव्हाणी मारीया चित्ती हर्षित होती
आली आली ख्रिस्तजयंती ।। १ ।।
वार्ता कळवा ज्ञानी लोकांना निघाले ते बाळ दर्शाना
बघुनी बाळा रुप नयना रुप मनोहर गोजीरवाना
वंदन करती दाने अर्पुनी आली आली ख्रिस्तजयंती ।। २ ।।

## ४६८. ओवी

पहिली माझी ओवी गं स्वर्गीय पित्याला
जगी पापे अति झाली पाठवी ख्रिस्ताला
दुसरी माझी ओवी गं मी गाते ख्रिस्ताला
लीनतेने ओवाळीते ख्रिस्त चरणाला
तिसरी माझी ओवी गं मारीया मातेला
कुवारी ती राहुनिया ख्रिस्ता जन्म दिला
चौथी माझी ओवी गं योसेफ पित्याला
कष्ट त्रास सोसुनिया सांभाळी ख्रिस्ता
पाचवी माझी ओवी गं तीन त्या राजाला
उद बोळ सोन मोद अर्पिती ख्रिस्ताला
सहावी माझी ओवी गं कंठ दाटुनी आला
पाप्यांसाठी प्राण दिला गौरवू ख्रिस्ताला
सातवी माझी ओवी गं गाते प्रभू ख्रिस्ताला
जिंकुनिया सैतानाला तारिले जगाला
आठवी माझी ओवी गं ख्रिस्त या राजाला





एक्लेसिया राज्य स्थापी जाई तो स्वर्गाला
नववी माझी ओवी गं गाते एक्लेसियेला
सैतानशाही नष्ट केली मोदे आनंदे राहया

### ४६९. माझा बाळ

माझा बाळ कोणी दावा । शोधून शोधून आला थकवा ।। धृ ।।
सण सोहळा संपला असता परत निघाली नाझरेथा
रात्र समयीचा विसावा –विसावा ।। १ ।।
परतून आली जेरुसलेमा शास्त्री परुशी बाळ मधे बसला
पित्याच्या घरी मी असावा – असावा ।। २ ।।

### ४७०. कोणीतरी पाहिलं का सांगा

कोणीतरी पाहिलं का सांगा हो बाळ माझं
कोणीतरी पाहिलं का सागा ।। धृ ।।
बारा वर्साचं बाळ घेउनी गेले देवळाला
सण संपल्यावरी येशू मागे राहीला
कळले नाही माता पित्या हो कळले नाही मातापित्याला ।। १ ।।
पाडस हे चुकलं आहे हरणी ती पाही
नतलगामध्ये त्याचा शोध ती हो घेई
कळले नाही माता पित्या हो कळले नाही मातापित्याला ।। २ ।।
तीन दिवसाने येशू त्यांना मंदिरात भेटे
शोध माझा कसा तुम्ही करीत होते
पित्याच्या घरी आहे मी का नाही कळले तुम्हाला ।। ३ ।।

### ४७१. बाळ चुकला

चांदणं अंगनी नाही या क्षणी सागर अश्रुंनी भरला
बाळ चुकला, बाळ गोरा गोमटा गेला कुण्या वाटा
सायंकाळ ही सुनी जीवाला बाळ चुकला ।। धृ ।।
ओलांडणाच्या सणी गेले तिथे जमुनी
येताना परतुनी राहीला आले ध्यानी





शोधा शोधा तयाला सांगा कुणी पाहिला
वाटे जणू सोनुला रुसला ।। १ ।।
सर्वात तोच होता देवाचा लाडका
वर्षाचा बाळ होता गणगोत्रांनो ऐका
त्याच दुसऱ्या दिनी लागे चिंता मनी
जसा दुःखाचा बांध फुटला ।। २ ।।
पाहुनी त्याची वाट जीव हा शिणला
तयाच्या ओळखीचा मी खुलासा केला
कुठे पत्ता लागेना, त्याच तिसऱ्या दिनाला
यश आले मंदिरी नेत्राला ।। ३ ।।

## ख्रिस्ताचे जीवन व कार्ये

### ४७२. बाज घेउनी खांद्यावरी

(संदर्भ – योहान ५: १–९, मत्तय ८: १–४)
बाज घेउनी खांद्यावरी प्रभू बोले जा आपल्या घरी
तुझ्या पापांची झाली क्षमा ठेव विश्वास माझ्यावरी ।। धृ ।।
प्रभू शिकवीत होते धडे गर्दी लोकांची भोवती पडे
जे जे रोगी येती त्याकडे नाना रोगी येती त्याकडे
गालीलातील दुखणेकरी ।। १ ।।
पक्षघाताचा रोगी कुणी लोक आले होते घेउनी
त्यांचा विश्चास तो पाहुनी प्रभू रोग्याला स्पर्श करी ।। २ ।।
हा करीतो क्षमा पाप्याला याला अधिकार कोणी दिला
लोक अपसात कुजबुजले हे जाणी प्रभू अंतरी ।। ३ ।।

### ४७३. क्षमा तुझी झाली

(संदर्भ – योहान ५: १–९, मत्तय ८: १–४)
क्षमा तुझी झाली झाली मुक्ती तुला मिळाली
बाज घे खांद्यावरी शांतीने जा तू घरी ।। धृ ।।
पक्षघाताच्या रागाने होता तो पिडलेला
अडतीस वर्षापासोनी खाटेवरी पडलेला





प्रभू त्याच्यापाशी गेले आणि त्याचयाशी विचारिले
मुक्ती हवी का ?
तुझ्या मुक्तीसाठी विश्वास ठेव मजवरी ।। १ ।।
येशुच्या शब्दाने त्याचा राग नाहिसा झाला
उचलुनी खांद्यावरी बाज घेउनी तो गेला
किती मोठी त्याची आस
किती मोठा तयाचा विश्वास होता प्रभुवरी खरा ।। २ ।।
याचनेमधून झाला कुष्ठरोगी परावृत्त
समजले गावोगावी येशूचे हे शुभवृत्त
विश्वासणाऱ्याला प्रभूजी तारी ।। ३ ।।

## ४७४. प्रभू राहिला उपाशी

(संदर्भ– मार्क ११: १२–१४, २०–२५, मत्तय २१: १८–२२)
प्रभू राहिला उपाशी उपयोग काय झाला
ते झाड अंजिराचे येशुने पाहिले ।। धृ ।।
येशू प्रभू सकाळी नगरात जात असता
वाटेने त्याला दिसले झाड जाता जाता
पाना फुलांनी सजले बहरून फार गेले ।। १ ।।
प्रभू येशू भुकेले भारी निराश झाले
येणार नाही फळ तुला झाडास बोलले
वाळून झाड गेले येशुने शाप दिधला ।। २ ।।
झाडावरी प्रभुचा हा कोप त्या घडीला
क्षणात अंजिराचे झाड कसे वाळले
शिष्यांस नवल वाटे आपसात बोलले
सामर्थ्य थोर येशुचे शिष्यांनी मानिले ।। ३ ।।

## ४७५. चार हजरांना घाली भोजन

(संदर्भ – मत्तय १५: ३२–३८)
चार हजरांना घाली भोजन
मत्तय पंधरा बत्तीस ते अडतीस वचन ।। धृ ।।





बोले येशू आपल्या शिष्यास नाही त्यांना खावायास
सांगे येशू शिष्यांनां बोलावून ।। १ ।।
शिष्य प्रभूला तव बोलत आहेत मासळी भाकरी पाच
केली प्रार्थना हाती घेवून ।। २ ।।
मोडून शिष्यांनी वाढीले जेवून तृप्त समूदाय झाले
उरल्या बारा टोपल्या भरुन ।। ३ ।।

## ४७६. भोजन देई पाच हजारा

(संदर्भ – मत्तय १४: १३–२१
लूक ९: १०–१७, जॉन ६: ५–१४)

भोजन देई पाच हजारा प्रभू बसल्या बसल्या
टोपल्या बारा त्या उरल्या ।। धृ ।।
जमले होते वनात सारे बाया पुरुष आणि लेकरे
प्रभू मागे चालल्या ।। १ ।।
व्याकुळ वृद्ध भुकेने मनी जाणिले प्रभू रायाने
सोडून द्या रे प्रपंच आपुला प्रभू सांगे तयाला ।। २ ।।
पन्नासाच्या बसवूनी रांगा वाढे प्रभू भुकेल्या
चमत्कार हा आज पाहा केला
साक्षात्कार हा झाला मनाला ।। ३ ।।

## ४७७. शिष्यां घेउनिया संगती

(योहान ६: ५–१४)

शिष्यां घेउनिया संगती डोंगरावरी
पाहा पुढे चाले देव पुढारी आमचा ख्रिस्त पुढारी ।। धृ ।।
प्रभू चाले वेगे वेगे शिष्य पाठोपाठ
रस्ता गेला दाटुनिया गर्दी झाली दाट
लोक समुदाय आला डोंगरावरी, पाहा पुढे...।। १ ।।
दोन भाकरी अन् पाच मासळ्या
हातावरी घेउनिया प्रार्थना केली
भोजन झाले तुकडेही उरले बारा टोपली डोंगरावरी ।। २।।





किती पाहा भोजनाची चिंता पडली
पाहा प्रभुने त्यांची परीक्षा घेतली
लोक समुदाय जमला चार हजारी ।। ३ ।।

## ४७८. गिरी शिखरावरी बसुनी

(मत्तय ५: ३—१०)

गिरी शिखरावरी बसुनी
प्रभू सांगे सकलांना धन्यवाद धन्यवाद ।। धृ ।।
आत्म्याने जे दीन असती धन्य असती तेच खरे (२)
स्वर्गाच्या राज्याचे दान त्यांनाची लाभेल खरे आ...
शोकाकूल जे जीवनात या धन्य असती तेची खरे
सांत्वन लाभे स्वर्गापासून हेची दान त्यासी लाभे ।। २।।
करीती दया जे दुसऱ्ययावरती धन्य असती तेच खरे (२)
दयासागरा पासून त्याना दान दयेचे लाभे हे ।। ३ ।।

## ४७९. धन्य म्हणाला प्रभू दीनाला

(मत्तय ५: ३—१०)

धन्य म्हणाला प्रभू दीनाला कारण देवराज्य दिले तुम्हाला ।। धृ ।।
अहो जे तुम्ही आता भुकेले
कारण ते धन्य तुम्ही तृप्त व्हाल आलेलुया आलेलुया
ऐसे बोले प्रभू शिष्याला ।। १ ।।
अहो जे तुम्ही आता रडता
ते धन्य कारण तुम्ही हसाल आलेलुया आलेलुया
देव पुत्रामुळे छळतील तुम्हाला ।। २ ।।
भ्रष्टाचारी म्हणतील जेव्हा प्रभूमार्गाला
आनंदीत होउनी गौरवू पित्याला आलेलुया आलेलुया
स्वर्गी मोठे प्रतिफळ तुम्हाला ।। ३ ।।





## ४८०. पाहू दे रे मला

(संदर्भ—लूक १९: १—९)

पाहू दे रे मला पाहू दे रे मला प्रभुजीला
जीव माझा व्याकूळ झाला ।। धृ ।।
ठेंगू जखया झाडावरी चढला प्रभुजीला पाहू लागला
झाडाखाली येता प्रभुजी बोले ये खाली जखयाला ।। १ ।।
जखयाला बोले प्रभुजी भोजनाला आपुल्या घरी
आनंद झाला जखयाला त्वरा करावी यावे घराला ।। २ ।।
प्रभुजी त्याच्या घरी गेले तारण तयाचे त्वरीत झाले
पश्चतापी जीवन झाले ।। ३ ।।

## ४८१. पाहू द्या हो मला

(संदर्भ—लूक १९: १—९)

पाहू द्या हो मला पाहू द्या हो मला
प्रभूजीला जीव माझा व्याकूळ झाला ।। धृ ।।
उंबराच्या त्या झाडाखाली ख्रिस्तप्रभूची स्वारी आली
जखया झाडावरती चढला जीव माझा व्याकूळ झाला ।। १ ।।
कमविले जे कुभांडाने परत करितो चौपटीने
जखया ख्रिस्ताला मग वदला जीव माझा व्याकूळ झाला ।। २ ।।
पाहुणा मी तुझा घराला संगतीने भोजनाला
तारण मिळाले याच घराला जीव माझा व्याकूळ झाला ।। ३ ।।

## ४८२. वदला प्रभूजी जखया उतरी

(संदर्भ—लूक १९: १—९)

वदला प्रभूजी जखया उतरी
राहवयाचे आज मला तुझ्या घरी ।। धृ ।।
उंबर तरुवर चढला जखया पहावयाला येशू सदया
येता प्रभूजी त्याची दया दृष्टी लावूनी आकाशा ।। १ ।।
उतरे खाली जखया भूवरी प्रभूचे स्वागत आनंदे करी
परिवर्तन हो त्याचे अंतरी श्रवूनी प्रभूची वाणी खरी ।। २ ।।





अर्धे द्रव्य दे रंकाप्रत कुभांडाचे देतो चौपट
वदला प्रभूजी होउनी हर्षित आज मिळाले तारण या घरी ।। ३ ।।

## ४८३. असे दुष्ट असा मी पापी

(संदर्भ–लूक १९: १–९)

असे दुष्ट असा मी पापी खरा
क्षमा करोनीया प्रभुजी घेई या नरा ।। धृ ।।
तुला पाहाण्याचा प्रयत्न मोठा असा
इतक्या गर्दीत ठेंगू मी येऊ कसा
म्हणूनी आलो तरुवर चढोनी जरा ।। १ ।।
जक्कय खाली ये तू त्वरा करोनी
भान हरपले त्याचे शब्द ऐकोनी
आज उतरायचं मजला तुझिया घरा ।। २ ।।
कुभांडाने मी मिळविले भारी धन
दिले त्यांचे चौपट भरुन
माझ्या नावाने गाव नाही बरा ।। ३ ।।
पापी जगतास होतो मी हरवलेला
काढीयले शोधून त्याने आज मला
आले तारण आजला माझ्या घरा ।। ४ ।।

## ४८४. जाउनी बसे उंबरावरी

(संदर्भ–लूक १९: १–९)

जाउनी बसे उंबरावरी, प्रभू भेटीची आशा धरी
गर्दीमुळे काही चालेना उंचीने तो अतिठेंगणा
प्रभू बोले तया सत्वरी आज उतरायचे तुझ्या घरी ।। १ ।।
आनंदाने तो जयघोष करी जन समुदाय होई बावरी
जनभिक्षा घाला पदरी दीननाथा तुम्ही कैवारी
आज उतरायचे तुझ्या घरी ।। २ ।।





## ४८५. प्रभू आले घरी नाच माझ्या मना

(संदर्भ–लूक १९: १–९)

प्रभू आले घरी नाच माझ्या मना
हर्ष माझ्या जीवाचा मी सांगू कुणा ।। धृ ।।
उंचीने असे जखया ठेंगणा
प्रभू भेटीची आस ही त्याच्या मना
हर्ष माझ्या जीवाचा मी सांगू कुणा ।। १ ।।
झाड उंबराचे होते त्या वाटेवरी
गर्दी पाहुनी चढला तो झाडावरी
येत असता प्रभू तो दिसे लोचना
हर्ष माझ्या जीवाचा मी सांगू कुणा ।। २ ।।
टक लाऊन येशू बघे मजकडे
बोले जखया खाली ये इकडे
त्याला पाहताची स्वर्ग झाला ठेंगणा ।। ३ ।।
जाणुनी घेई प्रभो मनी अंतरी
आज येणार जखया मी तुझ्या घरी
हर्ष माझ्या जीवाचा मी सांगू कुणा ।। ४ ।।
स्वागताची तयारी ही झाली सुरू
सांगा प्रभुजी मी काय सेवा करू
त्याच्या प्रेमाची आली मला कल्पना ।। ५ ।।

## ४८६. श्रीमंतांच्या दारी

(संदर्भ–लूक १६: १९–३१)

श्रीमंतांच्या दारी पडे लाजार भिकारी
कुत्री येउनी चाटती अंगाला
गळवे फोडांनी तो पिडलेला ।। धृ ।।
मेजावरती भोजनास बैसे दु:खी लाजार दारी तिष्ठत असे
उष्टया अन्नावरी त्याचे मन आस धरी
कोणी ढुंकूनी पाहिना त्याजला ।। १ ।।
दिनावरी दिन भरभर गेले काळाच्या ओघांनी दोघांना नेले





लाजार भिकारी बसे अब्राहामा शेजारी
अधोलोकात जागा श्रीमंताला ।। २ ।।
हाका मारी अब्राहामाला थंड कराया जीभ धाड लाजाराला
दोघांमध्ये दरी माठी खोल भारी
कर्माचे फळ मिळे श्रीमंताला ।। ३ ।।

## ४८७. होता धनवान

(संदर्भ—लूक १६: १९—३१)
होता धनवान विसरला देहभान
स्वर्गामध्ये जाण्या नाही तुला स्थान ।। धृ ।।
श्रीमंतीचा त्याला होता अभिमान
दरवाजामध्ये उभा आहे कोण
भीक मागतो लाजार लीन होऊन ।। १ ।।
अधोलाकामध्ये श्रीमंत पडला जाऊन
स्वर्गामध्ये लाजार बसला जाऊन
एक थेंव पाण्याचा टाका करंगळीने ।। २ ।।
क्षमा मागतो श्रीमंत लीन होऊन
माझ्या भावाला सांगा जाऊन
लालसा धनाची टाकावी सोडून ।। ३ ।।

## ४८८. लाजाराच्या करंगळीचा

(संदर्भ—लूक १६: १९—३१)
लाजाराच्या करंगळीचा एकच थेंब हवा
देवा शांत कर या जीवा देवा शात कर मम जीवा ।। धृ ।।
लाजार माझ्या दारी पडलेला गळवे फोडाने तो पिडलेला
कुत्री येऊन चाटीती त्याला विव्हळतो जीवा ।। १ ।।
जगात जीवन कंठीत असता कधी न भासे कसली चिंता
श्रीमंतीचा थाट आगळा मज वाटे हेवा ।। २ ।।
असह्य होती इथे वेदना क्लेश भयंकर अंत लागेना
तळमळे जीव शमवी कुणी ना कळा या थोपवा ।। ३ ।।





## ४८९. देव बोले धनवंताला

(संदर्भ—लूक १६: १९—३१)

देव बोले धनवंताला पाप कुठे फेडशी
नरक तुझा तो शेवटी वेड्या तू भोगीशी ।। धृ ।।
थाट तुझा तो श्रीमंतीचा सुंदर मलमली वस्त्रांचा
ऐश्वर्याच्या धुंदीत असशी चैन सुखी राहशी रे वेड्या ।। १ ।।
मिष्टान्न होते मेजावरी बसूनी तू सेवन करी
लाजार होता जवळ भिकारी तरी त्या न पाहशी रे वेड्या ।। २ ।।
लाजार आत्मा प्रभू स्वीकारी धनवंताला नरकाच्या दारी
दीन बंधुचा होता कैवारी धनवंता टाकीशी नरकी रे वेड्या ।। ३ ।।

## ४९०. तू जर येथे असता

(संदर्भ—योहान ११: १—४४)

तू जर येथे असता ख्रिस्ता
बंधू लाजार माझा मेला नसता ।। धृ ।।
बंधू लाजार पडला शयनी रडे मार्था मारीया लोचनी
शोकाकूल परिवार माझा सांत्वन प्रभो मार्था करी रे ।। १ ।।
हे प्रभू तू येथे असता बंधू लाजार माझा मेला नसता
तीन दिवस थडग्यात झाले ठेऊनी काय करू मी प्रभू रे ।।२।।
प्रभू कैवारी धोंड ही सारी तारी प्रभू पाहा रे
गौरव देवामध्ये प्रभुजी देई साहाय्य मला रे ।। ३ ।।

## ४९१. मरुनी लाजाराला

(संदर्भ—योहान ११: १—४४)

मरुनी लाजाराला चारदिन झाले,
झाले रे चार दिन झाले ।। धृ ।।
मारीया व मार्था हो बहिणींचा एकुलता एक बंधू आमुचा
बहु लाडाचा तुकडा जीवाचा मित्र तसाही होता तुमचा
अवचित काळाने त्यास हिराऊन नेले ।। १ ।।
प्रभुजी तुम्ही येथे असता बंधु आमुचा मेला नसता





कबरेकडे त्या कशास जाता सुटली असेल त्या दुर्गंधी आता
मारीयामार्था ह्या दोघ्या प्रभू बोले ।। २ ।।
ख्रिस्त वदे मग त्या लवलाही पुनरुत्थान व जीवन मीच बाई
विश्वास मजवर तुमचा जर राही उठेल बंधू आज या ठायी
प्रभुने त्या मृत लाजारा मरणातून उठविले ।। ३ ।।
प्रभुजी गेले कबरेपाशी हाक मारली लाजाराशी
उठ बाळा सांगतो साक्ष द्यावी तू खरी ।। ४ ।।

## ४९२. आज सत्वर ये रे

(संदर्भ—योहान ११: १—४४)

आज सत्वर ये रे ये रे हे प्रभो
हे तारणहारी देवा आज सत्वर ये रे ये रे ।। धृ ।।
बंधू लाजार पडला शयनी रडे मारीया मार्था बेथानी
शोकाकूल वाट तुझी पाहे दृष्टी तुझी साहे रे ।। १ ।।
हे प्रभू तू येथे आसता बंधू माझा मेला नसता
चार दिवस थडग्यामध्ये राहे गंध त्याचा वाहे रे ।। २ ।।
प्रभू कैवारी धोंड ही सारी तारी प्रभू पाहा रे
लाजरसा प्रभू हाक ही मारी चल चाल ये बाहेरी
हाक प्रभू मारी रे ।। ३ ।।

## ४९३. पापाची हिरवळ

(संदर्भ—मत्तय १८: १२—१४, लूक १५: ३—७)

पापाची हिरवळ भुरळ पडली
बहकुनिया गेलो आम्ही बहकुनिया गेलो
मेंढरु हरवलं मेंढरू हरवलं ।। धृ ।।
मनात विचार पाडीती मोहात कळेना समोर पापाचा धोका,
मोहात जडलं पापात पडलं बुडुनिया गेलं,
आम्ही बुडुनिया गेलो ।। १ ।।
वाढत गेला पापाचा भार देवापुनी गेलो हो दूर
पापाचं वेतन मरणदंड





विसरुनिया गेलो आम्ही विसरुनिया गेलो ।। २ ।।
मेंढरू गेलं पाप वाटेने शोधून काढलं येशू राजाने
करता पश्चताप पापमुक्त झालो
अकरीत हे घडलं अहो अकरीत हे घडलं ।। ३ ।।
देवाला आनंद झाला हो फार
येशुला आनंद झाला हो फार पाप्याचे तारण झाले
मेढरू सापडलं मेढरू सापडलं ।। ४ ।।

## ४९४. रानीवनी मी शोधीत फिरलो

(संदर्भ—मत्तय १८: १२—१४, लूक १५: ३—७)
रानीवनी मी शोधीत फिरलो, कोठे दिसेना झरा,
आता तू सापडलास बरा ।। धृ ।।
घरी मी गेलो परी ना दिसले
मेंढरू माझे एक हरवले झालो मी अतिखिन्न मनाने
झालो मी सैरावैरा ।। १ ।।
रात भयानक वाट दिसेना दऱ्या खोऱ्यांनी मार्ग कळेना
मारीतो हाका व्याकुळतेने तुजला रे मेंढरा ।। २ ।।

## ४९५. देवा वाचून

देवा वाचून चिन्ह येत नाही
सांगतो मी आज तुजला ।। धृ ।।
मातेच्या उदरी पुन्हा जाई कैसा म्हातारा आजही ।। १ ।।
पाणी आणि आत्मा या पासुनी या जन्मातही
देवाच्या त्या राज्यामधे कोणी जात नाही
देह आणि आत्म्यापासून जन्मलेले आत्मा ते आहे ।। २ ।।

## ४९६. ऐक तू निकोदेम

(संदर्भ—योहान ३: १—२१)
ऐक तू निकोदेम पवित्र मम वचन
स्वर्ग नाही पाहणार नवा जन्म झाल्यावाचून ।। धृ ।।





आठव त्या शापाला दिधला रे मी जगाला
मानी तव उत्पत्ती मिळणार जाण्याला
आत्मा तो तुझा देह घे जन्म आत्म्यातून ।। १ ।।
वारा पाहिजे तिकडे वाहातो त्याचा आवाज तू ऐकतो
कसा येतो कसा जातो त्याचा आवाज तू एकतो ।। २

## ४९७. एकच शब्द बोल

(मत्तय ८: ५–९)
एकच शब्द बोल प्रभू तू होईल चाकर बरा
कशाला येशी माझ्या घरा ।। धृ ।।
ताबेदार हा मीच दयाघन बहुत शिपाई माझ्या स्वाधीन
मम आज्ञेचे करीती पालन जैशी माझी गिरा ।। १ ।।
ऐकीली मी बहू तव महती भाव धरोनी तुझियावरती
मृता उठविशी धरोनी हाती संजीवन तू खरा ।। २ ।।
शब्द एकच वदला तू तर शयना वरचा माझा चाकर
होई बरा भव तुझ्यावर ख्रिस्त हृदयी स्मरा ।। ३ ।।

## ४९८. किती वर्णू ख्रिस्ता

(मत्तय ९: १८–२६, मार्क ५: २१–४३)
किती वर्णू ख्रिस्ता मी तुझे गुणगाण
मेलेल्या मुलीला तू दिले जीवदान ।। धृ ।।
कुणी एक सरदार तुझ्याकडे आला
शोकाकुलतने विनविता तुजला
एक कन्या आहे प्रभू ख्रिस्ता मजला
उठव प्रभू ख्रिस्ता तूझ्या रे दासिला
स्पर्श त्यानी करता कुडीत आला प्राण ।। १ ।।
शब्द त्याचा ऐकुनी प्रभू तेथे गेला
पिता त्या मुलीचा हर्षित झाला
प्रार्थनेच्या जोरात बोले त्या मुलीला
उठ मुली आता मी सांगतो तुला





मुलीला दिले हो जीवदान ।। २ ।।
विश्वास मात्र ठेंवा होईल ती बरी
पेत्र योहान याकोब येशू आले घरी
मेलेल्यास उठवी हो तो येशू महान ।। ३ ।।

## ४९९. पेऱ्या तो करी पेरी

(मत्तय १३: ३—२९)

पेऱ्या तो करी पेरी आशा भरी दिनरात न माने स्व कष्टा
तू जाण नरा हीत आपले कशात दिनरात न मानी स्व कष्टा ।। धृ ।।
ओ ऽऽ सुवचन बीज पडे वाटेवरी ते खगगण खाती स्वैराचरी
नेई दुष्ट सैतान त्या हिराऊनी क्षणात ।। १ ।।
कैबीज पडे खडकाळीवर ते वाळून जाई उन्हा करवी सत्वर
एकलेशा संकटे तै डगे हृदयात ।। २ ।।
पडे बीज काही काटेरी झाडी कंटक तयाची वाढ खंडी
संसाराची चिंता न मोहपाशी तया ।। ३ ।।
दास म्हणे बीज पडे सूभुवरी अगणीत धान्य भरे कोठारी भरे
तो ऐसा नर राही ऐश्वर्यात ।। ४ ।।

## ५००. काखेत घेउनी बीज

(मत्तय १३: ३—२९)

काखेत घेउनी बीज हे भारी प्रेषित आले भूमीच्यावरी
फेकिले बिज तयाने हे वचन रूपाने ।। धृ ।।
खडक वाटे पडले काही, वाऱ्याने सारे उडून जाई
भक्षिले तया पक्षाने बिज हे ।। १ ।।
काटेरी जाळयात झुडुपामधी पडले काही गवतामधी
रोप हे सुकले उन्हाने बिज हे ।। २ ।।
सुपीक भूमीत पडले काही शंभर पटीने पिक ते देई
कणीस भरलं मोत्यानं ।। ३ ।।
खडक असा जो कठीण मन काटेरी झुडुप विश्वासहीन
भूमी सुपीक बनावे दासाने ।। ४ ।।





## ५०१. घेऊन बी भारी

(मत्तय १३: २४—४३)

घेऊन बी भारी पेरिले शेतात वैऱ्याने रुजीले निंदन त्यात ।। धृ ।।
गहू आणि निंदन वाढले जोमाने कापनीकरिता वेगळे करिले ।। १ ।।
गहू साठविला त्याने कोठारात घेउनी निंदन टाकिले अग्नीत ।। २ ।।
ऐका बांधवानो प्रभुचा दाखला नितीमान स्वर्गी दुष्ट नरकात ।। ३ ।।

## ५०२. येशूच्या वस्त्राला मी शिवले

(संदर्भ— मत्तय ९: २०—२२, मार्क ५: २५—३४,
लूक ८: ४३—४८)

विश्वासाने येशूच्या वस्त्राला मी शिवले ग
उदास माझे जगणे पुन्हा नव्याने हसले ग ।। धृ ।।
घेउनी आपल्या चिंता व्याधी येशू भवती जमली गर्दी
मीही गेले समीप अगदी अघटित तेव्हा घडले ग ।। १ ।।
वर्षे झाली असतील बारा विकार माझा ग झाला बरा
देव जगाचा येशूच खरा आजारालाही हे कळले ग ।। २ ।।
कोण मजला खरोखर शिवले शक्तिहीन मज पुरते गमले
तेव्हा प्रभूने शिष्यास पुसले काळीज माझे थिजले गं ।। ३ ।।
भीत भीत मी पुढती गेले म्हटले येशू मी तुज शिवले
क्षणात दुखणे पसार झाले सुख डोळयाशी जडले ग ।। ४ ।।

## ५०३. शिवले जरी वस्त्राला

(संदर्भ— मत्तय ९: २०—२२, मार्क ५: २५—३४,
लूक ८: ४३—४८)

शिवले जरी वस्त्राला शांती मिळे जीवाला
मी रोग मुक्त होई हा विश्वास हा मनाला ।। धृ ।।
थकले करुन बाई उपचार सारे काही
बारा वर्षे झाली शांती जीवास नाही
कशी सागू मी कुणाला विश्वास हा मनाला ।। १ ।।
याइराच्या घरी बाई येशू चाले घाई घाई

पण होईल बरी मी श्रद्धा ही माझ्याठायी
शिवले जरी वस्त्राला हा रोग माझा गेला
येशू बोले ज्या बाइला तू रोग मुक्त होई ।। २ ।।

## ५०४. शिवली वस्त्रगोंडयाला

(संदर्भ— मत्तय ९: २०—२२, मार्क ५: २५—३४,
लूक ८: ४३—४८)

झरझर येउनी पाठीमागुनी शिवली वस्त्रगोंडयाला
प्रभू वदला कुणीतरी शिवले हो मजला ।। धृ ।।
रक्तस्त्रावाने दु:खे पिडली बारा वर्षे ती बरी नाही झाली
हळूच पाठीमागे आली शिवली वस्त्र गोंडयाला ।। १ ।।
मम अंगातुनी शांती निघाली कोण शिवे मज तिलाच शोधी
पेत्र वदला गुरुजी स्वामी गर्दी किती तरी झाली ।। २ ।।
थरथर कापत ती हरणी दर्शन घेत कबूल झाली
सारे जन पाही आश्चर्याने विश्वासाने बरी झाली ।। ३ ।।

## ५०५. लोकांच्या त्या गर्दीमधुनी

(संदर्भ— मत्तय ९: २०—२२, मार्क ५: २५—३४,
लूक ८: ४३—४८)

लोकांच्या त्या गर्दीमधुनी ख्रिस्तप्रभू वदले
कोण मला शिवले, शिष्यगण कोण मला शिवले ।। धृ ।।
विचार पडला ज्याला त्याला वेड लागले काय प्रभूला
सामर्थ्याचा प्रयोग घडला कार्य कसे घडले ।। १ ।।
पवित्र त्याच्या देहामधुनी शक्ती निघाली कार्य करोनी
वदला येशू मागे वळोनी कार्य कसे घडले ।। २ ।।
रक्तस्त्रावी ती अबला कोणी धावत आली प्रभूच्या चरणी
सांगू लागली सर्व कहाणी ख्रिस्त प्रभू येशूला ।। ३ ।।

## ५०६. तळपत होते बारा वर्षे

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२, मार्क ५: २५–३४,
लूक ८: ४३–४८)

मी तळपत होते बारा वर्षे किती पैसा केला खर्च
आले प्रभूराज ना मी सुखी झाले आज ना बाई ग ।। धृ ।।
वैद्य डॉक्टर पाहिले कितीतरी नाही उपयोगी पडली जादूगिरी
मी फिरले गावा नाही विसावा भोगिल्या यातना ।। १ ।।
भल्या गर्दीत मी चोरावानी रोगमुक्त झाले त्याच क्षणी
झाला फार चमत्कार राखी माझी लाज ना ।। २ ।।
किती सामर्थ्य बाई याच्या गोंड्याला मोठे नवल वाटते माझे मला
हाच दिसतो पाप्यासाठी धरा याची साथ ना ।। ३ ।।

## ५०७. वस्त्राला शिवले जरा

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२, मार्क ५: २५–३४,
लूक ८: ४३–४८)

तुझ्या वस्त्राला शिवले मी जरा
दाविदाच्या मुला हा रोग माझा झाला बरा ।। धृ ।।
काना गावी लग्न होते मारीया होती त्या लग्नाला
तेथे पाण्याचा द्राक्षारस केला ।। १ ।।
अडतीस वर्षे दुखणेकरी पडला होता खाटेवरी
खाट उचलायला शक्ती दिली त्याला ।। २ ।।

## ५०८. रक्तस्त्रावीच्या मनाचा बेत हा

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२, मार्क ५: २५–३४,
लूक ८: ४३–४८)

रक्तस्त्रावीच्या मनाचा बेत हा ।। धृ ।।
झटकन शुद्ध होईल काया ही बारा वर्षे झाली उतारच नाही
होईल माझा रोग बरा (२) झाला आनंद तिजला हो महान ।। १ ।।
लोटली गर्दी प्रभुला पाहुनी रक्तस्त्रावी आली लपुनछपुनी
शिवली त्याच्या वस्त्रटोकाला गेली स्पर्शुनी त्याच्या वस्त्राला ।। २ ।।





कोण गेले मजला शिवूनी रक्तस्त्रावी आली पुढे भिवूनी
दिले क्षमेचे दान तिला हो गेली हर्षित होऊनी ती महान ।। ३ ।।

## ५०९. मुक्ती पावले बाई मी

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२,
मार्क ५: २५–३४, लूक ८: ४३–४८)

प्रभुरायाच्या वस्त्राला शिवले
मुक्ती पावले बाई मी मुक्ती पावले ।। धृ ।।
मला रक्तस्त्रावाचा जडला विकार
करुनी थकले मी बहू उपचार
नाही त्यातुनी ऽऽऽ बाई मी निभावले ।। १ ।।
गर्दीमध्ये मी प्रभुला पाहिले
जाउनी त्याला स्पर्श मी केला
त्याच क्षणी ऽऽऽ बाई मी सुखावले ।। २ ।।

## ५१०. बारा वर्षाचा रक्तस्त्राव

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२,
मार्क ५: २५–३४, लूक ८: ४३–४८)

बारा वर्षाचा रक्तस्त्रावाने व्यापली होती पुरी
आज स्पर्शाने झाले बाई मी बरी ।। धृ ।।
नानापरी औषधं केले कशाचे फळ हे नाही मिळाले
चमत्कार प्रभुचे ऐकू आले, वाहे दु:खाची दरी ।। १ ।।
गर्दीमध्ये प्रभू पाहिला प्रभु येशुवरी भाव ठेविला
हळू हळू मी बाई मार्ग काढिला दाटी होती ती खरी ।। २ ।।
भीत भीत मी पुढती गेले वस्त्राला त्याच्या स्पर्श केला
स्पर्श करूनी विजय मिळविला झाले मी आज बरी ।। ३ ।।





## ५११. लपत छपत रक्त स्त्रावी

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२,
मार्क ५: २५–३४, लूक ८: ४३–४८)
लपत छपत रक्त स्त्रावी प्रभुपाशी आली
प्रभुपाशी येऊन ती रोगमुक्त झाली ।। धृ ।।
बारा वर्षे राहुनी दु:ख उपाय मी केले
कधी खुळ्या जीवा माझ्या शांती नाही मिळाली ।। १ ।।
निश्चय मनामधे मी केला शिवले मी प्रभुवस्त्राला
कशी जादू झाली आजला, नाही कळाली ।। २ ।।

## ५१२. शिवले वस्त्रा तुझ्या रे

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२,
मार्क ५: २५–३४, लूक ८: ४३–४८)
शिवले वस्त्रा तुझ्या रे
प्रभू मी पापी कर जोडुनिया विनवी तुला रे ।। धृ ।।
या रोगाला वर्षे फार झाले
डॉक्टर वैद्य करूनी थकले उपाय हरले सारे, ।। १ ।।
झरा सुखाचा मज मिळाला इश प्रीतीचा प्राशन केला
मन हे शांत होई ।। २ ।।

## ५१३. रक्तस्त्राव लागलेली बाई रडे

(संदर्भ– मत्तय ९: २०–२२,
मार्क ५: २५–३४, लूक ८: ४३–४८)
रक्तस्त्राव लागलेली बाई रडे
प्रभुराया केव्हा माझ्या दृष्टीस पडे ।। धृ ।।
अनन्य उपाय योजिले मी जरी
बाई धावूनीया वस्त्र त्याचे धरी
झाली बारा वर्षे सारी, त्रासले मी भारी
शक्ती नाही परी जीव कोण उद्धारी
शिवल्याने रोग तिचा जाई गडे ।। १ ।।





शिष्य समुहात प्रभूजी दिसेना
कोण गेली वस्त्रा शिवूनी झालो अशक्त
शक्ती ही गेली सारी सभोवार तो पाही
गेली घाबरूनी बाई रडे प्रभू पायी
विश्वासाने रोग तिचा जाई गडे ।। २ ।।

## ५१४. धोंडे माराया

(संदर्भ – योहान ८: १–११)
धोंडे माराया लोकांनी धरले मला
व्यथा या जीवाची तुला सांगते (३)
क्षमा मागते रे क्षमा मागते
केल्या पातकांची क्षमा मागते ।। धृ ।।
मी स्वत:च्या रुपाला कशी भाळले
जवानीत वेड्यापरी वागले
कशी बोलू तुझ्याशी रे भिती वाटते
क्षमा मागते रे क्षमा मागते।। १ ।।
आहे ठाऊक मोशाचे शास्त्र तुला
दया येऊ दे येशू माझी तुला
तुझ्या पायावरी मी देह टाकिला रे
क्षमा मागते मी क्षमा मागते ।। २ ।।
काय लिहिलास मजकूर या भुमिवरी
वाचूनी लोक गेले निघूनी घरी
उभी एकटी मी अंतरी लाजते रे
क्षमा मागते क्षमा मागते ।। ३ ।।
धोंडा माराया मजला ना धजले कुणी
लाजले लोक येशू तुला पाहुनी
पापमुक्तीच्या तोऱ्यात मी डोलते ।। ४ ।।





## ५१५. पहिला धोंडा

(संदर्भ – योहान ८: १–११)

ख्रिस्ताला विचारलेले उत्तर त्याने दिले
निष्पापी जो असेल कोणी त्याने पुढे यावे
पहिला धोंडा खुशाल त्याने तिजला मारावे ।। धृ ।।
व्याभिचारी एक होती बाई ओढीत तिजला प्रभुकडे नेई
मोशाच्या रे शास्त्राप्रमाणे दगड तिला मारावे ।। १ ।।
विचारू लागले पाहा प्रभुला काय करावे सांगा हिला
परीक्षा पहाण्यासाठी प्रभुची जमुनी सारे आले ।। २ ।।
भूमिवरी लिहू लागला पुन्हा उठुनी प्रभुजी वदला
निष्पापी जो असेल तुम्हामध्ये आधी मला सांगावे ।। ३ ।।

## ५१६. निर्दोषी निर्दोषी

(संदर्भ – योहान ८: १–११)

निर्दोषी निर्दोषी तुम्हामध्ये आहे का कुणी आहे का कुणी
निर्दोषी मानवानं विचार करून, धोंड मार करावा पहिल्यानं ।। धृ ।।
एक बिचारी पापी अबला बसलेली– बसलेली
गाव–गुंडांची टोळी भवती जमलेली– जमलेली
मान तिची ती प्रभुच्या पायी झुकलेली– झुकलेली
पश्चतापाने बाई लीन बनलेली– बनलेली
भिजले हो पाय प्रभुचे ऽऽऽ तिच्या आसवानं
पुसले हो तिने ते डोईच्या केसानं ।। १ ।।
ख्रिस्त प्रभुने वाक्य भूमीवर लिहीले – लिहीले
कोण मारते दगड हिला रे पहिले–पहिले
ज्यांनी ज्यांनी घोषवाक्य ते वाचले – वाचले
एक एक ते सारे तेथून पांगले – पांगले
दोष लावणारे सारे ऽऽऽ निघुनिया गेले
अवघड कोडं सोडविले प्रभुने ।। २ ।।
क्षमा तुझ्या पापाची आता झाली बाई – झाली बाई
शुद्ध आचरण ठेवावे नित्य तू ही – नित्य तू ही





पुढे आदर्श शिष्य प्रभुची ती होई — ती होई
भक्तीमध्ये झाली तिची ती नवलाई — नवलाई
क्षमा करणे हा ऽऽऽ आहे दैवी गुण
बोध तो घ्यावा यामधून मानवानं ।। ३ ।।

### ५१७. नसेल जो कोणी पापी

(संदर्भ — योहान ८: १—११)
नसेल जो कोणी पापी तुम्हामध्ये
दगड मारावा त्याने तिला आधी ।। धृ ।।
शिकवीत असता प्रभू जनतेशी
येती मंदिरी शास्त्री—परुशी घेउनी ललना व्याभिचारीशी
म्हणती कर प्रभू न्याय इचा आधी ।। १ ।।
म्हणती असल्या अबला पतिता धोंडा मारिती होई उचिता
कधी रे मोशे नीतीशास्त्रामध्ये सांगे प्रभू तव मनामध्ये ।। २ ।।
लिहिले ख्रिस्ताने बसुनी भूमिवरी शास्त्री—परुशी पडले विचारी
वाचुनी घेतले सर्व त्यांनी अंतरी निघोनी गेले आपुल्या घरी ।। ३ ।।

### ५१८. धोंड मारी

(संदर्भ — योहान ८: १—११)
धोंड मारी ते दुराचारी वेडीस धरी
करावे काय गुरुजी हिला ।। धृ ।।
शिकवीत असता प्रभू मदिरी घेउनी आले व्याभिचारी
ओणवूनी लिहितो भूमिवरी बोध त्यांशी दिला ।। १ ।।
वाचून सगळे गेले माघारी निर्दोषी का कोणी तरी
खिन्न मनाने ती गेली तारण दिधले तिला ।। २ ।।

### ५१९. आज मी मनोमनी आनंदीत

(संदर्भ — योहान ८: ३—११)
आज मी मनोमनी आनंदीत झाले
ख्रिस्तराया प्रसन्न झाले





माझे पाप धुउनी काढले प्रिय त्या ख्रिस्ताने
प्रिय त्या ख्रिस्ताने ।। धृ ।।
होते मी जवानीच्या धुंदीत
नव्हते मी कुठल्याही मोहपाशात
होते जवानीवर पैसे कमवीत मन माझे होते मोकळे ।। १ ।।
एके दिनी पुढाऱ्यांनी मजला धरिले
मंदिरात येशूकडे घेऊन आले
हिला मारावे का सोडून द्यावे
ख्रिस्तास विचारू लागले ।। २ ।।
मोशाचे नियमशास्त्र ठाऊक आहे का तुला
जया अंगी नसे लवलेश पापाचा
त्याने धोंडा पहिला तिला मारावा
जमिनीवर लिहिले ख्रिस्ताने ।। ३ ।।
वाचुनी मजकूर सारे निघून गेले
पुन्हा पाप करू नको ख्रिस्त वदले
त्या ठिकाणी मी एकटीच उरले
पापमुक्त केले ख्रिस्ताने ।। ४ ।।

## ५२०. अश्रुंनी धुतले प्रभूचे पाय

(संदर्भ– मत्तय २६: ६–१३,
मार्क १४: ३–९, लूक ७: ३६–५०, योहान १२: १–८)

अश्रुंनी धुतले प्रभूचे पाय केसांनी पुसले प्रभूचे पाय ।। धृ ।।
प्रभू चरणावर अश्रु ढाळीले पुसूनी केसांनी मुके घेतले
तेल सुगंधी तया लाविले वंदिले प्रभूचे पाय ।। १ ।।
पाहून दृष्या शिमोन बोले कोण शिवे तुज हे ना कळले
मन शिमोनाचे जाणियले चमत्कार हा काय ।। २ ।।
शिमोनास मग प्रभूने म्हटले पाय धुण्याला पाणी न दिधले
माझे तू ना स्वागत केले हीने जाणिले पाय ।। ३ ।।
प्रभू येशूने तयास म्हटले अधिक ऋणातून तिला सोडीले
प्रेम तिने पहा फारच केले जवळ हेची काय ।। ४ ।।





पापातून मुक्त जाहली प्रभू येशूची दासी झाली
स्तुती प्रभूची जगभर केली वंदिले प्रभूचे पाय ।। ५ ।।

## ५२१. तेल लाविते प्रभूला

(संदर्भ— मत्तय २६: ६—१३, मार्क १४: ३—९,
लूक ७: ३६—५०, योहान १२: १—८)

तेल लाविते त्या प्रभूला तेल लाविते त्याला
विश्वासाने तारिले तुजला
प्रभू बोले त्या स्त्रीला ।। धृ ।।
केली विनंती परुश्याने त्याला आज माझ्या घरी यावे भोजनाला
भोजनकरण्या बसला असता शिष्याने तो पाहिला ।। १ ।।
आसवे गाळी चरणावरती पाय प्रभूचे केसांनी पुसती
आली मात्र कुपी घेउनी तेलाभ्यंग केला ।। २ ।।

## ५२२. परुशी प्रभुला म्हणाला

(संदर्भ— मत्तय २६: ६—१३, मार्क १४: ३—९,
लूक ७: ३६—५०, योहान १२: १—८)

परुशी प्रभुला म्हणाला यावे गृह भोजनाला ।। धृ ।।
हो वाढा पापड खीर पोळी भजे सार हो लाडू गुळ कढी
हो भजे सार हो लाडू गुळ कढी जाऊन सांगा प्रभुजीला ।। १ ।।
एक पापीन बाई तेथे आली प्रभूमागे ती उभी राहिली
हो प्रभूमागे ती उभी राहिली तळमळ लागे जीवाला ।। २ ।।
हो केस धरून केली पायपुस मनी होती प्रभुची आस
आता पापाची क्षमा झाली खास हो आता पापाची क्षमा झाली खास
सोन्याचा दिन मज आला ।। ३ ।।

## ५२३. पस्तावली

(संदर्भ— मत्तय २६: ६—१३, मार्क १४: ३—९,
लूक ७: ३६—५०, योहान १२: १—८)

पस्तावली ती वेशा अंतरी





म्हणे प्रभूला मी पापे केली भारी ।। धृ ।।
पाय धुतले आपल्या आश्रुंनी
पाय पुसले आपल्या केसांनी
अत्तर शिंपले त्याच्या पायावरी ।। १ ।।
चकीत झाला सिमोन मनी
समजले त्याला अंतर्यामी
येशू बोलला पश्चतापामुळे तुला पापाची क्षमा झाली ।। २ ।।

## ५२४. माग्दालीन एक होती

(संदर्भ– मत्तय २६: ६–१३, मार्क १४: ३–९,
लूक ७: ३६–५०, योहान १२: १–८)
माग्दालेना एक होती वेश्या प्रीत हिने केली
भक्तीची पैंज हिने जिंकली ।। धृ ।।
सत्कर्माची प्रौढी मिरवीत होते अवघे जन
सुर्यावाचून प्रकाश जैसा होते ना प्रभू वाचून
अनंत पापे घेउनी मारीया प्रभू पदी धावली ।। १।।
अघटित ख्रिस्ताची ही करणी कळली नाही कुणा
देव पुत्र जो ख्रिस्त याच्या कळल्या नाही खुणा
जगत पापिनी पश्चातापे प्रभू पदी पावली ।। २।।
द्वादश होते शिष्य प्रभुचे रात्रंदिन संगती
ख्रिस्ताचे पुनरुत्थान तयांना नव्हते का माहिती
सर्वाआधी कबरेवर त्या माग्दालीन पोहचली ।। ३।।

## ५२५. डोइवर घेऊन पाण्याची घागरी

(संदर्भ– जॉन ४: ४–४२)
डोइवर घेऊन पाण्याची घागरी चालली रुपसुंदरी ।। धृ ।।
झप झप पाऊल नागीन चाले रुप जणू चंद्राच्या परि तेज आले
पाणी घेण्यास येई झऱ्यावर ।। १ ।।
प्रभूजी बोले शमरोनी बाई पाणी पिण्यास मजला तू देई
मज लागली तृषा ही खरी ।। २ ।।





शमरोनी मी तू यहुदी असशी कैसे देऊ मी पाणी पिण्याशी
तुझे माझे न चाले व्यवहारी ।। २ ।।

## ५२६. याकोबाच्या विहिरीवरती

(संदर्भ– जॉन ४: ४–४२)

याकोबाच्या विहिरीवरती प्रभुजी अवतरले
व्याकुळ तहानेने झाले ।। धृ ।।
जाता जाता सांगे सुवार्ता अंध पंगुंना जीवन देता
कधी ना थकले कधी ना दमले
ख्रिस्त पुढे चाले, व्याकुळ तहानेने ......।। १ ।।
जल भरण्याशी आली शमरोनी प्रभुने तिजला मागीतले पाणी
तुम्ही हो यहुदी मी शमरोनी
भेद कसे झाले, व्याकुळ तहानेने...।। २ ।।
कोण आहे ओळखिले का फिरोनी तुजला लागे न तृषा
जीवनी पाणी तुजला दिले ख्रिस्त असे वदले ।। ३ ।।

## ५२७. याकीबाच्या त्या विहरीवरी

(संदर्भ– जॉन ४: ४–४२)

होती भरीत पाणी कुणीतरी सर सर ऐकू आला
आवाज कानावरी ।। धृ ।।
जाउनी मागे पाणी प्याया ओळखिले ना मसिहाशी त्या
शब्द ऐकोनी बोले त्यावरी ।। १ ।।
तू यहुदी मी शमरोनी देऊ कैसे तुजला पाणी
दिले जरी ते पाहील कुणीतरी
शब्द ऐकोनी बोले त्यावरी ।। २ ।।

## ५२८. घेउनी घागर डोइवरी

(संदर्भ– योहान ४: ४–४२)

घेऊनी घागर डोईवरी आता जाऊ कशाला मी विहिरीवरी ।। धृ ।।
मजला कळे ना बाई देव कसा पावला
याकोबाच्या विहिरीवरी देव मला घावला





आज पावन झाली बेथलेहेम नगरी
आता जाऊ कशाला...।। १ ।।
तहानेला होता येशू पाणी मागे प्यायला
जीव माझा धजला नाही पाणी त्याला द्यायला
शमरोन्यांचा वीट होता यहुद्यांच्या जातीला
आता सांगते बाई सारी कहानी खरी ।। २ ।।
जीवनाच्या साऱ्या गोष्टी माझ्यासंगे बोलला
अनितीच्या पायी जणू काटा मला टोचला
आता माझ्या हृदयाला ध्यास त्याचा लागला
अंतरीचे दु:ख बाई केले त्याने मोकळे बाई
असा संदेष्टा असावा मी जाणून घेतले बाई
बोल ऐकून धडकी भरली उरी ।। ३ ।।
जीवनाचे पाणी देईल तो बोलला
तृषा तुला लागणार नाही असे तो बोलला
मला त्याच्या बोलण्याची बाई वाटे खात्री
गूढ तयाचे ऐकूनी झाले मनी बावरी
विहिरीवर जाण्याचा बाई त्रास माझा वाचला
आज माझ्या हृदयात ध्यास त्याचा लागला
आज पावन झाली सुखार नगरी गं ।। ४ ।।

## ५२९. रोज कशाला भर दुपारी

(संदर्भ– योहान ४: ४–४२)
रोज कशाला भर दुपारी येऊ अनवानी
प्रभू मज द्या जीवनी पाणी ।। धृ ।।
सुखार नगरी शमरोनाच्या विहिरीजवळी याकोबाच्या
पतित जनांच्या गावी प्रभुच्या द्या जीवनी पाणी ।। १ ।।
भाग्य उजळले या नगराचे पाय लागले प्रभू येशूचे
वचनच झाले शुभ हाकेचे द्या जीवनी पाणी ।। २ ।।
भाव प्रभोवर जो ठेवील जीवंत सरिता त्यातून वाहील
अवनी अवघी जलमय होईल प्रभुच्या वचनानी ।। ३ ।।





## ५३०. विहिरीवरती आले दैवशाली

(संदर्भ– जॉन ४: ४–४२)

दमून थकुनी विहिरीवरती आले दैवशाली
हिंडून फिरुनी त्यांना तहान हो लागली ।। धृ ।।
पाणी भरे भरदुपारी एकलीच शमरोनी
यहुदी त्यांना तुच्छ मानी तसे येशू मागे पाणी
श्वास त्रासाचा रोखुनी हो येशू बसले खाली ।। १ ।।
तिच्या मनाचे विचार ऐकूनी बोले थोर
जीवनाचे पाणी देईल जीवंत पाणी असणार
द्यावे जीवनाचं पाणी बाई विनवू लागली ।। २ ।।
वदे येशू त्या बाईला दैवी पाण्याची ती लीला
जरकोणी पाणी प्याला न राही भुकेला तान्हेला
प्रभू गुरुजीला बाई पाणी देऊ लागली ।। ३ ।।

## ५३१. दिव्यामधे तेल नाही

(संदर्भ– मत्तय २५: १–१३)

दिव्यामधे तेल नाही उसने घाला बाई
जा दुकानात आता हाक कानी येई ।। धृ ।।
दहा जणींचा हा मेळा जातो सामोरा वराला
वेळ लागे त्या वराला झोप आता येई ।। १ ।।
मध्यरात्रीच्या सुमाराला मारी वर हाका
पाच जणी गेल्या आत दार बंद होई ।। २ ।।
अरे उघडा, प्रभू म्हणे ओळखीत नाही तुम्हाला
दास म्हणे आजला तयारीत राहवा ।। ३ ।।

## ५३२. पाच मुर्ख पाच शहाण्या

(संदर्भ– मत्तय २५: १–१३)

जेव्हा राज्य स्वर्गाचे येई दहा कुमारी सारिखे होई
दिवे घेउनी वराला सामोरी जाण्यास निघाल्या
स्वप्न पुरे करण्याला ।। धृ ।।





मूर्ख कुमारी आपल्याबरोबर
घेतिले दिवे पण तेल नाही बरोबर
काळ त्यांच्यावरी तो आला त्या डुकल्या घेऊ लगल्या
आली झोप त्या सर्वाना ।। १ ।।
मध्यान्ह रात्री हाक कानी आली
पाच मूर्ख कुमारी झोपेतून जागी झाली
दिवे आपुले त्या नीट करु लागल्या या मूर्ख म्हणे शहाण्यांना
द्यावे तेल तुम्ही आम्हाला लागले दिवे विझण्याला ।। २ ।।
शहाण्या त्यांना देती उत्तर नाही तुम्हा आम्हा तेल पुरणार
जाती तेल घेण्या, वर सत्वर आला जेव्हा त्यांची तयारी झाली
त्यां लग्न मंडपात गेली द्वार बंद झाले
नाही ओळखित मी तुम्हाला प्रभू बोले सुवार्ता ऐकणाऱ्यांना ।। ३ ।।

## ५३३. वंदू वराशी

(संदर्भ– मत्तय २५: १–१३)
चल ग झणी जाऊ या वंदू वराशी हो
घेउनी दिवे संगती त्यात ओतुनी तेल सुगंधी ।। धृ ।।
शहाण्यांनी भरीले दिवे त्यात ओतुनी तेल सुगंधी
एका मागुनी एक पद उचलुनी थेट
जाई त्या बघाया क्षणो क्षणी ।। १ ।।
वर न येता वेळेवरी त्या दाहीजनी झोप लागली
मध्यरात्र होता वेळ बहू जाता
हाक कानी ही हो पडता ।। २ ।।
जाग आली त्या दाहीजनी घाई घाई त्या दिवे शोधती
नम्र होण्यापरी अती दुःखी होउनी
द्या गं आम्हाशी तेल सुंगधी ।। ३ ।।
तेल न मिळता मूर्ख जणी त्या घेती दिवे हाती घाई घाई
वेळ गेली सुनी त्या बघुनी क्षणी
फिरे माघारी पंतगापरी ।। ४ ।।





वेळ जाता जे धावा घेती तेवी नच येई जगदगुरू ती माउली
सिद्ध व्हावे पदी तनमन अर्पुनी
भर तारुण्यात स्मरूनी ।। ५ ।।

## ५३४. ये प्रभूजी ऐक विनंती

(संदर्भ– लूक ७: ११–१७)

ये ये प्रभूजी ऐक विनंती नाही तर जाईल तो माझा मणी ।। धृ ।।
वेशी जवळ प्रभू जाता जाता जन समुदाय हा सामोरी येता
गर्दी ती बघता हटवी जनता धावे दुर्बल माता ।। १ ।।
विव्हळ होता रडता रडता विनंतीकरिता प्रभू पदी पडता
बोले ती माता प्राणकंठी येता वाचीव मम पुत्रा ।। २ ।।
पाहुनी तिजला कळवळा येता सांत्वनकरिता प्रभू लीन होता
बोले प्रभूजी प्रिय त्या पुत्रा ऊठ जा आईच्या गळा ।। ३ ।।

## ५३५. प्रभो हे बोलला

(संदर्भ– लूक ७: ११–१७)

नाईन गावी त्या प्रभू वाटेने चालला
पाहुनिया नेत्राने तो पाहा थांबला
प्रेत घेउनी लोकसमुदाय मोठा चालला ।। धृ ।।
एक विधवा बाई होती एकच पुत्र तिच्या पोटी
मृत्यु पावला एकाएकी शोक करून रडत होती
रडते का तू बाई प्रभू बोले त्या बाईला ।। १ ।।
दु:ख जाणुनी घेई मनाला नसे सहारा त्या बाईला
जीव आईचा वेडा झाला कळवळा प्रभुला आला
जनसमुह उभा करुनी प्रभो हे बोलला ।। २ ।।
खांदेकरी हे उभे केले प्रेत खाली ठेवियले
मुख प्रेताचे पाहु लागे थक्क चकीत लोक झाले
स्पर्श करुनी उठ तरुणा प्रभू हे बोलला ।। ३ ।।





## ५३६. होडीवाल्या वल्हव तुझी नाव रे

(संदर्भ – मत्तय ४: ३५–४१ व मार्क ८: २३–२९)

होडीवाल्या वल्हव तुझी नाव रे
वादळ वारा भारी सांभाळ बा तू रे ।। धृ ।।
शिष्यांचे हे तारू होते ऐन मध्यधार
वाऱ्या वादळाने केले त्यांना बिलकुल निराधार
साह्य करी तुम्हा प्रभू ख्रिस्त रे ।। १ ।।
सैतानाच्या पाशातुनी वल्हव तुझी नाव
प्रभू येशूच्या उपकाराची जाणीव मनात ठेव
प्रभू बोले पेत्रा भिऊ नको रे ।। २ ।।

## ५३७. शिरू लागले मचव्यात पाणी

(संदर्भ – मत्तय ४: ३५–४१ व मार्क ८: २३–२९)

शिरू लागले रे मचव्यात पाणी
प्रभू झोपलेले शिष्यगण म्हणती
बुडतोय आम्ही वाचवा प्रभूजी बोले ओरडुनी ।। धृ ।।
सुटले वादळ समुद्रावरती शिष्य सारे भयभित होती,
लाटा पाण्याच्या उंच उडती गेले घाबरुनी ।। १ ।।
धमकाविले वाऱ्या वादळाला
शांत हो म्हणाले प्रभुजी तयाला,
आज्ञा ती प्रभोची ऐकली त्याने, नम्र होउनी ।। २ ।।

## ५३८. आले तुफान सागरा

(संदर्भ – मत्तय ४: ३५–४१ व मार्क ८: २३–२९)

आले तुफान सागरा, नाही जगी आसरा
धाव प्रभू देवा तूच कृपाळा ने मज पैलतीरा ।। धृ ।।
घनघोर सुटले वादळ होती जीवाची माझ्या तळमळ
धाव प्रभू देवा करितो धावा वाचव आम्हा सत्वरा ।। १ ।।
प्रभू आम्ही तुझी लेकरे तूच आमुचा माय बाप रे
धाव प्रभू देवा करितो धावा वाचव आम्हा सत्वरा ।। २ ।।





## **५३९. बोले प्रभूजी वादळाशी**

(संदर्भ – मत्तय ४: ३५–४१ व मार्क ८: २३–२९)

बोले प्रभुजी वादळाशी थांबत नाही का ?
वादळा थांबत नाही का ? ।। धृ ।।
स्वामी जगाचा येशू राजा होडीत निजला तारक माझा
बंद करून घे गाजावाजा ऐकू येते का? ।। १ ।।
कडवट होई निद्रा प्रभुची गरज तयाला विश्वासाची
गडबड थांबवी तव वादळवाऱ्याची प्रभुला सांगू का ? ।। २ ।।

## **५४०. तारवात तारणारा झोपलेला**

(संदर्भ – मत्तय ४: ३५–४१ व मार्क ८: २३–२९)

तारवात तारणारा होता झोपलेला
गोंधळलेले शिष्य सारे वादळाला ।। धृ ।।
तुफान वारा सुटला तोल सावरेना
उसळती लाटा बुडू लागले ना
आता मात्र जातो म्हणोनी समुद्र तळाला ।। १ ।।
मचव्यात पाणी शिरू लागलेना
मनोधैर्य त्यांचे खचू लागलेना
आता मात्र जातो म्हणोनी समुद्र तळाला ।। २ ।।
दैवी अवस्था कठीण जहाली
प्रभूजीला तेव्हा त्यांची कीव आली
धमकावूनी तुफानाला शांत हो म्हणाला ।। ३ ।।

## **५४१. धाव प्रभू येशू धाव**

(संदर्भ – मत्तय ४: ३५–४१ व मार्क ८: २३–२९)

धाव प्रभू येशू धाव वारं सुटाया लागलं
माझी नाव किनारी लाव पाणी शिराया लागलं ।। धृ ।।
साऱ्या शिष्यांनी असा गोंगाट केला
प्रभू गुरुजी आता वाचवा आम्हाला
बुडुनी जाऊ आम्ही असं वाटाया लागलं ।। १ ।।





प्रभुने शिष्यांना असा आदेश दिला
जाऊ पैल तीरा असा देव म्हणाला
देव पाण्याचं तारू रे माझं डोलाया लागलं ।। २ ।।
थोडयावेळाने असा वारा आला
पाण्याच्या लाटांनी असा मारा केला
अरे उगे राहा तुम्ही त्याने वाऱ्यास म्हटलं ।। ३ ।।

## ५४२. समुद्रावरच्या वादळाने

(संदर्भ – मत्तय ४: ३५–४१ व मार्क ८: २३–२९)
समुद्रावरच्या वादळाने सर्वची घाबरले
भयभीत शिष्य झाले, गुरूजी ।। धृ ।।
प्रवासाने ख्रिस्तही दमले, तारवात ते झोपी गेले
सर्व मिळूनी शिष्य ओरडले, वादळ फार झाले ।। १ ।।
प्रभुजी वदले त्या शिष्यांना आठवा मनी देव दयेला
मी असताना तव संगतीला मग का घाबरता ।। २ ।।
आज्ञा केली त्या वदळाला शांत हो तू याच क्षणाला
जोराच्या लाटा उसळूनी आता पाणी शांत झाले ।। ३ ।।
शिष्य वदती एकमेकाला आज्ञा करीत असे निसर्गाला
झाला चमत्कार घडती सामोरी नवल मोठे झाले ।। ४ ।।

## ५४३. जरी पुत्र तझा मी

(लूक १५:११–३२)
जरी पुत्र तुझा मी पडतो गळी
पण नौकर म्हणूनी ठेव जवळी ।। धृ ।।
भाग हाती येता माझी मालमत्ता
नव्हता विचार पुढचा झालो चालता
जेव्हा पैसा उडूनी गेला चूक कळली
तेव्हा माता पित्याची आस लागली ।। १ ।।
त्या अवधीत पडला दुष्काळ कसा
जगती जनावरे फिरुनी मी जगलो तसा





जेव्हा डोळयाची माझ्या धुंदी उडाली
तेव्हा घरची रे बापा वाट मी धरली ।। २ ।।
पुत्र बघता पित्याने आनंद केला
माझा हरवलेला बाळ आज मला लाभला
दीन दास वदे आपण पुत्र कन्या सगळी
पश्चताप करु या देवाजवळी ।। ३ ।।

## ५४४. योग्य मी नाही

(लूक १५:११—३२)
योग्य मी नाही पुत्र म्हणाया
नोकर म्हणूनी ठेवा मजला ।। धृ ।।
उधळया पुत्र पस्तावला स्वछंदाचा अनुभव आला
डुकरे चारीत विचार त्याने केला
नसे कपडा त्याच्या अंगाला ।। १ ।।
संधी द्यावी मज पतिताला पश्चताप करावयाला
नित्य पाहतो तुझीच वाट मी
सोडीले दुष्टपणाला ।। २ ।।

## ५४५. सुख तुझे क्षण सोडी

(लूक १५:११—३२)
सुख तुझे क्षण सोडी प्रभुवरा तळमळे मी रात्रंदिन प्रभुवरा ।। धृ ।।
बापा घरी असंख्य चाकरा लाभे सुख तयाला
पशू खाऊन जे उरलेले खाद्य मी खाई पोशी देहाला
धाक असे मम या जीवना जाई पित्या घरी मी फिरून ।। १ ।।
पुत्र नव्हे बा चाकर ऐसा ठेवी बापा तू मजला
शरणागत मी तव चरणाला करी क्षमा या उधळयाला
दीन पश्चतापे पाहुनी बाळा कळवळे पित्याचे मन ।। २ ।।
मृतगत पुत्र जिवंत झाला ऐसे वाटे त्या पित्याला
हर्ष कराया सांगे सकला मम पुत्र मज मिळाला
प्रेम भरे हृदी विलसी पुत्रा आज माते हो समाधान ।। ३।।





## ५४६. कुणी ना ये कामा

(लूक १५:११—३२)

काका मामा कुणी ना ये कामा मित्र देती धोका
उधळया पुत्र विनवी बापा माफी करणार का ।। धृ ।।
घेउनी धन दौलत मी गेलो दूर देशात
वनवास आला नशिबाला नाही अन्न कण पोटात
आई बापाचे नाही ऐकले झाल्या फार चुका ।। १ ।।
अनुभव जगाचे आले, सोयरे हो पैसेवाले
संकटी ना कमा आले, डावलून मजला गेले
ह्या दुबळयाला तुमच्या पदरी नोकर ठेवाल का ।। २ ।।
ऐकून करूण इतिहास तो पिता बोले पुत्रास
हरवले मेंढरू माझे आले हो स्वगृहास
गुणदोष हे पदरी घेउनी स्वीकारी बालका ।। ३ ।।

## ५४७. आज्ञा मोडली

(लूक १५:११—३२)

आज्ञा मोडली पाहा त्याने पित्याची
दशा कशी झाली रे त्याच्या जीवनाची ।। धृ ।।
संपत्तीचा वाटा घेतीला तयाने
चैन जिवाची त्याने केली उधळूनी
दुष्ट वासनेने त्याला न पर्वा कशाची ।। १ ।।
संपले सारे ओळखिना कोणी
चाकरी धन्याची करी पेउनी पाणी
डुकराच्या शेंगा खाई भुकेल्या पोटाशी ।। २ ।।
उधळया पुत्र करी पश्चाताप
तुमच्या विरुद्ध बापा केले मी पाप
योग्य ना पुत्र तुमचा ठेवा नोकराशी ।। ३ ।।





## ५४८. दाविदाच्या पुत्रा ऐसे

(संदर्भ– मत्तय ९: २७–३१)

दाविदाच्या पुत्रा ऐसे म्हणूनी हाका मारी मारी
दोन आंधळे वाटेवरी रे देवा
दया कर आम्हा दीनांवरी ।। धृ ।।
प्रभू चाले वेगे वेगे जन समुदाय मागे
उगे राहा आधळयांनो लोक तया सांगे
फोडीला टाहो दृष्टी देरे देवा झडकरी ।। १ ।।
प्रभू बोले आधाळयांना काय करावे मी
दृष्टी देरे देवा आम्हा विनंती तव चरणी
करीता स्पर्श दृष्टी आली त्या आंधाळयांना
डोळे दिधले पांगळयांना पाय दिले
लाजरसा उठविले मृत्युतुनी
दास म्हणे बंधू भगिनी सारे लागा ईश्वर चरणी ।। २ ।।

## ५४९. ओरडोनी म्हणती प्रभुला

(संदर्भ– मत्तय ९: २७–३१)

दया करा आम्हावरी बसलेले वाटेवरी दोन आंधळे
समुदाय किती दमला नच काही दिसे त्यांना हो
कोणी म्हणती व्हा बाजूला कोणी धमकावती त्यांना हो
तळमळ त्या जिवा परी ।। १ ।।
ऐकोनी शब्द प्रभुने विचारीले स्वमनाने हो मनाने
द्या नेत्र प्रभू आम्हा वर मागती प्रभुला हो प्रभुला
ठेवी हात नेत्रावरी ।।२।।

## ५५०. रस्त्यावरी आंधळे

(संदर्भ– मत्तय ९: २७–३१)

रस्त्यावरी दोन आंधळे प्रभू येशुला मागती डोळे
करूनी विनंती प्रभुला म्हणती
गेले हे जीवन वाया गेले हे जीवन वाया
हे दाविदाच्या मुला करी आम्हावरी दया ।। धृ ।।





लोक समुदाय त्यांना रागावले
तरीही नाही त्यांनी ऐकले
ओरडुनी म्हणती तूच कैवारी सांगा गुरूवर्या ॥ १ ॥
ही वेळ निघूनी जाणार
संधी नाही कधी मिळणार
आम्ही असेच आंधळे राहणार सांगा गुरूवर्या ॥ २ ॥

## ५५१. देव असुनी मानव झाला

(संदर्भ– मार्क १०: ४६–५२)
देव असुनी मानव झाला जग कल्याणासाठी
पापी मानवासाठी जगी आला पापी मानवासाठी ॥ धृ ॥
येरीहोला प्रभुजी जात असता वाटेवरी आंधळा बसला होता
करी विनंती प्रभू येशुला दृष्टी येण्यासाठी ॥ १ ॥
विनंती ऐकोनी प्रभू तिथे गेला त्या आंधळयांचा कळवळा आला
स्पर्श करुनी त्या अंधळयाला दिली दृष्टी पाहण्यासाठी ॥ २ ॥

## ५५२. अंधळा भिकारी

(संदर्भ– मार्क १०: ४६–५२)
नासोरी नासोरी अंधळा भिकारी ओरड करी ॥ धृ ॥
जाता प्रभुजी यरिहो नगरी अंधळा बसला त्या वाटेवरी
अंधळा भिकारी जोरात हाका मारी दाविद पुत्र नासोरी ॥ १ ॥
अंधळा भिकारी जोरात हाका मारी समजले अंतरी जो तो पुकारी
अंधळा भिकारी जोरात हाका मारी दाविद पुत्र नासोरी ॥ २ ॥

## ५५३. डोंगरावर झाले प्रभूचे रुपांतर

(संदर्भ– मत्तय १७: १–१३)
डोंगरावर झाले प्रभूचे रुपांतर
देही शिष्यांच्या समोर ॥ धृ ॥
मोशे एलिया तयासंगे बोले पाहून शिष्य भयभित झाले
ऐसा दाविला प्रभूने चमत्कार ॥ १ ॥





पेत्र वदे प्रभू राहवे येथे मंडप बांधू तुम्हा तिघांचे
पुत्र असे हाच माझा खरोखर ।। ३ ।।

# ख्रिस्ताचे दु:खसहन

### ५५४. गधर बावरी

गधर बावरी निघे प्रभूची स्वारी
जयकार जयकार जनता करी
होसन्ना ललकारी ।। धृ ।।
बालवृद्ध तरूण सारे गीत गाई देवाला
दीर्घ आयुष्य मागे कोणी प्रभू ख्रिस्त राजाला
वस्त्र भारी टाकुनिया वाटेवरी होसान्ना ललकारी ।। १ ।।
तोच ख्रिस्त तेच लोक हर्ष कसा विरला
मारा मारा म्हणण्याला टाहो त्यांनी फोडला
धरा त्याला मारा त्याला क्रुस खांबावरी ।। २ ।।
नको दास मागू जगी असे नीच वागणे
गौरविण्या ख्रिस्ताला पूर्ण व्हावे प्रीतीने
गेला जरी प्राणवरी नको पाहू माघारी ।। ३ ।।

### ५५५. प्रार्थना केली

प्रार्थना केली भोजनावरती शिष्य प्रभू शेजारी
बसली पंगत माडीवरी ।। धृ ।।
बोले प्रभूजी सर्व शिष्याला
तुम्हातील एक जण धरुन देणार मजला
थक्क झाले शिष्य सगळे शिष्य प्रभू शेजारी ।। १ ।।
कोण आहे तो सांग आम्हाला
ताटात ज्याने हात धुतला
अवाक् झाले शिष्य सगळे शिष्य प्रभू शेजारी ।। २ ।।





## ५५६. प्रभू दरबारी भोजनी बैसे

प्रभू दरबारी भोजनी बैसे पापी दुष्ट यहुदा
पापी दुष्ट यहुदा ।। धृ ।।
शोधुनी घेतिले प्रेषित बारा नर उद्धाराचा दावी मार्ग सारा
चालक पालक विशेष सारा
कूविचारी अंधां ।। १ ।।
प्रभू येशुला धरुन देण्याशी पैशाची हाव शिष्य धरी मनाशी
तीस रुपयाचा केला सौदा
घाली घास मुखा ।। २ ।।
प्रभू येशुला नेले धरुनी यहुदाने पाहिले नयनानी
होई घाबरा पापी यहुदा ।। ३ ।।

## ५५७. अशी दुष्ट कल्पना का शिवली तुला

अशी दुष्ट कल्पना का शिवली तुला
जेवूनिया ताटी बेईमान झाला ।। धृ ।।
शिष्यगणांमध्ये होता गणलेला
बाराजनांमध्ये धूर्त शहाणा
जाणून होता प्रभू पुरता तुला ।। १ ।।
दुनिया सारी प्रभुगुण गाई जो तो आपला मानून घेई
परी दुष्टाने नाही जाणिले तुला ।। २ ।।
तीस रुपयाची लालसा मनाला देईल धरुनी ख्रिस्त गुरुला
रोमी शिपाई संगे घेऊन आला ।। ३ ।।

## ५५८. यहुदा बोलतो मनाला

पापी दुष्ट यहुदा तो बोलतो मनाला
क्षमा नसावी देवा अशा पाप्याला (३) ।। धृ ।।
थोर प्रभुजीने केले थोर उपकार
दीन दुबळयांचा करुनी उद्धार
तरीही धरून दिले मी प्रभुजीला ।। १ ।।
काय देवा केले मी सुचेना मनाला





कैसे दाखऊ तोंड तुझिया जनाला
दोष तो देई, देई स्वत:ला ।। २ ।।
पश्चताप भारी होई त्याच्या मनाला
रडे सारखा तो जाऊन बाजूला
जाऊन घेई तो फास गळयाला ।। ३ ।।

## ५५९. गळा कापला

यहुदाने विश्वासाने प्रभूचा गळा कापला (२) ।। धृ ।।
प्रभू गेत्समनी बागेत गेला
दु:खाने व्याकूळ झाला
घाम रक्ताचा वाहिला ।। १ ।।
तीस रुपये घेऊन त्याने
प्रिय प्रभूला दिले धरुनी
घेई त्याच्या चुंबन गाला ।। २ ।।

## ५६०. शिष्य बसविले शेजारी

शिष्य त्याने बसविले शेजारी प्रभू भोजन मंदिरी ।। धृ ।।
प्रभू म्हणाला बारा शिष्यांना एकजण धरुनी देईल मजला
घाबरी झाली सारी ।। १ ।।
हृदयी अंतरी प्रभू कळवळला हीच वेळ मजवरी ।। २ ।।

## ५६१. विनवी ख्रिस्त आपुल्या पित्याला

विनवी ख्रिस्त आपुल्या पित्याला करी प्रार्थना परमेशाला
टळो मज वरुनी प्याला ।। धृ ।।
घटका आली ही दु:खाची साक्षात ती मरणाची
इच्छा न माझी तव इच्छेने घडले जरी आजला ।। १ ।।
जागृत राहुनी प्रार्थना करावी नच संकटे ती यावी
प्रार्थना माझी ही श्रद्धेची पुरवी साह्य मजला ।। २ ।।
घाम रक्ताचा टिपके भूवरी विव्हळ झाला उरी अंतरी
मानव पुन्हा दुष्ट जणांच्या स्वाधीन करणार मला ।। ३ ।।





## ५६२. बापा बापा हा प्याला

बापा बापा हा प्याला मजपासुनी कर दूर रे बापा ।। धृ ।।
माझ्या नव्हे पण तव इच्छेने तव इच्छेने
होऊ दे रे धीर मनाने धीर मनाने
माझी ना काही कुरकूर रे बापा ।। १ ।।
आज तुला मी खास विनवितो खास विनवितो
माझा आत्मा तव हाती देतो तव हाती देतो
मज पासून नाही दूर...... रे बापा ।। २ ।।

## ५६३. वेळ घटका जवळ आली

वेळ घटका जवळ आली
शिष्यगणा साऱ्या झोप लगली ।। धृ ।।
पेत्र याकोब योहान संगतीला
बागेमध्ये प्रभू गेले प्रार्थनेला भूमीवरती उघडा पडला
प्रार्थना करी ।। १ ।।
बोले प्रभुजी पेत्र सिमोना तुम्हा कसे जागे राहावेना
उत्तर देण्या काही सुचेना डोळे जड पडती ।। २ ।।

## ५६४. झाली आरोळी द्या ख्रिस्ता सुळी

पिलातची हात धुऊनी गेला ।। धृ ।।
शस्त्री परुशी येऊ रोषे आरोप करती खाटे नाटे
खरे आणखी काय खोटे जरी ना कळे त्याला ।। १ ।।
राज्यद्रोही कोणी म्हणती जादुगार कोणी गणती
सिद्ध न करता आरोप वदती स्तंभी खिळा त्याला ।। २ ।।
पिलताने धुवूनी हाता दोष नाही दिसे कळविले जगता
दुष्टा स्वाधीन केले ख्रिस्ता मारुनी फटक्याला ।। ३ ।।

## ५६५. वधा रे क्रुसी तयाला

वधा रे क्रुसी तयाला, कानी आवाज आला
नव्हता काही दोष प्रभूचा कळले रे पिलाताला ।। धृ ।।





जमले होते पापी कैक होते शापी रे
झाले किती स्वार्थी त्या पैशाच्या पायी रे
पैशा पुढती म्हणू लागले, स्वार्थसाठी म्हणू लागले
क्रुसी खिळा रे...॥ १ ॥
ज्ञानी झाले अज्ञानी, ख्रिस्ता ओळखिना कोणी रे
होती एक दासी राजाची झाली आई रे
त्या ख्रिस्ताला सोडून द्या हो देव पुत्राला सोडून द्या हो ॥ २ ॥
बारब्बा लुटारू आणून प्रजे पुढती
कुणा द्यावे सोडून, कुणा द्यावे सुळावरती
बरब्बाला सोडून द्यावे ख्रिस्त प्रभुला क्रुसी खिळा हो ॥ ३ ॥
मागितले पाणी धुतले हात राजाने
दोष नाही त्याचा तो न्याय द्यावा प्रजेने
याचे रक्त तुम्हावरती, मुलावरती, बाळावरती ॥ ४ ॥

## ५६६. पेत्रा तू ऐक मित्रा

पेत्रा तू ऐक मित्रा मी सांगतो तुला रे
बांग देता कोंबडयाने नाकारशी मला रे ॥ धृ ॥
करितोस मजवरी तू प्राणापल्याड प्रीती,
मजसाठी रे प्राणाची देशील तू आहुती
तरी सांगतो तुला मी, तू ऐक रे मुला ॥ १ ॥
अंगी तुझ्या कला रे, तलवार मारण्याची
बलवान तू असशी नच घाबरे कुणाशी
पण ऐक तू शिमोना मी सांगतो तुला रे ॥ २ ॥
नाकारशी मला रे पेत्रा तू तीन वेळा
हे सत्य बोल माझे तुजला आता पटेना
अखेर त्याच वेळी आठवेल हे तुला ॥ ३ ॥

## ५६७. याजकाच्या दारी

याजकाच्या दारी दूर दूर उभा राही
कसे ओळखिना प्रभुजीला
पाहा पेत्राने प्रभू कसा नाकारीला ॥ धृ ॥





दासी बोले पेत्रा तूही होता संगतीला
नाही नाही बाई मी नव्हतो जोडीला
तितक्यात कोंबडा आरवला
पाहा पेत्राने प्रभू कसा नाकारीला ।। १ ।।
देवडीवरी पेत्र उभा राही दासी त्यासी पुन्हा तेथे पाही
नाही नाही बाई मी त्यांच्यापैकी नाही
पहा पेत्राने प्रभू कसा नाकारीला ।। २ ।।
लोक बोले पेत्रा तू होतास खरोखरी
नाही नाही मी त्यास ओळखीत नाही
तितक्यात कोंबडा आरवला
पहा पेत्राने प्रभू कसा नाकारिला ।। ३ ।।

## ५६८. वाणी कोंबड्याची

वाणी कोंबड्याची दे पेत्रा आठवण
तैसे मज आठवू दे रे माझे उणे पण ।। धृ ।।
काय माझ्यासाठी ख्रिस्ता तुझे हाल
परी मी दुर्जन तुज पाही नाकारून
तुझ्या दोन्ही बाजू खांबी दोन चोर
तिसरा मी मध्ये थोर पापी जाण ।। २ ।।
तुझ्या माझ्यामध्ये पापाची ही धोंड
लोटी बा तू ती अखंड दावी तुझे मुख
घडू दे दर्शन ऐसे दे वरदान
तुझ्याच चिंतनी माझा पडो खर्ची प्राण ।। ३ ।।
सोडी माझ्या देवा ऋण सर्वदाचे
म्या का न सोडावे ऋण आपुलेच
जगा दावूनीया कित्ता गेला तू स्वर्गात
शुद्धु करी माझे चित्त देवा तूच तार ।। ४ ।।

## ५६९. कोंबडा अरवला

कोंबडा अरवला पेत्र नाकारी तीन वेळा
रडला दुःखाने रडला रडला दुःखाने रडला ।। धृ ।।





वाड्याच्या बाहेर पेत्र बसला विचारी एक शिपाई त्याला
गालीलकरांच्या जोडीला होतास तू संगतीला
तू जे म्हणतेसबाई नाही ठाऊक ते मजला ।। १ ।।
मग तो देवडीवर जाई लोकांना सांगे एक बाई
नासोरी येशूबरोबरी पाहिले याला मी ग बाई
नाही ओळखीत मी त्या मनष्याला पेत्र वदला ।। २ ।।
आगीशी शेकत उभा राहिला पाहूनी बोले पेत्राला
आहेस तू शिष्यातला ओळखी कान कापलेला
नाही शप्पथ—तो नाकारी ख्रिस्ताला ।। ३।।

## ५७०. सिमोन सिरेनीकर

(संदर्भ — मार्क १५: २१—२२,
मत्तय २७:३२ व लूक २३:२८ )
शेतावरुनी सिमोन त्याच्या घरी चालला
बळे धरुनी त्याच्या वरती क्रूस लादला ।। धृ ।।
ऊर बडवीत होता जनसुदाय
शोक करीत होत्या आया आणि बाया
रडू नका मजसाठी येशू म्हणाला ।। १ ।।
रडा तुम्ही स्वत:साठी आपल्या पुत्रांसाठी
असे दिवस येतील त्यात वांझ असलेली
पर्वतास म्हणतील झाका आम्हाला ।। २ ।।

## ५७१. वेरुनिकाबाई

वेरुनिकाबाई घेऊन रेश्मी रूमाल
चेहरा पुसाया देई प्रभू ख्रिस्ता
चेहऱ्याचे दान तिला दिले प्रभुजी ने
पाहुनिया बाई रडे मोठ्या दु:खाने ।। धृ ।।
ज्या हाताने आशीर्वाद दिधला लोका
त्याच हाताला म्हणती सारे खिळे कुऱ्हाडी ठोका
माझ्या प्रभो, माझ्या प्रभो ।। १ ।।





बारा शि  य ते कोठे गेले ख्रिस्ताला सोडूनी
एका ताटात जेवलेले बेईमान सारे म्हणूनी
माझ्या प्रभू, माझ्या प्रभू ।। २ ।।

### ५७२. स्तंभावरती सात वाक्य

स्तंभावरती सात वाक्यही वदला प्रभू भगवान
सुजनहो घ्या ऐकूनी महान ।। धृ ।।
वदला प्रभुजी प्रथम वचने जेव्हा खिळीती पशू नात्याने
करी क्षमा तू बापा त्यांची रे अजुनी हे अज्ञान ।। १।।
अनुतापे खल शरणच येता शब्द दुसरा बोले जग त्राता
असशील स्वर्गी जाण ।। २ ।।
स्तभांजवळी रडता पाही क्लोपास्त्री आणि आपुलीच आई
शब्द तिसरा वदे बघ बाई पुत्र तुझा योहान ।। ३।।
उठले जेव्हा त्रिभुवन तिमिरी शब्द चवथा वदे आश्रू भारी
माझ्या देवा त्याग का करी केला अजुनी सान ।। ४ ।।
पूर्ण सकल हो प्रभू अवलोकी पूर्ण व्हावया शास्त्र लेखकी
शब्द पाचवा बोलून टाकी लागे मजशी तहान ।। ५।।
देता आंब तयाशी प्राषुनी शब्द सहावा बोले जगधनी
पूर्ण जहाले आपुल्या वदनी स्तंभी इश वृतांत ।। ६।।
हे बापा मी तुझिया हाती निज आत्मा सोपवितो अंती
बोले क्रुसी अशी आत्माटेकी सोडी प्रभू निज प्राण ।। ७ ।।

### ५७३. झोपी गेला क्रुसावरती

झोपी गेला क्रुसावरती येशू शांतवृती
जागवूनी पाप्या उठवी त्याच्या पुनरुत्थानी ।। धृ ।।
स्वयंभू शक्ती करवी झुंजे मरणाशी
प्राण अंती सोपवी जाता पित्याच्या वरती
ऐसी ख्रिस्त चित्तवृत्ती ठेवली अंबरी ।। १ ।।
शोकांतिका ही मरणाची जगात निराळी
देव देविकांच्या मरणी श्रेष्ठता मिळाली





शोभला क्रुसाच्या वरती राजा तो प्रतापी
मनुजा तू जाणुनी घेई दु:ख कालवरी ।। २ ।।
आता माझ्या जीवनी नाही भिती मरणाची
ख्रिस्तधनी झोपी घाली मरणा पळवी
हालेलुया गा येशुची जाता प्राण अंती
पापे आठवूनी जावे त्याच्या पुनरुत्थानी ।। ३ ।।

## ५७४. तळपे स्तंभावर

तळपे स्तंभावर प्रभू दु:ख किती गा आवरू प्रभो मी ।। धृ ।।
शुद्ध करुनी मज नेले प्रभुने सत्कर्माचे शिकवी वर्तन हे
होते कशी मी आठवू ।। १ ।।
प्रभुभोजनाच्या समयी चरणी प्रभुच्या मी सेवेला
सुख कैसे मी विसरू ।। २ ।।
कालवरीच्या टेकडीवर हा वाही क्रुसाचा भार किती हा
तीन घडीला या स्मरूं ।। ३ ।।
प्रभू उठला हे कळले मारीया हर्षभराने पळे थडग्याला
वदला प्रभुजी नको शिवू मजला ।। ४ ।।

## ५७५. खांबी दिले प्रभूला

खांबी दिले प्रभुला दया कशी नाही हो तुम्हाला ।। धृ ।।
मुगूट काटयांचा शिरी घातीला वेत मस्तकी मारिला
मार फटक्यांचा दिला ।। १ ।।
जड क्रुसा ते वाहण्या लाविला खिळे ठोकूनी क्रुसी वधिला
माता विनवी लोकांना ।। २ ।।
भोसकीला भाला कुशीला, लोट रक्ताचा वाहीला
नका छळू त्या लाडक्याला ।। ३ ।।
प्राण अर्पी जग ताराया श्रेष्ठ असूनी नीच झाला
दोष जगामधे न त्याला ।। ४ ।।





## ५७६. ख्रिस्त माझा तारणारा

ख्रिस्त माझा तारणारा चढविला क्रुसावर ।। धृ ।।
देव आहे तोच खरा जीवनी पाण्याचा झरा
दया करी आम्हावरी ।। १ ।।
सोशियले फटके भारी रक्त सांडी भूवरी
पापांची क्षमा करी ।। २ ।।
भाव ठेवा ख्रिस्तावर करा येशुचे गौरव
संकट तोचि निवारी ।। ३ ।।

## ५७७ अवघड बिकट वाट

अवघड बिकट वाट चढला ख्रिस्त झणी चढला
पडला खाली दुष्ट मारी लाथ ।। धृ ।।
अवघड खांब लांब ख्रिस्तापाठी, कवटी खांब
रक्त घाम टिपके थेंब, कासावीस होई ।। १ ।।
पाठीवरती घेउनी खांब ठोकीले तीन खिळे लांब
हाती पायी शिरी कंठ कासावीस होई ।। २ ।।
कासावीस जीव हा झाला तृष्णेने तो व्याकूळ झाला
पाणी द्या हो विव्हळोनी माझ्या देवा माझ्या देवा
जवळ मला घेई ।। ३ ।।

## ५७८. खांबी वधीले तुजला

खांबी वधिले तुजला हे गुरु स्वामी अपराधी तुझा मी ।। धृ ।।
करुनी कृपा दिला मजशी मानव जन्म
परि मोल न त्याचे बहू केला अधर्म
दुष्टाई अनितीचा अवलंबिला घर्म
ऐसा दुष्ट कृतीचा हा बाण मारिला वर्मी ।। १ ।।
असता तू देवपूत्र अती लीन जाहला
साहून प्राणांतिक दु:खा परी न डगमगला
दावियला कित्ता तू आम्हा पतिताला
दाविला पतितांशी मोक्षमार्ग स्वकर्मी ।। २ ।।





## ५७९. सोडीतांना प्राण खांबी

सोडीतांना प्राण खांबी शब्द वदला येशू सात
ज्यांच्यासाठी करी प्रार्थना त्यांनी केला त्याचा घात ।। धृ ।।
क्षमा करी बापा तू त्यांना बोल घुमला हा पहिला
नुमगे काही ह्या अज्ञाना
गुन्हा हातुनी हा घडला क्षमादान हे अग्रहाचे
मागे पित्याला घाली साद ।। १ ।।
खचित सांगे माझ्यासंगे स्वर्ग लोकी असशी रे
दोन चोरातील पश्चताप्या अक्षय देई वच् दुसरे
धाव एक ती प्रभुरायाची चोरटयाच्या देतो हात ।। २ ।।
शोकाकुल ही पाही माता खांबाजवळी रडतांना
तिसरा योहानाला शब्द वदला कन्हताना
माता तुझी ही सुपुत्रा तू माझ्यानंतर देशिल साथ ।। ३ ।।

## ५८०. कुशीवरी मारीयला भाला कुणीतरी

कुशीवरी मारीयला भाला कुणीतरी ।। धृ ।।
क्रूस खांब चढे कालवरी कोणी ना त्याची कदर करी
जिव्हारी मारीला भाला कुणीतरी ।। १ ।।
एलीया म्हणूनी गेलेत स्वर्गी कसा वरुनी खाली उतरी
कबरेची केली तयारी ।। २ ।।

## ५८१. क्रुसखांबी दिले

क्रुसखांबी दिले माझ्या प्रभुला क्रुसखांबी दिले माझ्या प्रभुला
गुन्हा त्याने काय हो केला ।। धृ ।।
प्रभू एक होता दयेचा रे सागर आम्हासाठी गेला तो क्रुसावर
माझ्या प्रभुचा घात का रे केला ।। १ ।।
पाणी पाणी प्रभू ओरडला आंब दिधली त्यास प्यावयाला
माझ्या प्रभुचा घात का रे केला ।। २ ।।





## ५८२. त्रिमूर्ती क्रुसावरती

त्रिमूर्ती क्रुसावरती दु:ख भोगती
मातेच्या हृदयात काटे टोचती ।। धृ ।।
तीस रुपयाला विकले प्रभुला दृष्टांच्या हाती दिले प्रभुला
माता प्रभुच्या मागे चाले ख्रिस्त पापाचा क्रुस वाहे
ख्रिस्त धर्म खरा हा आहे जगती ।। १ ।।
कालवरीचा डोंगर चढला म्हणती देवा अनर्थ घडला
ठेच लगोनी प्रभूजी पडला दु:खाचा हा इतिहास घडला
माता पिता प्रभूचे मागे चालती ।। २ ।।
चोर लुटारू बाजुस दोन्ही मध्ये प्रभुजी केवीलवानी
म्हणे त्यांस तो द्या हो पाणी कोरड पडली क्रुस वाहुनी
ख्रिस्ताचे मारेकारी भोवती नाचती ।। ३ ।।

## ५८३. प्रभो माझा टांगीला क्रुसावरी

प्रभो माझा टांगीला क्रुसावरी
दोष काय त्याचा (२) सांगा तरी ।। धृ ।।
माता मारीया रडे धाई धाई येशुचे दु:ख पाहवत नाही
रक्त वाहिले रे त्याचे, अमाप तरी ।। १ ।।
शास्त्री परूशी आणि यहुदी टपलेत त्याच्या जीवावरी
रक्त वाहिले त्याचे, या भुवरी ।। २ ।।
अति दु:खाने प्रभू तळमळी रक्त त्याचे भळभळा वाही
आपल्या पापासाठी त्याने, प्राण दिला क्रुसावरी ।। ३ ।।

## ५८४. क्रुस खांब वंदे निशाण

क्रुस खांब वंदे निशाण, सदैव भूषण रे
थयथय नाचू मिरवीत नेऊ, हे विश्वतारण रे ।। धृ ।।
किरीट काटेरी मार्ग दाखवी तो सत्य जीवन रे ऽऽऽ
त्या जीवनाने केली किमया, उंचावली मान रे ।। १ ।।
हाती पायी खिळे आज रे घातक प्रीतीचे
जगद्ोद्धारा दिली आहुती अमर मरण रे ।। २ ।।





रूधिराच्या गळती धारा उगम प्रेमाचा
त्या प्रेमाने दिधले आम्हाला, महान तारण रे ।। ३ ।।
कालवरीचे शापित स्थान, भयाण स्मशान रे
तीर्थासम ते पवित्र झाले, गा विजयी गान रे ।। ४ ।।

## ५८५. प्रभू येशू माझा क्रुसावरी खिळे

प्रभू येशू माझा क्रुसावरी खिळे, तया शिक्षा ही मिळे
अहो माझ्या पापामुळे ।। धृ ।।
तो मुकूट काटयांचा घातिला शिरावरी
ते फटके चाबकाचे मारिती अंगावरी
रक्त शरीरातुनी टप टप गळे
तया शिक्षा ही मिळे, अहो **...** ।। १ ।।
क्रुसाचे भारी ओझे, घेउनी खांद्यावरी
चढला अतिश्रमाने डोंगर तो कालवरी
हातापायाला ठोकीयले ते खिळे
तया शिक्षा ही मिळे, अहो ।। २ ।।
साहिला माझ्यासाठी, किती तो अपमान
मजसाठी क्रुसावरी, अर्पिला त्याने प्राण
जगाला हे कळे अहो माझ्या **......**।। ३ ।।

## ५८६. कोकरा वधिले

कोकरा वधिले अपराधाविन क्रुस खांबावर ।। धृ।।
शिरी तयाच्या मुगूट घालुनी तोंडावर थुंकले
पाठीवरती फटके मारुनी घायाळ प्रभुला केले ।। १।।
कालवरी म्हटलेल्या प्रभुला डोंगरावरी नेले
क्रुसावरती त्यास निजविले हाती पायी खिळे ठोकले ।। २।।
कुशी तयाच्या भाला भोसकुनी पाणी रक्त वाहिले
सर्व जगाची खंडणी भरुनी मरणात विजयी जहाले
मृत्युत विजयी झाले मृत्युत विजयी झाले।। ३।।





### ५८७. कालवरीच्या डोंगरावरी

कालवरीच्या डोंगरावरी दिसते दृष्य भयान
क्रुसी खिळलेला ख्रिस्त महान ।। धृ ।।
चोर लटकती बाजूस दोन्ही मध्ये प्रभुजी निरापराधी
क्रूस फलक तो झळके वरती यहुदी राज्य महान ।। १ ।।
नसता दोषी खिळीले त्याते तुमच्या आमच्या स्वप्नी नव्हते
शास्त्र वचन ते झाले पुरते उज्वल होईल काळ ।। २ ।।
या पतितांनो झडकरी येथे उधडुनी नयना प्रभू पाहा ते
सुख निद्रा ही लागली कैशी होईल पुनरुत्थान ।। ३ ।।

### ५८८. क्रुसी जो गेला

क्रुसी जो गेला प्रभू कालवरी घेउनी पतितांचे अध शिरी ।। धृ ।।
रक्त जयाचे जरी वाहिले मरणातुनी ते उठते झाले
पतितांच्या साठी ते दिधले हो हो किती दु:ख साहिले ।। १ ।।
कुशी भाला ते किती खोसी ते मार मस्तकी फटक्यांचा ते
किती द:ुख साहिले ।। २ ।।
मुगूट काटेरी खिळे कुऱ्हाडी लोंबे क्रुसाशी येशू प्रतापी
पुनरुत्थीत झाली थडगी ।। ३ ।।

### ५८९. अडवूनी ख्रिस्त प्रभूला

अडवूनी ख्रिस्त प्रभूला माझ्या खांबी टांगला
क्रुस खांबी टांगला
वाहुनी भार पतिता मार्ग दाविला ।। धृ ।।
भर तारुण्य असुनी तयाला आवरी नित्य मोहाला
कधी नच विसरे इशभक्तीला श्रमवी नित्य जिवाला ।। १ ।।
स्वकीय जनाने अव्हेरीला त्राण नसे अवनीला
गेत्समनी विनवी पित्याला प्राण ही तव चरणाला ।। २ ।।

### ५९०. श्वास रोखुनी

श्वास रोखुनी मातेस म्हटला, आई तुझा हा बाळ
योहाना मातेला सांभाळ ।। धृ ।।





सुख–दु:खाची ऊन सावली त्या बाळाने अवचित नेली
धर्मद्रोही आणि दुष्ट श्वापदा यहुदा चांडाळ ।। १ ।।
तलवारीवर ठेवून मान वैऱ्यास बोले तो प्रेमाने
स्वधर्माचा घास मुखातच राहीला तात्काळ ।। २ ।।
भक्तगणांचा जमला मेळा क्रुसाभोवती होउनी गोळा
दृष्य अचानक बघुनी नयनी हृदयी होतो जाळ
येशील जेव्हा न्याय कराया
तेव्हा ध्यानी धरा प्रभुवरा आठवण माझी करा ।। ३ ।।

## ५९१. आत्मा तुझ्या हाती देतो रे

आत्मा देतो रे तूझ्या हाती देतो ।। धृ ।।
काय करीती समजत नाही त्यांचे त्यांना उमजत नाही
जरा पाही तुज विनवितो ।। १ ।।
माझ्या देवा धोर तू व्हावा का तू माझा त्याग करावा
वाहू लागला घाम रक्ताचा पूर ।। २ ।।
लागे तहान जीव व्याकुळला पाजा पाणी कोणी तरी मजला
आंब घेउनी तझ्या जवळी येतो ।। ३ ।।
ओरडोनी आज वंदीले कार्य माझे पूर्ण जहाले
सरले ते काम आज तूझ्या जवळी येतो ।। ४ ।।

## ५९२. देवा माझ्या देवा

(संदर्भ मार्क १५: ३२ – ४७)
देवा माझ्या माझ्या देवा त्याग का माझा केला
त्रिलोकी आरोळी मारुनी बोलला ।। धृ ।।
तास सहावा नववा संपला देशभर अंधार पडला
हाक मारीली ऐकियेली, स्पर्श आंबेने भरीता ।। १ ।।
पडदा वर खाली दुंभगला ओरडून मोठयाने प्राण सोडिला
खरोखर देवाचा पुत्र स्त्रियांनी पाहिला ।। २ ।।
माग्दाली, याकोब ती मारीया योसेफाची आई हो मारीया
मार्ककृत अध्याय असे हा पंधरा संपला ।। ३ ।।





## ५९३. बोले येशू क्रुसी केविलवानी

बोले येशू क्रुसी केविलवानी द्या हो कोणी मज पिण्यास पाणी ।। ध ।।
शिरी घातिला मुकूट काटेरी मारीती फटके दु ट त्यावरी
रक्ताने गेला देह थबथबुनी वाहे दुःखाश्रू पाणी त्या नयनी ।। १।।
पाण्याविना गेला कंठ सुकूनी, परी देईना पाणी त्या कोणी
आंबेचा प्याला पिण्यास देती नाकारी प्रभू त्या पाही आशेनी ।। २।।
दास म्हणे चला देऊ जाउनी शुद्ध आत्मारुपी तयास पाणी
घेई म त्युंजय बोले मुखानी या म्हणे तुम्हा देतो सुख या मरणी ।। ३।।

## ५९४. जरा हळूच उतरवा खाली

जरा हळूच उतरवा खाली, ख्रिस्ताची काया खिळलेली
स्तंभाशी धरुनी कवटाळी रडे मारीया धन्य माउली ।। ध ।।
तहानेने व्याकूळ झाला, प्रभू माझा असे भुकेला
हा भास धरी तो मनाला (२) बहुसंख्य पाही त्या दीनाला ।। १ ।।
देहाचा देह जिव्हाळा दूर अलग अचानक झाला
घडो सेवा अंतघडीला (२) पाहू दे भरून बा डोळा ।। २ ।।
जयकार ज्यांनी केला त्यांनीच प्रभू हा वधिला
कुशी भोसकूनी त्याच्या भाला (२) दुखविले आईच्या ममतेला ।। ३ ।।
नका करू त्याचे तुम्ही हाल सुटला न प्रभूचा तोल
कवटाळुनी क्रुसीया ती बोले मारियेची आर्त ती हाक ।। ४ ।।

## ५९५. उतरऊनी घेई

उतरऊनी घेई तुझे प्रेत खाली शरीर न्याहाळी तुझीच माता ।। धृ ।।
घेतले प्रेत तिने मांडीवरी दुःखी झाली माता कुमारी
चैन नसे हो अंतरी त्राता ।। १ ।।
उपकार तिने आम्हावरी केले जगतासाठी स्वपुत्रा दिले
सांगा ऐसी कोण माता प्रभू ख्रिस्ता तुझीच माता ।। २ ।।

## ५९६. प्रभू रे केलंस बलीदान

प्रभू रे केलंस रे बलीदान
आम्हा पाप्यासाठी अर्पिला प्राण ।। धृ ।।





स्वर्ग सोडूनी भुवरी आला, देव असूनी मानव झाला
झाला तुझा अपमान ।। १ ।।
क्रुस जडभारी तुझ्या खांद्यावरी मुकूट काटयांचा तुझ्या डोइवरी
हाती पायी खिळे ठोकिले, कुशीत भाल्याने भोसकिले
सोडिलास प्राण ।। २ ।।

## ५९७. ख्रिस्ताच्या पुनीत कार्याने

ख्रिस्ताच्या पुनीत कार्याने विश्‍व सारे लोपले
प्राण अर्पण करुनी साऱ्या पाप्या तारीले ।। धृ ।।
आंधळ्यासी डोळस करविले बहिऱ्या बोल ऐकवीले
करिले चमत्कार त्याने मृताशी उठविले ।। १ ।।
नानाविध हाती पायी ठोकी क्रुशी खिळे प्रीतीचे बोल बोले
करी क्षमा तू बापा यांची रे तयांना काही नच कळे ।। २ ।।
अंत क्लेश जरी अंतरी तळमळे गूढ बोल पूर्ण झाले
घे मम आत्म्या पित्या तुजकेड करी रे ताराण द्वार खुले ।। ३ ।।

## ५९८. ओळखिले पवित्र पित्याच्या प्रीतीला

ओळखिले पवित्र पित्याच्या मी प्रीतीला ओळखिले
माझिया ख्रिस्ताच्या मी कृतीला ओळखिले ।। धृ ।।
हे जग सारे तुझ्या शब्दाचे खेळ न दिधले मजला साचे
तुझ्या कृपेस्तव हेच जाणिले मोहमायेचे सृष्ट आवघे
सोडीले पार तयाला ।। १ ।।
माझ्यावर माझा नाही आधिकार कैसा मी उद्धार माझा करु
तूच निवडीले मज विश्‍व आधी झालो आपराघी कोणा सांगू
धाक असे माझ्या देहाला ।। २ ।।
तुझे आत्मदान देउनी त्वा केले सर्व प्राण्याहुन थोर मा ते
परी माझे लेणे नच दुष्टा साहे घात करू पाहे रात्रंदिन
तव पायी वसू दे मजला ।। ३ ।।





## ५९९. ख्रिस्त प्रीतीने

ख्रिस्त प्रीतीने तया जा काले वधस्तंभी मन माझे रमले ।। धृ ।।
भर उन्हाचा कोण तडाखा बसतो रोमी पाठीत तडाखा
रक्ताने त्या न्हाऊ घातले ।। १ ।।
पापाचे ओझे अवजड होते वहाण्या मज अवघड
ख्रिस्ताने ते वाहुनी नेले ।। २ ।।
मनुष्याच्या पुत्राने मरावे तिसऱ्या दिवशी पुन्हा उठावे
अगत्त्याचे पटवूनी दिले ।। ३ ।।
जसा बोलला तसाच उठला शब्द न त्याचा खोटा ठरला
अद्‌भुत अघटित जगती घडले ।। ४ ।।

## ६००. दुभंग झालं नातं प्रेमाचं

दुभंग झालं नातं प्रेमाचं दुभंग झालं नातं प्रेमाचं ।। धृ ।।
सेवा करण्या ईश्वराची मानव दोन विश्वासाची
सैतान सोडी साथ प्रेमात सैतान आला सर्प रुपानं ।। १ ।।
बारा शिष्यांमध्ये येशू ख्रिस्त गुरू शिष्यांमध्ये प्रेम नातं
यहूदाने केला घात प्रेमात ।। २ ।।
कोण कुणाचे आज जगात प्रचिती येई या जीवनात
दिसेना प्रेम कुणा कुणात दुभंग झालं नातं ।। ३ ।।

## ६०१. जगाच्या कल्याणा

जगाच्या कल्याणा ख्रिस्त येशू राणा
आला आला पापी जगा तारायाशी आला
प्रीती केली जगावरी प्राण देई कालवरी
राज्यदंड क्रुसधारी येशू चढे कालवरी ।। धृ ।।
ख्रिस्त येशू क्रुसाशी शांतपणे प्राण सोडी
जीवन आत ओढी नच हात पाय खोडी ।। १ ।।
प्राण जाता कलली मुंढी माता आली रडकोंडी
बेशुद्ध पडे उपवंडी ख्रिस्त होई कुरवंडी ।। २ ।।
सूर्या पहावेना दु:ख नभाआड लावी मुख
तव विश्व झाले गडप उलट होई भूमी कंप ।। ३ ।।





पडदा परम पवित्र स्थानी मध्येच गेला भंगूनी
स्वर्ग मार्ग खुला करूनी ख्रिस्त जाई स्वत: मरूनी ।। ४ ।।

## ६०२. ती महा ख्रिस्ताची दिव्य प्रीती

ती महा ख्रिस्ताची ही दिव्य प्रीती
सकल पतितांच्या करिता करी प्राणाची आहुती ।। धृ ।।
दोषी नसता दोषाविले दिले दुष्टाच्या हाती
हातापाया ठोकी खिळे स्तंभी ते त्या जखडीती ।। १ ।।
क्रुसी ठोकीता शब्द उच्चारी करी क्षमा तू बा यांची
करिता हे काय ते तयाशी नच समजे त्या ती कृती ।। २ ।।
तीन खिळयांवरी तनू लोंबतो वाही ऋणातुनी रूधिर ते
काढी धुवूनी पाप्यांची पापे करी शुद्ध आत्मा ज्योती ।। ३ ।।
सकल विश्वासाठी मेला पुनरुत्थानी गौरविला
करविले स्वर्ग द्वार खुले त्रय येशूने प्राणांती ।। ४ ।।

## ६०३. ख्रिस्त माझे प्रेम

ख्रिस्त माझे प्रेम खिळे क्रुसावरी खिळे हाता पाया आरपार ।। धृ ।।
शिरी घालुनिया मुकूट काटेरी वळ अंगावरी चाबकाचे चाबकाचे ।। १ ।।
केले बलिदान मज उद्धाराया जातो ख्रिस्त पाया
शरण मी शरण मी ।। २ ।।

## ६०४. मारीयाबाई चाल घरी

मारीयाबाई चाल घरी तुझ्या बाळाची गत आज नाही बरी ।। धृ ।।
दुष्ट यहुदाने धरून दिधले चाहूबाजूनी त्याला वेढिले
तुला सांगू मी कोठवरी तुझ्या बाळाची ...।। १ ।।
शिरी काट्यांचा मुकूट घातीला वेत मस्तकी त्याच्या मारिला
रक्त वाहिले भूमीवरी तुझ्या बाळाची... ।। २ ।।
बाजूस वधिले दोन लुटारू मध्यभागी प्रिय कोकरू
तुला सांगू मी कोठवरी तुझ्या बाळाची ।। ३ ।।





## **६०५. स्तंभी विव्हळे ग बाळ माझा देखणा**

स्तंभी विव्हळे ग बाळ माझा देखणा
हाल या जीवाचे माझ्या सांगू कुणा ।। धृ ।।
मारिती फटक्यांचा मार अवघ्या शरीरी
मुकूट काट्यांचा कैसा रोविला शिरी
हातीपायी खिळे रक्त भूवरी गळे
छी थू करिती गुन्हा नसता विनवी पुन्हा ।। १ ।।
भोसकती भाला कुशीत जीव तळमळे
लागली तहान त्याला पाणी ना मिळे
दु:ख अनावर साही तो असा
उच्च स्वरे विनवी तो पुन्हा पुन्हा ।। २ ।।
लांडग्यांनो सोडा सोडा माझ्या पाडसा
आत्याचार त्याजवरी व्यर्थ तो कसा
कुणा ना दु:खविले दुखितास हसविले
सौख्य शांती लाभली त्यापासूनी दीनां ।। ३ ।।

## **६०६. बोल प्रभू तू बोलत का नाही**

बोल प्रभू तू बोलत का नाही
धरुनी क्रुसाला रडे मारियाबाई ।। धृ ।।
प्रभू देव माझा कुठे शोधू आता
रडे ऐसे म्हणोनी ती वेडी माता
आईच्या जीवाची होई लाही लाही ।। १ ।।
हाती पायी खिळे कोणी ठोकीले
उघड्या अंगावरी घाव कोणी घातीले
आईच्या जीवाची होई लाही लाही ।। २ ।।
प्रभुला पाहून माता खिन्न मनी
आईच्या जीवाची होई लाही लाही ।। ३ ।।

## **६०७. माझ्या प्रिय येशूबाळा**

माझ्या प्रिय येशूबाळा का झालास वेगळा
तीन खिळयांवर देह टांगलेला ।। धृ ।।





हाती पायी खिळे खोलवर हातोड्याचा मार
घळ घळ रक्त वाहे काय तयाचे हाल
कुशी भाला भोसकला वेत मस्तकी मारीला ।। १ ।।
प्रार्थना करी प्रभू परमेश्वारापाशी क्षमा कर
बापा यांना नको धरू दोषी
काही कळत नाही त्यांना आपण काय करतो ।। २ ।।

## ६०८. कुऱ्हाडी खिळे प्रभू हाती पायी

कुऱ्हाडी खिळे प्रभू हाती पायी
अमोल रक्त भळ भळा वाही माता रडे धायी धायी
मारिया माता रडे धायी धायी ।। धृ ।।
प्रत्येक क्षणी प्रभू कळवळे जीव तळमळे आम्हा पाप्यांमुळे
प्राण प्रभुजीचा व्याकूळ होई ।। १ ।।
गाय वासराची जशी ताटातूट होई
तशी ख्रिस्त मातेची ताटातूट होई
हंबरडा फोडूनी म्हणे आई आई ।। २ ।।

## ६०९. दु:खाचे डोंगर

दु:खाचे डोंगर कोसळे अंधकार पडला
पतितांच्या या जीवन दीपाला दुष्टाने विझविला ।। धृ ।।
शोकाकूल ही झाली जनता दु:ख सीमा नच मारीया माता
पाहून खिळलेला पाहून खिळलेला ।। १ ।।
दृष्य पाहूनी प्रभू तारणाचे झाले पाणी पाषाणाचे
कंप ही धरणीला कंप ही धरणीला ।। २ ।।
त्रैक्यरुपी तू असशी देवा पतितांसाठी येशू व्हावा
श्रद्धांजली तुजला श्रद्धांजली तुजला ।। ३ ।।

## ६१०. मारिला ग ख्रिस्त बाई ठार

मारिला ग ख्रिस्त बाई ठार काढुनी रक्ताची धार ।। धृ ।।





चाबकाचा मार दिला जड क्रुस पाठी दिला
भूक तान्हेने व्याकूळ झाला साहेना प्रभूला तो भार ।। १ ।।
हाती पायी खिळे ठोकीले जीव प्रभूचा अंती तळमळे
पाहुनिया दु:ख माता बहु हळहळे गेले खिळे आरपार ।। २ ।।
तीन खिळी प्रभू देह टांगला घाम रक्ताचा तो वाहीला
जीवंत का मेला प्रभू पाहिला गेला भाला आरपार ।। ३ ।।

### ६११. अरे देवराया लागतो मी पाया

अरे देवराया लागतो मी पाया दीन दासाची विनंती ऐकूनी घे
माझ्या ख्रिस्ताची प्रीत मला कळू दे ।। धृ ।।
पापे माझी किती भयंकर त्या पापाने झालो शिरजोर
मोहाचा बाग नाही आली जाग
त्याच्या रक्त—घामाची कीव मला येऊ दे ।। १ ।।
पाप ओझ्याने गेलो थकूनी आला माझ्याकडे तो चालूनी
मला मारी हाका म्हणे झोपला का
माझ्या डोळयाची झापड जाऊ दे ।। २ ।।
मोठेपणाची धुंदी ही चढली दुर्गुणांची फौज बोलवली
दिला क्रूस जड रस्ता अवघड
त्थाच्या पायांची कीव मला येऊ दे ।। ३ ।।
असा निष्ठूर रे घातकी दुष्ट चांगला नाही पातकी
असा असोनिया गेला कालवरी
म्हणे बापाला त्यांची क्षमा होऊ दे ।। ४ ।।

### ६१२. हा पतितांचा वाली

हा पतितांचा वाली धनिकांच्या सत्तेसाठी
नेवूनिया पहाडावरती त्यांनी मारीला ।। धृ ।।
त्या इसवीसना पूर्वी हो गेली आणि मेली
नच गेली घेवूनी दंड पतितांच्या पापासाठी
परी गेला पुनरुत्थानी
हा एकच प्रभू ख्रिस्त त्याने वाहीला ।। १ ।।





सैतानाची उडवी राशी शेवटल्या तीन ताशी
तीन दिवस आणि रात्री प्राण सर्वस्व रोखूनी
धाडी दिव्य दृष्टी वरुनी परमप्रिय पुत्र त्याने उठविला ।। २ ।।
पडो देह खर्ची माझा त्या ख्रिस्ताच्या सेवेला
लागो ध्यास हा मजला त्याच्या पवित्र त्या प्रीतिचा
करी दुष्टा पार दूर दयाघन हा पुत्र
ठेवा त्याने धाडीला ।। ३ ।।

## ६१३. प्रभूजीला माहीत होते

प्रभूजीला माहीत होते स्वत:चे मरण
नाही माहीत कुणाला कुणाचे मरण,
प्रभूजीला माहीत होते स्वत:चे मरण ।। धृ ।।
राव असो की रंक असो रे चुकले नाही मरण कुणा रे
होई येशू करवी जगाचे तारण ।। १ ।।
प्रभूजी बोले आपल्या शिष्याला
तुम्हापैकी कोणी एक धरील मजला
विश्वासाने कापे गळा घेई चुंबन ।। २ ।।
तुम्ही आम्ही पापात मराल
मनुष्याच्या पुत्राला उंच कराल
ज्याने मला पाठविले राही त्याची शान ।। ३ ।।

## ६१४. निशाण फडफडते डौलाने

निशाण फडफडते डौलाने माथ्यावरी रे
कालवरी, कालवरी ।। धृ ।।
पिलाताच्या वाड्यावरती मध्यरात्रीच्या तासाला
न्याय पारडे फिरले उलटे सोडविले बारब्बाला
सोडविले बारबाला
क्रुसाच्या वाटेवरी मानाचा पान करी रे ।। १ ।।
झगा चढविला कैद्याचा तो मुकूट शिरी काटेरी
शोकाने तो वदला प्रभुजी देव ह्यांना माफ करी
देव ह्यांना माफ करी





मृतात विजयी आहे, मृतात विजयी आहे
मानाचा मानकरी कालवरी ।। २ ।।

## ६१५. हे दु:ख कैसे कुणास सांगू

हे दु:ख कैसे कुणास सांगू बघुनी येशू क्रुसी स्वयंभू ।। धृ ।।
देउनी स्कंधी क्रुस प्रभुच्या मागे पुढती धुंडी गुरांच्या
क्षमेची भिक्षा कुणास मागू ।। १ ।।
आकाश पृथ्वी उग्र ऐसी टपुनी बसली प्रभू पदाशी
पतित त्राता कुणास सांगू ।। २ ।।
आकाशाची कुऱ्हाड आली मम लडिवाळा कशी कोसळली
असह्य दु:ख कसे मी साहू ।। ३ ।।

## ६१६. हे आमच्या शाश्वत पित्या

हे आमच्या शाश्वत पित्या करी विनम्र प्रार्थना तुझिया
हा कठीण दु:खाचा प्याला टळू दे रे क्रुस तो सदया ।। धृ ।।
घडणारे दु:ख उद्याचे ते चित्र भयान दु:खाचे
अवघड ओझे क्रुसाचे आणि अंतर कालवरीचे
व्याकूळ प्रभुजी झाला गेला गेत्समनी बागेला
गुडघे टेकून धरणीला मारी हाक स्वर्गी पित्याला ।। १ ।।
जणू अग्नी परीक्षा घ्यावी, पक्षाची पंख छाटावी
बरब्बाला सोडूनी संन्याशा शिक्षा व्हावी
हा न्याय असे अन्याय भय कंपीत होते हृदय
महात्मा दीन दुबळयांचा करी अखेर धावा प्रभुचा ।। ३ ।।
धाक मरणाचा वाहीला झगा ओला चिंब झाला
देव तेथे प्रगटला देतो शक्ती देवपुत्राला
त्या क्रुसाच्या वाटेचे रहस्य चौदा स्थानाचे
दुखाश्रुंच्या नेत्राने दास लिहितो चरित्र ख्रिस्ताचे ।। ३ ।।

## ६१७. तुझ्या रक्ताने

तुझ्या रक्ताने हे प्रभे ख्रिस्ता माझे तारण झाले आता ।। धृ ।।





अवजड ओझे क्रुस खांबाचे घेवूनिया चाले आम्हा पापांचे
ठेच लागुनी खाली पडला ।। १ ।।
दुष्ट शिपायांनी मारीले फटके, डोक्यात रुतले खोलवर काटे
भाला खोसताना पाही तव माता ।। २ ।।
अर्पियली क्रुसावरी काया तूच केलीस आम्हावरी माया
तव चरणी मी नमतो ।। ३ ।।

## ६१८. धरीला राजा येहूद्यांचा

(संदर्भ लूक २३: १० – १३)
धरीला राजा येहूद्यांचा थोर
पिलात करितो विचार उभा हेरोदासमोर
हेरोदाला संतोष झाला पाहण्या मिळेल का चमत्कार मजला
प्रश्न विचारी तो येशुला उत्तर नाही दिले तयाला ।। १ ।।
मुख्य याजक आणि उभे शास्त्री हर्षाने ते आरोप करीती
शिपाई धिक्कारती त्याला वस्त्र झगमगी चढविले त्याला ।। २ ।।
पिलाताकडे पुन्हा पाठविले त्याला हेरोद मित्र मानी पिलाताला
अध्याय २३ वचन १०–१३ संपला
संन लूक हे भाग्य आम्हाला ।। ३ ।।

## ६१९. घेतला शिरी तू अमुचा सर्व पाप भार

घेतला शिरी तू अमुचा सर्व पाप भार
थोर किती असता प्रभुजी तुझे उपकार ।। धृ ।।
टाकुनिया स्वर्गाचे सुख अविलाशी
आम्हा दुष्ट पातक्यांना धरीले उराशी
असा तू दयाळू केले प्रेम हे आपार ।। १ ।।
सोसुनिया सर्व दु:ख छळ अगणित
तारीले तू प्राण देऊन जगाला खचित
पुत्र कन्या म्हणण्याचा दिलास अधिकार ।। २ ।।
अजुनी आम्ही तुज पुढती अयोग्य अपात्र
तरी तू लाविलीस माया तोडिले ना मात्र
सर्वदा तुझा दीन दुबळया लाभला आधार ।। ३ ।।





### ६२०. माझ्याच पायी दु:ख हे साही

माझ्याच पायी दु:ख हे साही
क्रुस हा खांदी घेई प्रभू चालत राही ।। धृ ।।
कावेखोरांनी कावा हो केला कोकरा जणू जाळयात आला
दोष ना काही त्याच्या ठायी माराया फटके देई ।। १ ।।
ठोका खिळूनी त्याला क्रुसाला जीवे मारा त्याला आवाज आला
क्रूस हा मोठा काटयांचा फाटा घातला प्रभुच्या डोई ।। २ ।।
वेदनाने प्रभू व्याकूळ झाला कालवरी चढ चढेना त्याला
अंधारी येई दिसेना काही
क्रूस हा खांदी घेई प्रभू चालत राही ।। ३ ।।
शिमोनासह होउनी आज दास तू रे राखी प्रभुची लाज
प्रभुजी तोच सुखाने कसे प्रभुजी दुरूनी पाही ।। ४ ।।

### ६२१. ख्रिस्त जीवनाचे सार

ख्रिस्त जीवनाचे सार पैशावरी का विकणार
ऐसा मानवाचा धर्म शाप तयाला ठरणार ।। धृ ।।
वल्हांडणसणादिनी, शिष्य बसले भोजनी
स्तुती करती ती त्यांची ख्रिस्त बसे मध्यभागी
घास प्रीतीचा हा भरविला तोच शिष्य ठरविणार ।। १ ।।
यहुदा हा अविचारी, गेला परूश्यांच्या दारी
तीस रुपयांच्यासाठी, ख्रिस्त विकला त्यांच्या ठायी
नको नको ऐसी बुद्धी, मना करु अविचार ।। २ ।।
गर्भात मारतो तुझे, तुच केला तुझा घात
ऐसा क्रोध होई देवाचा, तया प्रभू तारणार
होतो कधी परत पापी तया कोण आडवणार
होता कधी पश्चतापी तया प्रभू तारणार ।।३।।

### ६२२. जखमी करूनी मजला

जखमी करूनी मजला तुज काय रे मिळाले
तू वेचिले फुलांना काटे मला मिळाले ।। धृ ।।





हाती पायी खोल माझ्या रुतले खिळे दुधारी
तू रोगमुक्त झाला, फटके मला मिळाले ।। १ ।।
रुतला कुशीत भाला छळतात वेदना या
तुला सावली दिली मी चटके मला मिळाले
पाहून येशू तुजला धिक्करिले जगाने ।। २ ।।

## ६२३. तू त्यागमूर्त ख्रिस्ता

तू त्यागमूर्ती ख्रिस्ता, आम्ही बेईमान सारे
आपुल्या शिरी पापांचे तू घेतलेस भारे ।। धृ ।।
केलीस रोज चिंता, पापी खुळ्या जनांची,
रडलास कैक वेळां, बघुनी दशा तयांची
केलेस चंदनाचे ख्रिस्ता उभे तू ढिगारे ।। १ ।।
तू शोधीलेस आम्हा, रानावनात ख्रिस्ता
संगोपिलेस प्रेम, खस्तुनी फार खस्ता
उंचाविलेस हाती धरूनी अशा खिलारे ।। २ ।।
तू खांब पाहुनिया टाकिलेस उसासे
सोशियलेस ख्रिस्ता, ते दुःख सांगू कैसे
तू दाविलास पतिता, आपुला पथ भला रे ।। ३ ।।
तू आम्र प्राषुनिया, दिधले जगास पाणी,
फटके ही साहुनिया वदलास गोडवाणी
दिधलास तारणाचा, आम्हास तू झरा रे ।। ४ ।।
हाती खिळे कुऱ्हाडी, पायात खोल शिरले
तैसा कुशीत भाला, हृदये शरीर नहाले
सुख शांती प्रीती यांची केलीस खुली द्वारे ।। ५ ।।

## ६२४. रात्री स्वप्नात ख्रिस्त

रात्री स्वप्नात ख्रिस्त माझ्या आला
का रे सोडा म्हणे पाप्याला ।। धृ ।।
झोपेतूनी जागा झालो विचार करितो मनाला
किती पापी मी भ्रष्ट मुख दावू कोणाला ।। १ ।।





तोच तू रे शरण गेला माझ्या प्रिय येशुला
हाय पापाचा त्याग रे मी केला ।। २ ।।

### ६२५. ख्रिस्ता तुझ्या स्मृतीने

ख्रिस्ता तुझ्या स्मृतीने डोळ्यात आज पाणी
सांगू कशी जगाला तव प्रीतिची कहाणी ।। धृ ।।
अपराध मीच केला शिक्षा तुला मिळाली
फटके तुझ्या शरिरी मुक्ती मला मिळाली
नकारिले तुला त्या आप्तातल्या जनांनी ।। १ ।।
यहुद्यांचा तूची राजा कंटकी मुकूटधारी
हाती पायी तुझ्या रे रुतले खिळे दुधारी
तव हाल पाहुनी येते डोळयात पाणी ।। २ ।।
देवाची योजना ही स्तंभी तुला बघावे
पतितांच्या पातकांचे ओझे शिरी लादावे
तव हाल पाहुनी येते डोळयात पाणी ।। ३ ।।

### ६२६. बांधू कशा कळे ना

बांधू कशा कळे ना जखमा तुझ्या देहाच्या
खिळुनी तुला क्रुसाला केल्या खुणा कायमच्या ।। धृ ।।
मी कठोर काळजाचा, वैरी तुझ्या जीवाचा
काटे कसे पसरले वाटेवरी सुखाच्या ।। १ ।।
दुर्गंध काढुनी तू दिला फुलांस गंध
धुदीत मी विसरलो गोष्टी तुझ्या प्रीतिच्या ।। २ ।।
तुझे हाल हाल केले परी शांत राहीला तू
तू सोशिल्या दुपारी झळा किती उन्हाच्या ।। ३ ।।
भरली अजब जादू शास्त्रामध्ये तुझ्या रे
येतो बहरुन जीव तो जीवनात मानवाच्या ।। ४ ।।

### ६२७. अलींगुनिया प्रेमे प्रभुने क्रुस यातनाचा

अलींगुनिया प्रेमे प्रभुने क्रुस यातनाचा
असा लीन झाला जगती पुत्र हा प्रभुचा ।। धृ ।।





ख्रिस्त स्वर्गवासी झाले अंती या जगात
असे व्यर्थ आहे जगती विश्व नाशवंत
खेळ चालतो हा जगती नेम हा जगाचा ।। १ ।।
तुम्ही भेटता स्वामी मम जीवनात
भक्ती भाव तुमचा माझ्या जपतो मनात
देव तुला स्वर्गलोकी सर्व मानवाचा ।। २ ।।
हिच एक धरुनी आशा व्हावी तुझी भेट
पूर्ण जाहली ही मनिषा उजळे पहाट
भाग्यवंत झाले स्मरुनी मार्ग हा क्रुसाचा ।। ३ ।।

## ६२८. दु:खाचे डोंगर कोसळले

दु:खाचे डोंगर कोसळले अंधकार पडला
पतितांच्या या जीवन दिपाला दुष्टाने विझविला ।। धृ ।।
शोकाकुल ही झाली जनता
दु:खी मानस मारीयामाता पाहुनी खिळलेला ।। १ ।।
दृश्य पाहुनी प्रभो मरणाचे झाले पाणी पापन्यांचे
कंप ही धरनीला ।। २ ।।
त्रैक्य रुपी तू असशी देवा पतितासाठी तू येशू व्हावा
श्रद्धांजली तुजला ।। ३ ।।

## ६२९. ख्रिस्त आमचा कैवारी

ख्रिस्त आमचा आहे कैवारी प्रीत केली जगावरी
वहातो क्रुस हा खांद्यावरी क्रुस खांब हा भारी
घेऊन जातो त्या कालवरी आला सिमोन त्याच क्षणाला
ख्रिस्तास मदत करी ।। १ ।।
घामाने प्रभू चिंब ही झाला क्रुस ओझ्याने व्याकूळ झाला
पाणी द्या हो कुणी मजला आंब देण्याची केली तयारी ।। २ ।।
यहुद्याने केली तयारी प्रभू दिधला क्रुस खांबावरी
बापा म्हणूनी दिली आरोळी प्राण दिला क्रुसावरी ।। ३ ।।





## ६३०. वाहुनी क्रुसखांबावरी

वाहुनी क्रुसखांबावरी प्रभुवरा केलीस प्रीती खरी ॥ धृ ॥
जगी जिविताचे जीवन जाणिले
जगतासाठी तनू वाहिले या जगताने तुला दोषिले
स्वाधीन केले त्वरी ॥ १ ॥
सत्य जीवन तू झरा जगाला लागे तृषा तव स्पंज प्याला
बोल अखेरला अंत घडिला घे बापा मज वरी ॥ २ ॥
ध्यानी नरा एकदा जायचे वर्तन ठेवा शुद्ध मनाचे
या दासाचे तत्व भल्याचे स्वर्गीय वाटेकरी ॥ ३ ॥

## ६३१. रक्ताचा घाम गळे

रक्ताचा घाम गळे हो पातक्यांच्या पापामुळे ॥ धृ ॥
प्रीतीच्या चुंबनाने हा घात केला
यहुदाने येशुला धरून दिले
शास्त्री परुशांना आनंद झाला
अंत:करण जळे हो ॥ १ ॥
लाडक्याला कोणी माझ्या सोडा सोडा हो
व्याकूळ झालं बाळ पाणी तरी द्या हो
मातेच्या हृदयाचा ठाव सुटला हो
पेत्रस दूर पळे हो ॥ २ ॥

## ६३२. दोषी ठरविला

अन्याय नसता दोषी ठरविला, केला आरोप ख्रिस्तावर
कसा निर्दोष येशू धरून खिळला कालवारी क्रुसावर ॥ धृ ॥
येशू मंदिरामध्ये गेला शास्त्री परूशी प्रश्न विचारती त्याला
ज्ञान दिले कोणी तयाला केला कावा येशूवर ॥ १ ॥
वलांडणाचा सण हा आला भोजन घेण्या माडीवर गेला
येहुदाच्या मनी सैतान शिरला घेतले चुबन वाटेवर ॥ २ ॥
भूमिवरती अंधार पडला पवित्र स्थानाचा पडदा दुभंगला
चढला येहुदा फासावर (२) ॥ ३ ॥





## ६३३. तुझ्या मरणाने

तुझ्या मरणाने पापाचे झाले उच्चाटन पापाचे ।। धृ ।।
तुझ्या मरणाने संतांची उत्पत्ती धर्माची प्रगती झाली ख्रिस्ता ।। १ ।।
तुझ्या मरणाने क्रांतीचा, प्रीतीचा संगम किती गोड ।। २ ।।
तुझ्या मरणाने धर्माची पूर्तता सारी अपूर्णता नष्ट झाली ।। ३ ।।

## ६३४. तुझ्या रक्ताने हे प्रभू ख्रिस्ता

तुझ्या रक्ताने हे प्रभू ख्रिस्ता
माझे तारण झाले आता ।। धृ ।।
आर्पिली क्रुसावर काया तू आगाध केलीस माया
किती गाऊ तुझे गूण नाथा (२) ।। १ ।।
घडले दर्शन ते प्रीतीचे कालवरीच्या क्रुस खांबाचे
तू प्राण दिला दीन नाथा (२) ।। २ ।।
आजवरिया जगती नाही केली कोणी खरी प्रीती
तव चरणी नमवितो माथा (२) ।। ३ ।।

## ६३५. ख्रिस्त माझा तारणारा

ख्रिस्त माझा तारणारा चढविला क्रुसावर ।। धृ ।।
देव आहे तोच खरा जीवनी पाण्याचा झरा
दया करी आम्हावरी ।। १ ।।
सोशियले फटके भारी रक्त सांडी भूवरी
पापांची क्षमा करी ।। २ ।।
भाव ठेवा ख्रिस्तावर करा येशुचे गौरव
संकट तोचि निवारी ।। ३ ।।

## ६३६. माती असशी

माती असशी सुवर्ण होशी भितोस का मरणा
स्पर्श कर पवित्र प्रभू चरणा ।। धृ ।।
लोट स्वदेहा स्वर्गी गेला तैसा एलिया निष्कलंक झाला





मर्त्य अमर जाणा जय जय येशू ख्रिस्त जाणा ।। १।।
अमरत्वाचा प्राशुनी प्याला धन्य प्रभुने सजीव केला
हालती हाडे स्मशाना जुळती आपोआप सांध्यांना ।। २।।

# ख्रिस्ताचे पुनरुत्थान

## ६३७. कैसाराचा कडक पहारा

(संदर्भ: मत्तय :२७—६६)
कैसाराचा कडक पहारा दिसतो भवती महान
ढकला कबरेवरचा पाषाण ।। धृ ।।
कोणी घडविला कोणास ठावे कोणी बसविला कुणास न कळे
क्षणात कळले आत निजले भगवान ।। १ ।।
नि:शब्द शांती अवती भवती गार झोपले शूर शिपाई
जा सांगा जा जगास पटवा प्रभूचे पुनरुत्थान ।। २ ।।

## ६३८. माळी दादा रे

माझ्या प्रभूला ठेविले कोठे
माळी दादा रे माळी दादा ।। धृ ।।
क्रूर जनांनी त्याला मारियले ह्या थडग्यात त्याला ठेवियले
काल शब्बाथी येणे नाही झाले झाले ।। १ ।।
पाहू गेले रे थडग्यामधी जेव्हा प्रेत वस्त्रे व दूत होते तेव्हा
प्रिय माझा तारक नेला केव्ही केव्हा ।। २ ।।
दिव्यगौरव सोडूनी आला श्रेष्ठ असूनी फार नीच झाला
प्राण अर्पिला जन तारायाला ।। ३ ।।
मोठया पहाटे उठले मी आज आले करुनी सारे कामकाज
कधी भेटेल माझा महाराज ।। ४ ।।
तेल सुगंधी आणिले भाऊ आता कोणाला लावायला जाऊ
सांग त्याला मी कोणाकडे पाहू पाहू ।। ५ ।।
आता सदगुरुविणा सारे कडू कोण उद्धारी कोणाआड दडू





डोळे माझे शिणले रडू रडू ।। ६ ।।
माळी बोले का रडतेस बाई कोणा शेधिशी फार घाई घाई
मारीया बोले मी करु गत काई काई ।। ७ ।।
तेव्हा माळी बोलला अगे मारीया मारीया ओळखीती म्हणे गुरुवर्या
भेट होताच म्हणे जा मारीया मारीया ।। ८ ।।
प्रभू अग्रह प्रितीभाव पाही देई आम्हास भेट लवलाही
आशा शोधात मन माझे राही राही ।। ९ ।।

**६३९ ख्रिस्त ख्रिस्त म्हणोनी**

ख्रिस्त ख्रिस्त म्हणोनी मी झाले बावरी
प्रेत चोरुन नेले हो कोणीतरी ।। धृ ।।
पहाटेच आले तुला भेटण्याला
हे भाग्य नव्हते का या भगिनीला
फिरे दाही दिशा रडे बावरी ।। १ ।।
या कबरेचा धोंडा कोणी काढला
माझ्या राजाला बाहेर कोणी ओढिला
रडे माग्दालीना ती वेड्या परी ।। २ ।।
अशी बावरी होऊ नको मारीया
पराकोटीला जाईल तुझी ही माया
सांग शिष्यजना तू सुवार्ता खरी ।। ३ ।।

**६४०. जा शिष्यांना जाऊनी सांगा रे**

जा जा जा शिष्यांना जाऊनी सांगा रे
प्रभू मरणाला जिंकुनी आला रे ।। धृ ।।
मार्था मारीया गेल्या पाहाया
भिऊ लागल्या भयभित झाल्या
शिष्यांना जाऊनी सांगा रे ।। १ ।।
तेल सुगंधीत आणिले रे भाऊ
आता कोणाला लावयाला जाऊ
शिष्यांना जाऊनी सांगा रे ।। २ ।।





## ६४१. प्रभू उठला

प्रभू उठला प्रभू उठला
तुझ्या आधी गालीलात पाहा चालला ।। धृ ।।
ते घेऊन आली मारियाबाई
दूतास पाहुनी थक्कच होई
पाहिला दूत कबरेत पूढे चालला ।। १ ।।
आठवड्याच्या पहिल्या दिवशी
संध्याकाळी भितीमुळे दारे बंद केली
प्रभू तेथे उभा राहिला ।। २ ।।
प्रभुजी म्हणाले तुम्हा शांती असो
पवित्र आत्मा तुम्हावर असो
पाहिले मला मी ही तूम्हाला ।। ३ ।।

## ६४२. शोधू कठे मी बाळा

शोधू कठे मी बाळा तुला पाहू कुठे मी येशू
जीव माझा वेडावला भेट दे तू मला ।। धृ ।।
शब्बाथाच्या दिवशी मारीया माग्दालीया धुंडी
त्या जाउनी पाहती तयांना कबर रिकामी दिसते ।। १ ।।
देवदूत वदला भिऊ नका तुम्ही ह्या वेळेला
तुम्ही शोधिता कुणाला सर्व ठाऊक आहे ते मजला ।। २ ।।

## ६४३. शोधुनी तुम्हा थकले

प्रभुजी गुरुजी शोधुनी तुम्हा थकले
आश्रुंनी नेत्र भरले ।। धृ ।।
मोलाचे तेल आणिले बघ सुगंध हा पसरे
लावण्यास शरिराला भल्या पहाटेस आले ।। १ ।।
दुष्टांनी तुम्हा छळिले मग खांबिया दिधले
गणगोत्र तुम्हासाठी हळहळुनी रडले ।। २ ।।
कबरेत तुला ठेविले तेथुनी कोणी नेले
उटण्याच्या त्या दिवशी माझे येणे नाही झाले ।। ३ ।।





कबरेत जाउनी पहाता देवदूत दिसे नेत्रा
मरणा जिंकुनी पुनरुत्थीत प्रभू झाले ।। ४ ।।

### ६४४. जा सुवार्ता सांगा जना

सुवार्ता सांगा जना राजा जगाचा पुत्र प्रित्याचा
जिवंत झाला पुन्हा ।। धृ ।।
ओळख मानुजा श्री ख्रिस्ताला जीवनाचा शिल्पकार
मातीपासून तव दिधला दिला नवा आकार ।। १ ।।
कृतघ्न मानव विसरुनी गेला येशुचे उपकार
सूड बुद्धीने मारा म्हणती येहुद्यांचा कर्णधार ।। २ ।।
मरणा मधुनी पुन्हा उठला आज आहे तो अमर
आज आहे पण सदैव राहील सेवेसाठी हजर ।। ३ ।।

### ६४५. हात धरुनी लावी कुशीला

हात धरुनी लावी कुशीला ओळख आतातरी
खिळे व्रण दावी प्रभू शरिरी ।। धृ ।।
दार बंद असता प्रभूजी आले
शिष्य हे सारे भयभित झाले
शांती असो रे तुम्हा सर्वांना आशीर्वाद दिला प्रभुने ।। १ ।।
शिष्यही सांगे त्या थोमाला
प्रभू उठला रे आम्ही पाहिला
व्रण खिळयांचे पाही झणी त्याच्या अंगाावरी ।। २।।
पुन्हा प्रभोजी शिष्यांकडे आला
जखमा खिळयांच्या दावी थोमाला
अविश्वासी राहू नको रे विश्वास ठेव माझ्यावरी ।। ३।।

### ६४६. मरणा जिंकुनी प्रभुजी उठले

मरणा जिंकुनी प्रभुजी उठले प्रचंड दैवी शक्ती
चल रे पातक्या येरूसलेमा उघडी आहे कीर्ती
स्तवुया वारंवार स्तवुया वारंवार ।। धृ ।।

मरणच मेले पतितच ठरले, नच कोणी पुन्हा उठले
दैवच म्हणती परी आशाला, नाशाचे पुत्र सगळे
जीवंत धर्म पवित्र मर्म तारण ख्रिस्ताच्या करवी ।। १ ।।
चाळीस दिवस जगती राहुनी दर्शन दिधले मारियेशी
निज शिष्याशी ऽऽऽ देवुनी दर्शन भोजन केले त्यांचाशी
देऊन अभय पवित्र आत्म्याचे स्वर्गी चढले अधांतरी ।। २ ।।

## ६४७. गाजला त्रिलोकी झेंडा गाजला

गाजला त्रिलोकी झेंडा गाजला
जिंकिले प्रभुने मरणाला ।। धृ ।।
टांगिले क्रुसावरती त्या गौरवी राजाला
बाजूस आणि दुसरे दिधले लुटारुला
साधला वैऱ्याने डाव साधला ।। १ ।।
टांगिले क्रुसावरती परी दृष्टी आकाशाला
व्याकूळ म्हणे बापा त्यागिलेस मजला
साधला वैऱ्याने डाव साधला ।। २ ।।
मज पाप्याला तारायाला साहिले अंखड मरणा
जिंकिले हो मृत्युला विजयी प्रभू झाला
शोभला शोभला पाप्यांचा वाली शोभला ।। ३ ।।

## ६४८. बागेतल्या फुलांनो

बागेतल्या फुलांना वनवासी पाखरांनो
दिसला का प्रभुराया, दिसला का प्रभुराया ।। धृ ।।
झुंजमुंज झाली ही मंगल पहाट
त्या पहाटेच्या कोंबड्यांनी दिला जेव्हा बाग
डोळ्याशी ना लागो डोळा जीव होई वेडा खुळा
रडता का गं कळ्यांनो प्रभुवरी माझी माया ।। १ ।।
माळीदादा पाहिला का माझा प्रभू राज
त्या बागेमधुनी झाला हा मंजूळ आवाज
शोधीतेस कुणाला शोक करिते कशाला
जा सांग माझ्या शिष्यांना जिवंत प्रभूराया ।। २ ।।





**६४९. खिस्त राजा येणार**

खिस्त राजा येणार वैभवाने येणार
केले भविष्य खरे ठरणार ।। धृ ।।
आकाश पृथ्वी अद्‌भुत होणार
सैरा वैरा मानव धावणार
काळ कठीण येणार चोरासारखा येणार
गहू कोठारी साठवीणार ।। १ ।।
ग्रहतारे जळुनी जाणार
प्राणी मात्राला कंप हा सुटणार
मेघारुढ होणार,वैभवाने येणार
केले भविष्य खरे ठरणार ।। २ ।।

**६५०. सांग माळीदादा**

सांग माळीदादा सांग माळीदादा
ठेविलास कोठे माझा धन्य प्रभू येशू ख्रिस्त
बोले मारीया माग्दालेना प्रभू येशुला सांग माळीदादा ।। धृ ।।
धोंडा बाजुला झालेला मारियेने तो पाहिला
पाठीमागे पाही तो प्रभू येशू उभा ।। १ ।।
शोध कुणाचा करते बाई शोकाकुल का होते
कोण हवे ते सांग मजला दु:खाने का रडते
शोधून थकले माझ्या प्रभुला दिसेना का हो मज नेत्राला ।। २ ।।
त्यासमयाशी प्रभू गुरूजी मारियेस बोलले
सांग जाउनी शिष्यांना मी प्रभुला जीवंत पाहिले
तोच प्रभू हा पुनरुपि उठला माळी होऊन मी पाहिला ।। ३ ।।
भविष्यवाणी देव पित्याची सत्य असे हे घडले
माग्दालेना दर्शन दिधले पहिले भाग्य लाभले
हर्षित होऊन तिने पाहिला सांगे जाऊन शिष्यगणाला ।। ४ ।।

**६५१. येशू हा मरणातुनी उठला**

येशू हा मरणातुनी उठला सांगू सुवार्ता अवघ्या पतिता
कोण दूजा उठला ।। धृ ।।





तुमच्या आमुच्या मुळपापांचा दोषारोप जो घेउनी झिजला
पापी म्हणविता मरणी मेला पुनरुत्थीत झाला हा हा ।। १ ।।
हीन दीनांच्या सेवेतुनी हा देई जगाला जीवनी प्याला
तृषा हाटविता मरणी मेला तृषितांचा राणा हा हा ।। २ ।।
दुष्ट जनांचा छळ साहुनिया सुख आम्हाला दु:ख प्रभुला
स्वर्गी आनंदे जमला मेला जय बोला जय बोला हा हा ।। ३ ।।

### ६५२. दु:खीत मना शोधू मी कुणा

दु:खीत मना शोधू मी कुणा रे कुठली ही विपदा ।। धृ ।।
सुर्योदयी प्रभू प्रभू उठले सुगंधी द्रव्ये घेउनी आले
लावू मी कुणा रे कुणीकडे गं पाहुणा ।। १ ।।
क्रूर जनांनी त्याला मारीले थडग्यामध्ये याच ठेविले
दु:ख कसे साहुना रे भेट कशी होईना ।। २ ।।
वाट बघुनी शिणले डोळे दृष्टीस पडेना प्रभूजी का हे
कैसे फेडू मी त्या ऋणारे कोठे गेले सांग स्वमना ।। ३ ।।

### ६५३. जगताच्या पाठीवरती

जगताच्या पाठीवरती पहिलं निशाण ख्रिस्ताचं
शांत प्रीतीच्या विजयाचं हो शांत प्रीतीच्या विजयाचं ।। धृ ।।
जगी नांदती नाना कळा धर्म भेद हा जन चाळा
विधर्मियांना जिंकून जगती मिळविलं मानाचं ।। १ ।।
मलाच सारा मान हवा म्हणूनी निर्मिती धर्म नवा
अपमानाचा डोंगर चढवा चढवा
शिखर गाठवा यशाचं शांत, प्रीतीच्या ।। २ ।।
जरी टांगीला क्रुसावरी आणि ठेविला खोलवरी
तिसऱ्या दिवशी थाडग्यामधूनी वैभव दावी
देवाचं शांत प्रीतीच्या विजयाचं ।। ३ ।।

### ६५४. सांगू आता कुणा

सांगू आता कुणा प्रीतीवीना जीव सुना ।। धृ ।।





हरवली माझी जीवलग प्रिती
न ही जीवाला माझ्या शांती हे ख्रिस्ता सांग ना ।। १ ।।
पहाटेकाळी कबरेजवळी धोंडही केली कोणी निराळी
हे देवा सांग ना ।। २ ।।
प्रीत बावरी शोधीत त्याला माळी म्हणूनी हाका मारी
हे माळीदादा सांग ना ।। ३ ।।

## **६५५. जयाचे झाले पुनरुत्थान**

जयाचे झाले पुनरुत्थान आमुचा येशू ख्रिस्त भगवान
पाप जगाचे घेऊन शिरी अर्पुन प्राणा जगता तारी
धन्य प्रभू येशू अवतारी देवाचा सूत जाण ।। १ ।।
जगतासाठी स्तंभी चढला पाप जगाचे घेऊन गेला
मरणावरती विजयी झाला कोण असा बलवान ।।२।।
पाषाणाच्या ठिकऱ्या झाल्या चहूबाजुंनी विजा चमकल्या
भूमी हदरुनी थडया उघडल्या
कडकडले आसमान ।। ३ ।।
पवित्र स्थानी काय जाहले पडद्याचे दोन भाग जाहले
काळोखाचे राज्य पसरले झाले जग सुनसान ।। ४ ।।
दु:खाचीही कथा संपली तिसऱ्या दिवशी पहाट झाली
सृष्टी आनंदाने फुलली झाले पुनरूत्थान ।। ५ ।।

## **६५६. या धरतीवर कोण असा**

या धरतीवर कोण असा ज्याने जिंकियले मरणाला ।। धृ ।।
तिसरे सुदिनी प्रात:काळी कबरेवरली धोंड सरकली
दिधले दर्शन श्री ख्रिस्ताने माग्दाली मारियेला ।। १ ।।
भविष्य होते तिसरे सुदिनी मृतामधुनी जीवंताशी
दिधले वचन पूर्ण कराया आपुल्या वचनाला ।। २ ।।
गौरव त्याचे हेचि बलिदान वधस्तंभ हेचि भूषण
जिकुनी मरण ह्या धरतीवर नच कुणी जाहला ।। ३ ।।





## ६५७. ख्रिस्त जगी उठला झटपट

ख्रिस्त जगी उठला झटपट पाप्यासाठी केली खटपट
भयभित झाले पहारेकरी हे उलथुनी पडले भूमिवरी हे
शास्त्री सांगती सर्वच खोटं ।। १ ।।
पहिले दर्शन मेरी माग्दालेनाला दुसरे दर्शन प्रेषितांना
थोमा सांगतो सर्वच खोटं ।। २।।
संशयी नसता विश्वासू तू राहा हाता–पायाच्या जखमा तू पाहा
माझे स्वामी माझे दैवत ।। ३ ।।

## ६५८. धन्य झाला माझा देव

धन्य झाला माझा देव उठला मरणातून ।। धृ ।।
मेरी माग्दालीना भयभित झाली आनंदाने सांगू लागली
प्रभू उठला सामर्थ्यवान ।। १ ।।
पेत्राला सांगे वाणी प्रभूची सांभाळ कोकरं दुष्टांपासुनी
हीच सांगे ख्रिस्त वाणी ।। २ ।।
सोड मानवा जुण्यापणाला जीवन आपुले ख्रिस्त जाहला
नाही जगणे ख्रिस्तवीन ।। ३ ।।

## ६५९. आकाशाहून उंच पलीकडे

आकाशाहून उंच पलीकडे आहे मला घरकूल नवे ।। धृ ।।
विपूल असती महाल तेथे प्रभुचे प्रेम बाधीत तेथे
पितृगृही नेईल सवे ।। २ ।।
प्रियतम येशू मम क्रुसधारी मारी मरण मरणात तारी
जिवंत सदा स्वर्गी वैभवे ।। ३ ।।
मज पाखरा घे नभी भरारी तिथेच नेईल प्रभू अंतरी
धावत येतील दूतांचे थवे ।। ४ ।।

## ६६०. आला नजिक न्यायाचा दिन

आला नजिक न्यायाचा दिन
प्रभू येईल मेघी बसून ।। धृ ।।





सिंहासने होऊन विराज राजेशाही घालुनिया साज
शिरी मुकूट तेजस्वी ताज धन्य प्रभुजी उठे आवाज
राजे नमतील पदी झुकून ॥ १ ॥
पापी निष्पापी रांगा त्या लांब प्रत्येकाला विचारील जाब
कोणी स्वीकारील माझा खांब
सैतानाची दुनिया थांब नितीमाना धरी अलंगून ॥ २ ॥
भुकेलेल्या दिले खावयाला पाणी देउनी प्यावयाला
कनिष्ठांपैकी कोणी एकाला निराश्रीताशी दे आश्रयाला
तया ठायी मला ओळखून ॥ ३ ॥
धगधगत्या अग्नीच्या ज्वाला सिद्ध झाल्या बहू भेटाया
शापग्रस्ता तुला तारायाला झाल्या अतुर घेऊनी माला
जा निघोनी माझ्या पुढून ॥ ४ ॥
सार्वकालिक जिने नीतिमान उपभोगीत नित्य आनंदानं
पतिता असे शिक्षादान स्वीकारूनी करी अवमान
सांगे निरोप्या तुम्हा कधी न ॥ ५ ॥

## ६६१. मेघावरी बसुनी येणार

मेघावरी बसुनी येणार न्याय आमुचा हो
न्याय तुमचा खचित होणार रे ॥ धृ ॥
सहनशिलता नम्रलीनता अंगी बाळगावी
ख्रिस्तराजाची सदा मुखी ठेवा आज्ञा दहावी
दहा आज्ञाचा करा विचार रे ॥ १ ॥
आता म्हणता आम्ही सारे ख्रिस्ताचे सरदार
संकटकाळी वाचा तुमची बंदच पडणार आहे रे
जिव्हारी येईल तलवार रे ॥ २ ॥
तोच वतनदार ज्याच्या ठर्यी विश्वास दृढ
तोच तरणार आहे तोच तरणार
खरे सुवार्तिक हेच सरदार रे ॥ ३ ॥





# पवित्र मारिया

## ६६२. जिने माझे घडविले

जिने माझे घडविले जीवन सुखाचे
हृदयात त्या रुप त्या माउलीचे ।। धृ ।।
अंतःकरणाच्या आत आहे एक खोली
प्रतिमा माउलीची त्यात आहे कोरलेली
जगत्‌माता मारियाबाई नाव तिला शोभे ।। १ ।।
बाळासाठी चारा आणी चोचीत धरोनी
वाढवी ती पिलांना उबीत धरोनी
पक्षिणी ती माझी आई लेकरु मी तिचे ।। २ ।।

## ६६३. माझा प्रणाम तुला घे

माझा प्रणाम माझा प्रणाम माझा प्रणाम
माझा प्रणाम तुला घे शतदा माझा प्रणाम ।। धृ ।।
हृदयी उदरा मम तू असावे
रुप तुझे लोचणी बघावे
अखंड तुजला भावे भजावे
तुझेच चिंतन घ्यान ।। १ ।।
धर्म तरुची लागण व्हावी
आत्मा सुहासे भरुनी जावी
पवित्रता ती सर्वत्र दिसावी
प्रभूची प्रतिमा छान ।। २ ।।
उद्धाराची ही बाग फुलावी
कळया—फुलांनी भरुनी जावी
न्यायदिनी ती प्रभूस दिसावी
प्रशंसा गौरव आणि महान ।। ३ ।।

## ६६४. धावत तुज पदी येई

धावत धावत तुज पदी येई प्रेमळ माझी माता माउली ।। धृ ।।





सर्व स्त्रियांमध्ये तूच निवडली देवपुत्राची माता बनली
पिढ्या न् पिढ्या धन्य तू ठरली ।। १ ।।
उभी होती क्रुसाजवळी याहान शिष्या केली हवाली
जीवाजीवाची आई बनली ।। २।।

## ६६५. पुष्प फुलांच्या गुंफुंनी माळा

पुष्प फुलांच्या गुंफुनी माळा आज ओवाळू देवमातेला
फुले उधळू चला गाणे गाऊ चला
चला ओवाळू देवमातेला ।। धृ ।।
मारीया गं बाई तू जगताची आई सवर्गातील चांदणी
रूप तुझे सुंदर किती मनोहर गुलाबाच्या परी
करू तुझी भक्ती दे आम्हा शक्ती
घेई जवळी तू दीन बाळाला ।। १ ।।
ये माझ्या मनी तू सदा आनंदी जाई तू उल्हासुनी
स्वर्गाच्या दारी उभी राहुनी पाप्यांची हो कैवारीनी ।। २ ।।

## ६६६. मारिये धन्य तू

झाल्या बहूत आणि होतील बहूत
माता भूवरी परी मारिये धन्य तू श्रेष्ठ नारी ।। धृ ।।
कुमारी असता तया देवाने कृपादृष्टीने वरदान दिधले
त्या वरदाने अघटीत घडले झालीस माता जगी ।। १ ।।
तुझ्यासम झाली न माता शोधिता परी न सापडेना आता
एक नव्हे गं हजारोंचे हजार नव्हे त्या लाखाचे नवस पूर्ण करी ।। २ ।।
हीच विनंती ऐक गं आता निरोप माझा सांग प्रभुला
कृतकर्माच्या मम पापांची क्षमा कर सत्वरी ।। ३ ।।
आशीर्वाद दे त्या लोकांना जे जे स्मरती तव नामाला
पाप्यांसाठी प्राण अर्पिला प्रभुने क्रुसावरी ।। ४ ।।

## ६६७. म्हणुया नमो नमो

म्हणुया नमो नमो मारीया बाईचा
मायेचा वाहे झरा अंतरी भक्ती करा
घेऊ या लाभ दर्शानाचा, नमो नमो ऽ ऽ ।। धृ ।।





दूतगण नमती पायी, कृपेने पूर्ण होई,
स्त्रियांमध्ये धन्य होई, अशी ही मारीयाबाई,
प्रभुला जन्म देई, भाग्य ती त्याचं पायी,
सत्वशील आमुची आई, भक्ताला पावन होई
होतो जयघोष माऊलीचा, नमो नमो ऽ ऽ ऽ ।। १ ।।
साऱ्या जनतेची आई, माता मारीयाबाई
हाकेला उभी राही, विनंती करता ठायी
भक्त चरणाशी येती, निराचरणच होई
आमचा परमेश्वर, पहिला खरोखर
भरी दरबार भाविकांचा, नमो नमो ।। २ ।।

## ६६८. माता माऊलीची वाणी

माता माउलीची वाणी झाली मोठी
सन्मान जे करीती इच्छा पूर्ण होई ।। धृ ।।
या हो सारे मिळुनी मंदिर पुजनी
सेवकाच्यासाठी धावुनिया येई
माता माऊलीची वाणी झाली मोठी ।। १ ।।
जे का दु:खी आहेत, ते दु:ख विसरावे
माउली चरणी शांती सुख घ्यावे
माता माउलीची वाणी झाली मोठी ।। २ ।।

## ६६९. माता मारीया

माता मारीया माता मारीया, अवघ्या दीनांची माता
तुला विनवितो तुला याचितो जोडुनिया दोन हाता ।। धृ ।।
नमो नमो ग मारीयाबाई, देवदूताने दिली ग्वाही
सर्व स्त्रियात धन्य तू बाई येशू बाळाची होशील आई
आत्मा देवाचा देव बाणाचा चालुनी तुजला येतो ।। १ ।।
तुझं पाहून चांगुलपण तुला घेतलं राणी म्हणून
स्वर्ग राणीचा तुजला मान, दिलं देवाने हे वरदान ।। २ ।।
आई तुझं मी चांगलं बाळ जीव पापाग्नीत होरपळं





घे प्रेमाने मज जवळ कर सुखानं माझा सांभाळ
अंती क्षणाला मरत्या वेळेला तारण या पतिताला ।। ३ ।।

## ६७०. धन्य तू मारीया बाई

धन्य तू मारीया बाई, धन्य तू मारीया बाई
तुझा हा निरोप होई ।। धृ ।।
देवभक्तीची तुला आवड, देव प्रीतीची तुला ही ओढ
म्हणून त्याने केली निवड देवानं तुझी केली निवड
होशील देवाची आई, धन्य तू मारीया बाई ।। १ ।।
शब्दाप्रमाणे होऊ दे मला, देवाच्या इच्छेने होऊ दे मला
मारीया बाईचा रंग फुलला, मार्याबाईने स्वीकार केला
आनंद मनात होई, धन्य तू मारीया बाई ।। २ ।।
प्रभू हा देवांचा देव असुनी, प्रभू हा राजाचा राजा असुनी
घेऊन जन्म गाइचा गोठी, घेऊन जन्म गाई गव्हानी
तारण विश्वाचे होई, धन्य तू मारीया बाई ।। ३ ।।

## ६७१. तू माउली माता माई

तू माउली माता माई, साऱ्या जगताची आई
अवघे म्हणती तिला, धन्य ती मारीया बाई ।। धृ ।।
महान धडविला इतिहास तिने या जगती
उदरी बाळ येशू जन्मी आला या जगती
पवित्र धन्य थोर जगी पावली ख्याती
संतोष संत त्रैक्य ठरले आज या जगती ।। १ ।।
स्त्रीयांस घालुनिया दिला तिने आदर्श,
जगी कुणाशी झाला नाही संघर्ष
बाळास योग्य पाहा दिली तिने शिकवण
हर घडी याची त्याला नित्य देई आठवण
सत्याचा मार्ग सोडीला न कधी जाणून
तिच्याच उदरी होते मार्ग सत्य जीवन ।। २ ।।
आई असावी कशी दिधले तिने दावून





असा आदर्श मोठा आहे कोण याहून
आईचा मान तुम्ही आईलाच देतात
विनम्र होउनी पापाची कबुली देतात
तिच सदाची करते देवाजवळी मध्यस्थी
प्रचिती आली तिच दास आज या जगती
तिने दिला हा हात आजवर ज्यावरती
सुदैव म्हणती त्याला ख्रिस्तसेवा ही जगती ।। ३ ।।

## ६७२. मारीया माते आशीर्वाद दे दीना

मारीया माते आशिर्वाद दे दीना,
ही विनंती तव चरणी पुन्हा पुन्हा ।। धृ ।।
पोरक्याला आई चकोर चंद्रमा
व्हावी जीवनात माझी ऐसी पौर्णिमा
पुरवी दयाघना एवढी ही कामना ।। १ ।।
यावे अंधारी ज्ञानाच्या दिपकापरी
धन घेऊनी धनवंती गरिबाघरी
पाउलांच्या खुणा ह्या लागो चिरंतना ।। २ ।।
मोती शिंपल्यास मिळते जीवन नवे
मान किटकांस हा मिळतो फुलांसवे
नको अवहेलना मी आलो दर्शना ।। ३ ।।
तव कृपेचा वदरहस्त मज लाभला
शेवटची हिच आले तुज प्रार्थना
लागो ध्यास मना हिच एक आराधना ।। ४ ।।

## ६७३. माऊली पावली नवसाला

माउली पावली नवसाला, धावली भक्तांच्या हाकेला ।। धृ ।।
तिच्या चरणी जो ठेवितो माथा
साऱ्या निर्वाळी ती व्यथा
दीन दुबळयांची ती माता ।। १ ।।
असो गरीब वा श्रीमंत नाही कुठला जातीभेद
घेई प्रेमाने जवळी ।। २ ।।





सन्मान जे तिचा करील इच्छा पूर्ण त्यांच्या होईल
करी दु:खात रक्षण ।। ३ ।।
धन्य कुमारी मारीया बाई झाली स्वर्गाची राणी
साऱ्या विश्वाची आई ।। ४ ।।

## ६७४. माऊलीच्यासाठी

माउलीच्यासाठी हार फुलांचा गुंफला
रथ सजविला छान मिरवायाला
जमली ही जनता सारी दर्शनाला ।। धृ ।।
आई सारखे दुसरे दैवत नाही
भाग्याची ती खरी पुण्याची देहाच्या त्या ज्योती
देवी माऊलीच्या पायी
आरती ही केली ओवाळायला ।। १ ।।
तुमच्या आमच्या स्वप्नी नव्हते
आज आईचे दर्शन घडले
अमृताचा ठेवा माझ्या नशिबी असावा
प्रार्थनेचा धडा आम्हा शिकविला ।। २ ।।

## ६७५. माउली गुणगाण गाऊया

माऊली गुणगाण गाऊया प्रेम भरण्या,
भेदास विसरून प्रार्थना करून ।। धृ ।।
स्त्रियांमध्ये आहे तू महान, देई आम्हा तू कृपादान
आई गं आम्ही तुझे भक्तगण ।। १ ।।
देवपुत्राची आई असुनी काया झिजवली बहू दु:खाती
बाळाशी पाठविली हात धरी ।। २ ।।
तव नाम गावे एकसुराने प्रभू आम्ही जयघोषाने
विनंती कर आम्हासाठी आनंदाने ।। ३ ।।
करा पूजेची आज तयारी
माउली माझी येणार दारी
धन्य ती माता तिच्या चरणी माथा
लीन होउया चला माउलीपदा ।। ४ ।।





## ६७६. परमेशाच्या माते तुजला

परमेशाच्या माते तुजला प्रणामकरण्या आलो ।। धृ ।।
निष्कलंक तू आणि कुमारी परेश माते धन्य तू नारी
तुझी लेकरे तुजला आम्ही समर्पिण्याला आलो ।। १ ।।
परमेशाची दासी बनली तुजला त्याने महान केली
सुमधूर हे आमुच्या माते स्तविण्या तुजला आलो ।। २ ।।
वात्सल्याने जवळी केले प्रभुख्रिस्ताच्या समीप नेले
प्रेमळ आमुच्या माते तुझिया पदकमलाशी आलो
नित्य साहाय्यक आमुची माता
कैवारिनी तुज करी विधाता
दयावंत माउली तुला गे आम्ही नमन्या आलो ।। ३ ।।

## ६७७. थोर तुझे उपकार आई

थोर तुझे उपकार आई जन्म मला तू दिला
सांग कसं मी विसरू तुला ।। धृ ।।
पावसात माझ्यासठी आई तू भिजली
कधी तू उपाशी पोटी निजली
घेऊन कडे खांद्यावरी वाढविले तू मला ।। १ ।।
तुझ्या पुण्याईने आई दुनिया पाहिली
मायेची माझ्यावर धरली तू सवली
गेली तू निघोनी कुठे शोधू मी तुला ।। २ ।।
देव देवतामध्ये आई तुझा मान
महान झाली तू तुझ्या कर्तृत्वाने
आलो शरण बाळ तुझ्या चरणाला ।। ३ ।।

## ६७८. धावत येई

धावत येई तव द्वारी मारियाबाई
तव दर्शनासाठी ।। धृ ।।
तव भेटीला माझा जीव आतुरला
काय करावे काय सुचेना धीर तू आम्हला देई ।। १ ।।





पुण्यही नसता माझ्या पदरी
जवळी घेई क्षमा करोनी भक्तीची पाने फुले वाही ।। २ ।।
तुजवीन जगती कोन कैवारी
संकट दुःखे तूच निवारी तुझे मी गुणगाण गाई ।। ३ ।।

### ६७९. प्रेमळ येशुची आई

प्रेमळ येशुची आई धन्य असो मारीयाबाई
मुकूट हिऱ्याचा सोनेरी वस्त्र कृपेचे भरजरी ।। धृ ।।
सुख—दुःखात जीव झडकरी
गुण दोष मम घेते पदरी
भक्ती खरी करीतो तुझी
ज्योत कृपेची लावली वाट स्वर्गाची दाविली ।। १ ।।
फातिमा गांवी त्या रानात
दर्शन दिले बाळा एकांत
वाटे अंतरी जावे अंबरी
शांती संदेश देउनी गेलीस गुप्त होउनी ।। २ ।।
येतो उमाळा भक्तीचा आई
जीवनी माझ्या तुझीच पुण्याई
आनंदीले, तू फुलविले
पंख ही असता मज जरी आलो असतो झडकरी ।। ३ ।।

### ६८०. आशीर्वादाने तुझ्या आई

आशीर्वादाने तुझ्या आई
तू जीवन फुलवीत राही ।। धृ ।।
त्रिलोकी महिमा तुझी
परी अमृत तुजपाशी
दुःखे निघुनी जाई, तू जीवन... ।। १ ।।
मध्यस्ती तूच ग होई
विनंत्या घेउनी जाई
ठेविशी देवा ठायी, ठेविशी देवा ठायी ।। २ ।।

ममतेचा फिरवी हात
मम खंत तुझ्या हृदयात
स्वप्ने सुखाचे पाही स्वप्ने सुखाचे पाही ।। ३ ।।

## ६८१. ही तुझी दिव्य ज्योत

ही तुझी दिव्य ज्योत अशीच राहू दे
मारीया मातेच्या सोहळयात दंग होऊ दे ।। धृ ।।
तुला वाजत गाजत मी मिरवीन
हार फुलांचा वर्षाव तुला करीन
आहे धन्य तू माता स्त्रियांमध्ये ।। १ ।।
किती दुःख साहिले तू आम्हासाठी
देव पुत्र अर्पिला तू जगासाठी
तुझे आभार मानितो जगतामध्ये ।। २ ।।
भक्ती काव्याच्या करुनी तुजला माला
येई दास आता तुझ्याच चरणाला
माझ्या स्वप्नात तुझी जागा राहू दे ।। ३ ।।

## ६८२. हरेगावची माउली

हरेगावची माउली नवसाला पावली
कुणा कुणाला ग सांगू आता माहेरला आलीया लेक
तिच्या दर्शनासाठी ।। धृ ।।
नव्हते ग बाई पोटी माझ्या पुत्र रत्न काही
ऐकुनी होते माउलीची ख्याती मनी योजिले काही
केला नवस कबूल बाई माऊलीच्या पायी ।। १ ।।
चांदीचा पाळणा केला ग बाई तिला वाहण्यासाठी
माझ्या मनाला किती आवरु आनंद मावेना काही
पुत्र रत्न दिला तिनं बाई माझ्या उद्धारासाठी ।। २ ।।
चला बायांनो चला सख्यांनो बाळ हे बघण्यसाठी
जणू मारियेच्या पोटी जन्मला येशू
गायीगव्हाणी गोठी
पुत्र रत्न दिल तिनं बाई माझ्या उद्धारासाठी ।। ३ ।।





### ६८३. माता माउलीची वाणी

माता माउलीची वाणी झाली मोठी
सन्मान जे करीती इच्छा पूर्ण होई ।। धृ ।।
या हो सारे मिळुनी मंदिर पुजारी
सेवकाच्या द्वारी धावुनिया येई ।। १ ।।
जे का दुःखी त्यांनी दुःख विसरावे
माउलीच्या चरणी शांती सुख घ्यावे ।। २ ।।
शब्द बोलीयले पूर्ण ते करावे
अनुभवाअंती माउली म्हणावे ।। ३ ।।
धन्य माझी माता स्वर्गाची राणी
आई आई म्हणुनी बाळ हाका मारी ।। ४ ।।

### ६८४. माता मारीया पावली

पावली रे माता मारीया पावली
या भक्तासाठी वृक्षापरी सावली ।। धृ ।।
हरीण पाण्यासाठी भर उन्हामध्ये पळती
जीव माझा तुझ्यासाठी कासावीस होई ।। १ ।।
या नभी चंद्र तारे तुज पाहुनी लुकलुकती
या शांत प्रकाशामध्ये जग हे तुला वंदितो ।। २ ।।
जो रडतो तुझ्या चरणी तू रडतेस ग आई
मागणी पुरी करुनी हसवी, कृपा वृष्टी ।। ३ ।।
मूळ पापांच्यासाठी स्वपुत्र दिला जगती
उद्धारुनी पतिताशी झाली खरी आई ।। ४ ।।

### ६८५. परमेश्वराच्या प्रेमा इतुके

परमेश्वराच्या प्रेमा इतुके महान जे दिसते
आईचे प्रेम असे असते ।। धृ ।।
स्त्री जेव्हा कुणी आई होते जीवन तेव्हा तिचे बदलते
क्षणिक पत्नी माता अन् ती चिरकालीन होते ।। १ ।।
बाळासाठी झिजते कणकण दुःख साहीते ती रात्रंदिन
व्यथा उरीच्या मनात ठेवून वरकरणी हसते ।। २ ।।

स्वर्गी प्रीती परमेश्वराची या धरणीवर तशी आईची
तिचेच केवळ प्रेम जोडीते स्वर्गाशी नाते ।। ३ ।।

### ६८६. मी अवगुण

मी अवगुण हे मारिये माते चरणी तुझ्या वाहीली
जगाची तुच एक स्वामिनी ।। धृ ।।
आज तुझी दे शक्ती मजला भक्ती सुखाची मनाची शांती
गत काळाची कुकर्मे ही तुझ्या पदी आठवी ।। १ ।।
आज मनाचे निश्चय माझे तुला पाही ये पुरवी माते
पापीजनांच्या पुढती ठाकली दुःखे तुचि साहिली ।। २ ।।
स्व पुत्राच्या करवी माझे पाप मुळाचे तूच हटविले
तुझ्या प्रीतीला तोड ही जगती नाही या भूमंडळी ।। ३ ।।

## प्रषितांची कृत्ये

### ६८७. पेत्र आणि योहान

(प्रे.कृ. ३:१–१६)
पेत्र आणि योहान चाले मंदिराला
सुंदर नामे दरवाज्याला पांगळा बसला ।। धृ ।।
मंदिरात जात असे पाहुनी त्या मागितली भिक्षा जवळुनी जाता
येशुच्या नामात उठविले त्याला ।। १ ।।
दुर्कस नामाची होती एक शिष्या भक्तीमान असता देवआज्ञा झाली
प्रार्थना करुनी दुर्कस उठविली ।। २ ।।
देवाने जे केले वर्तमान झाले
ऐसे आत्म्या देगा देवा तुझ्या सेवकाल ।। ३ ।।

### ६८८. सत्य सांगतो अजला

(संदर्भ– प्रे. कृ. ३:६–१६)
सत्य सांगतो आजला या ठायी प्रभू नामाने उठ उभा राही ।। धृ ।।
मंदिराला मी जाता जाता गेले लक्ष सारे पाहता
पेत्र योहान कंपित होई ।। १ ।।





आम्हा पाहता डोळे लाविले काय हाईल असे ते पाहिले
सोने रुपे ना आम्हापाशी काही ।। २ ।।

### ६८९. छळू नको शौला

(संदर्भ– प्रे कृ ९: ३–६)

छळू नको शौला मजला प्रभू त्या म्हणाला
आदी नाही अंत त्याला भज त्या इशाला ।। धृ ।।
शौल अहंकारी स्वार घोड्यावरी सैन्य बरोबरी घेउनी तलवारी
चालला पीडित प्रभूच्या जनाला ।। १ ।।
कूकर्म त्याचे जोमाने चालले
दृष्टी गेली तो पडला भूमीला ।। २ ।।
हीन करणी देवाची जगी गौरवाची
तव दुष्टी लाभली देणगी त्रैक्याची
शौलाचा तो पौल झाला बोध मानवाला ।। ३ ।।

### ६९०. सिमोन जादूगराचा दाखला

(संदर्भ– प्रे कृ ८:९–२४)

सिमोन जादूगारा, सिमोन जादूगारा
केलीस हुशारी रे पाडली रे उघडी लाचारी सारी ।। धृ ।।
पवित्र आत्मा तू मागू लागलेला
पैसे देऊ केलेस रे त्या पेत्राला
तुझी जादुगीरी, तुझी जादुगीरी झाली शुन्यापरी ।। १ ।।
थक्क केलेस जन मिरवी मोठेपण
सांगुनिया मोठा होई मिळविशी मान
सत्य थांबेना रे, सत्य थांबेना रे
तुझ्या ओठावरी रे ।। २ ।।
बोले माझ्या जीवनी डाग नसावा
मज साठी देवाकडे विनंती करावा
गौर साऱ्या बाबी, गौर सारे बरव्या
पेत्रा दूर करी रे ।। ३ ।।





### **६९१. सौल तू माझ्या**

(संदर्भ– प्रे कृ ९: ३–६)

सौल तू माझ्या का छळितो भक्तांना

प्रभू तुझा मी आहे हे कळले नाही का तूला? ।। धृ ।।

शब्द देवाचे देहभान बुडाले

सौलाचे सैतानाचे काम घे देवाचे नाम ।। १ ।।

बोलला सौलाला का छळतो भक्तगणाला

प्रभुची वाणी सौलाचा पौल झाला क्षणी ।। २ ।।

चमत्कार प्रभुने राजे झुकविले असे

माझ्या ख्रिस्ताने करू तो लागला प्रभुचे गुणगाण ।। ३ ।।

## **संत पौल**

### **६९२. तिमथ्याला पहिले पत्र**

(संदर्भ– १ तिमथी ३: १–१६)

तिमथ्याला पहिले पत्र तिसऱ्या अध्यायावरी

कारभारी आणि मंडळी पुढारी ।। धृ ।।

तो लोकप्रिय सभ्य शिक्षक असावा

भांडखोर, मद्यपी शिक्षक नसावा

मंडळीचा सांभाळ तोच करी ।। १ ।।

मंडळीचे कार्य चांगले चालवील

ख्रिस्तावरी विश्वासात धैऱ्य मिळविता

मंडळीची आशा असे त्याच्यावरी ।।२।।

संत पौल लिहितो पत्र मंडळीला

जीवन हे वाहावे जनसेवेला

प्रभू सेवेचा सत्य कैवारी ।। ३ ।।

### **६९३. जीवंत अशी देवाची मंडळी**

(संदर्भ– १ तिमथी ३: ८–१६)

देव मंडळीचा कसा करीतो सांभाळ

सत्याचा हा स्तंभ पाया पुढारी सगळी ।। धृ ।।





भीड मर्यादा मंडळी देवभिरु असावा
सैतानाप्रमाणे शिक्षेत पडणारा नसावा
निंदा न होवो त्याची अशी जगा वेगळी ।। १।।
सद्विवेक भावनेने असावे राखणारे
पारख करणारे आपण सर्व सारे
आदर्श ठेवण्यास त्याने जमवावे मुले–बाळे ।। २।।
संत पौल लिहितो पत्र पहिले तिमथ्याला
लवकर येण्याची आशा लिहिले धरुन तुला
अध्याय तिसरा वचन आठ ते सोळा
सत्त्याचा हा स्तंभ पाया ।। ३।।

## ६९४. गर्वाने तो फुगलेला

(संदर्भ– १ तिमथी ६: ३–६)
गर्वाने तो फुगलेला कळणार नाही कधी त्याला
अन्य जर कोणी शिकवितो त्याला
सूभक्ती ना लाभो त्याला ।। धृ ।।
वादविवाद आणि शब्द युद्ध यामुळे तो बनला वेडा
हेवा कलह अपशब्द दुसऱ्यास
शिकवू लगला तो धडा
दुष्ट संशयी अपशब्द नासला
सत्त्यासही तो मुकलेला ।। १।।
भक्ती हे साधन आहे कमाईचे
करी तो कल्पना याची यामुळे आपसा आपसांमध्ये
वाव मिळे भांडणाला ।। २।।
शंका कुशंका आहे जर कोणाला
विचारी समक्ष आम्हाला
सहावा अध्याय वचन तिन ते सहा
पत्र लिहिले तिमिथ्याला ।। ३।।





# देऊळमाता

## ६९५. खडकावरती घालून पाया

खडकावरती घालून पाया उभारुया मंदिर
धोंडे शोधू चला रे छान छान छान ।। धृ ।।
खडक खोदा सुरुंग लावा कठीण पाषाणाला
धोंड्यावरती धोंडा रचूया लागू चला कामाला
वेळ तोकडी कामही दगडी साह्य करील भगवान ।। १ ।।
हरेक धोंडा घडवून जैसा कोणशिला तो व्हावा
विश्वासाचा घालुनी पाया करु इमारत महान ।। २ ।।
असो कठीण खडक सारी दर्द तयाच्या भारी
पवित्र त्याच्या सत्यवचनास बांधू कामास दोरी
मंदिराच्या शिखरावरती अखंड चढऊ विश्वास ।। ३ ।।

## ६९६. पाया घालुनी खडकावरती

पाया घालुनी खडकावरती शहाण्या माणसापरी
सुखी तो वचने पाळी सारी ।। धृ ।।
प्रत्येक जो माझ्या वचनाप्रमाणे सोडून देतो वाईट वर्तन
कोणी वाळूवर घर बांधती मूर्ख किती भूवरी ।। १ ।।
पडता पाऊस वारा अतिभारी पूर आला किती जरी
नाही त्याला भिती कशाची ।। २ ।।

## ६९७. झाले ख्रिस्त शरीर देवाची मंडळी

झाले ख्रिस्त शरीर देवाची मंडळी
बा तिथे का बंडाळी ही आसावी ।। धृ ।।
नाही भेद त्यामध्ये गोरा काळा
गा दिधले आत्मदान सकला
जात मानवाची त्याने केली एक
तोचि मात्र देव एक झाला त्रैक्य





म्हणे ख्रिस्त ज्याशी एकदा आपुले
ते पराशी वाकुडे कैसे राही ।। १ ।।
कोठुनिया येवो कोण्या मिशनाचा
त्यावरी ख्रिस्ताचा प्रकाश पाडशील
ख्रिस्त दास म्हणे सोडा गर्व खमीर
फुगवी त्या मना फार नाश त्यात
लावा ख्रिस्तामध्ये आपुले कलम
बापा पासून उगम आपुलाची ।। २ ।।

## ६९८. गोवा शहरच्या यात्रेकरुंनो

गोवा शहरच्या यात्रेकरुंनो माझी आठवण ठेवा
छोटीशी मेणबत्ती लावा
काचेच्या त्या भव्य पेटीत देह प्रफुल्लीत ।। धृ ।।
सत्व परीक्षा पाहाण्याला हाताचा तो पंजा तोडला
सही स्वत:ची करू लागला चमत्कार हा ऐसा घडला
नाव ते अमर फ्रान्सिस झेविअर संतात गणना ती व्हावा ।। १ ।।
महासागराच्या त्या बेटाला देह अर्पिला त्या मंदिरात
नांशवंत देह पाहाण्याला जनता जाई हो गोव्याला
श्रद्धांजली काव्य फुले चरणी त्याच्या वाहावा ।। २ ।।
दास म्हणे आयुष्यात एकदा तरी ये गोव्यात
शांती मिळेल कुटुंबास सार्थक होईल या जीवनात
नम्र प्रार्थना करूनी चरणा श्रद्धेने दर्शन घ्यावा ।। ३ ।।

## ६९९. अरे हा प्रभू ख्रिस्त

अरे हा प्रभू ख्रिस्त मंत्र चांगला ख्रिस्ताच्या ह्या सेवेसाठी
पौलस भक्त रंगला ।। धृ ।।
लुळे खुळे अंध बहिरे रक्तपिती व कोडी सारे
बरे करी सारे देव बरे करी सारे
मरणामधुनी कैक उठविले पाहा त्याची लिला ।। १ ।।
पौलस भक्त कैद जहाला प्रभू नामाचा मंत्र जपला





धावोनी आला देव धावोनी आला
टाळेबंदीच्या तुरुंगामधुनी मोकळा केला ।। २ ।।

## प्रबोधन

### ७००. हे देवाचे वचन

हे देवाचे वचन तुम्ही ऐका सर्वजण
घरी जावे तुम्ही त्याच्या तो करील सन्मान ।। धृ ।।
संपूर्ण सृष्टीला सांगावे वचनाला
प्रभू कार्य करा पूर्ण भिऊ नका हो कोणाला
नीतीमत्वाचे वस्त्र करा परिधान ।। १ ।।
डुकराच्या पुढे मोती अनमोल हे टाकू नका
धूळ पायाची झटका क्षणी जावे तेथून ।। २ ।।

### ७०१. ख्रिस्त वचनाचा

ख्रिस्त वचनाचा घेउनी विळा
या सैतानाचा कापुया गळा ।। धृ ।।
शूर आम्ही येशूचे सैनिक भारी
विळा घेऊन करू सैतानावर स्वारी
बाई लबाड डोम कावळा ।। १ ।।
विळयाच्या पात्याला लावूनी धार
एका घावात करू खांडोळे चार
बाई लबाड डोम कावळा ।। २ ।।

### ७०२. प्रभू येशुच्या सत्वचनाचे

प्रभू येशुच्या सत्वचनाचे सांगू कुणा भाकीत रे
शोध नरा शोध जगाच्या उत्पत्तीचा शोध रे ।। धृ ।।
राष्ट्र राष्ट्रावरती उठेल जागोजागी भूमी हादरेल
जलाशय जगती आटतील जलसंपत्तीचा होई नाश
कृषी उत्पन्नाचा साठा संपेल होई हालहाल रे ।। १ ।।





असा येईल एक दिवस चंद्र सूर्य तारे हालतील
कोणी होई जगती अदृष्य बुद्धीवंतापुढे हे वित्त
बुद्धीबळाच्या जोरावरती जाई अखेर मातीत रे ।। २ ।।
भाऊ भावा जिवे मारील आई बापा मुले सोडतील
सासू सुना गृही भांडतील जेथे तेथे अनिती माजेल
सुख भोगात रणकंदन करी नर जगतात रे ।। ३ ।।
खोटया संदेष्ट्यांचे वारे जगामध्ये भारी सुटेल
कोणी पाहा म्हणे मी ख्रिस्त सुखलोक जगा दावीन
स्वार्थासाठी फसवेगिरीला येईल जगामध्ये ऊत ।। ४ ।।
भयभीत जगा पाहून मध्य पूर्वेकडून येईल
नाव बाबेल कुलवंतीन हुकूमत जगा गाजवील
अखेर शेवटी सप्त वर्षांनी जाई जग विलयास ।। ५ ।।

## **७०३. प्रभू नाम सांज सकाळ**

घे रे प्रभू नाम सांज सकाळ
तेणे होई तुझा आत्मा प्रतिपाल ।। धृ ।।
तेच नाम होते आदी त्यास अंत नाही
पिता पुत्र आत्मा होउनिया राही
त्या गौरविती दूत सर्वकाळ ।। १ ।।
त्याच नामाकर्वी झाली जगाची उत्पत्ती
एका आदामाची आणि साऱ्या मानवाची
निष्ठेने घेऊ आता आली हीच वेळ ।। २ ।।
मुखी नाम घेता त्याचे विश्व लोप होती
सुख शांती लाभे जे देह कष्टविती
एक सारे होउनी आता गर्जू त्रिकाळ ।। ३ ।।

## **७०४. प्रभू भोजनासाठी**

प्रभू भोजनासाठी ध्यानी मनी नाही भाव
मग उगाच का हो घेता प्रभू भोजनाची हाव
भोंदू साधू परी दाखवी प्रीती





प्रभू जीवना ऐसी नच शोभे वृत्ती
विनंती करी तुम्हाला हो हाच ख्रिस्त दास
तटस्थ ठेवा मना पवित्र आत्म्याची हो हाव ।। १ ।।
प्रभू भोजनी आम्हा मिळे आत्म्या शांती
जीणे जगता हो ब्रम्हांडी का धनाकडे धाव
सोडा सोडा सोडा धन द्रव्याची हो हाव ।। २ ।।

### ७०५. वेड्यांचा बाजार भरला

वेड्यांचा बाजार भरला विश्व रचिले त्याने
त्याला मनुजा कसा रचणार ।। धृ ।।
हाती देऊनी खोटी नाणी कर म्हणती त्या व्यवहार
एक फसवितो दुसरा फसवितो हेच यातले सार ।। १ ।।
मृगजळ जाणूनी त्याच्या मागे किती वेळ फिरणार
व्यर्थ कल्पना मला श्रमविते हेच यातले सार ।। २ ।।
विश्व रचिले त्याने त्याला मनुजा कसा रचणार
येशू वाचून नसता कोण हेच यातले सार ।। ३ ।।

### ७०६. अजुनी कळेना मानवा तुजला

अजुनी कळेना मानवा तुजला
जन्म तुझा कशाला रे ।। धृ ।।
सांग वराचे कुठे बा चुकले
पाठवूनी तुजला जग दाखविले
जगी भ्रमण्यात तुझे आयुष्य हे गेले
व्यर्थच का तू जगती रमला
मार्ग तुझा चुकला ।। १ ।।
नवरंगाने जरी तू रंगला
द्वेष भूषणे बहू तू नटलेला
जाशील रिकामा तू आल्या वाटेला
येणार नाही काही संगतीला
सर्वच ते जागेला रे ।। २ ।।





कोण कोणाचे आप्त हे सारे
ज्याच्या परी ते फिरते वारे
तुझ्याच हाती तोल तुझा रे
मोह मायेमध्ये का दंग झाला
जाण खऱ्या पित्याला ।। ३ ।।
दास विनवतो प्रभुनाम घ्यावा
आस धरावी तो भेटावा
मोक्षाची प्राप्ती साध्य करावा
आयुष्याचा जर का दोर तुटला
देह तुझा मातीला रे ।। ४ ।।

## ७०७. मना प्रभू तुज व्हावा ना

मना प्रभू तुज व्हावा ना
सोड सोड तव अभिमाना ।। धृ ।।
निंदा स्तुतीच्या भारांना सुखे वाटू दे पोरांना ।। १ ।।
सानपणा वा थोरपणा
नको भुलू तू मानापाना ।। २ ।।
मना वाहा रे प्रभूचरणा समग्र हो तू आपणा ।। ३ ।।

## ७०८. जगी खटपट

जगी खटपट करशी मानवा जगजेठी
शेवटी वरदान तुजला मुठमाती ।। धृ ।।
नको जीणे जगू रे असले प्रभुजीने नाकारलेले
तू शरण प्रभूला जावे सत्य तयाचे पाळावे
तू चपळ गतीने पळशी ।। १ ।।
तू भोळयांना फसविशी गरिबांना लाथा देशी
जगी हजार लबाडया करिशी या टिचभर पोटासाठी
उपकार प्रभुचे जाण ।। २ ।।





## ७०९. जा शरण प्रभूच्या पाया रे

जा शरण प्रभूच्या पाया रे
तू सोड जगाची माया माया रे ।। धृ ।।
कवडी कवडी जमवुनी माया
कोणी धजेना तुज रक्षाया
का घालशी जीवन वाया रे ।। १ ।।
मत लोभाचे मित्र सगळे
कोणी कुणाचे मजला न कळे
का व्यर्थ ही झिजवी काया रे ।। २ ।।

## ७१०. जगी या सौख्य नसे मनुजाला

जगी या सौख्य नसे मनुजाला बहू खटपट त्याला
करताना आयुष्य गमावला अरे रे रे रे रे जगी या ।। धृ ।।
घर पडके पैसे खोटे असुनी काय तयाला
दुष्ट पुत्र कपटी मित्र सोडून धावे तयाला
रस्ता चालताना अंधळा तो खड्डयात गेला ।। १ ।।
राजा कोपिष्ट अविचारी प्रधान सुख नसे रयतेला
दुराचारी चोरटा खजिनदार शिक्षा व्हावी तयाला
पोहता येईना तो त्याच्या संगे गेला तो बुडून मेला ।। २ ।।
गुरुजी क्षणिक शिष्य भाविक पुन्य न होई कुणाला
रोगी वैद्याने औषध घेउनी निरोगी कोण पहाल
ख्रिस्त दास हा प्रभुच्याचरणास लीन झाला ।। ३ ।।

## ७११. क्षमाशील व्हावे

आधी दुसऱ्याची देणे मी सोडवी
मग उडी घ्यावी पायापाशी पायापाशी ।। धृ ।।
क्षमाशील व्हावे क्षमेला पाळावे
नेमियेला न्याय तैसा द्यावे ।। १ ।।
कोण्या तोंडे म्हणू क्षमा कर
जर तुझ्यावर रोश माझा ।। २ ।।





दास म्हणे बापा देणे सोडायाला
आधी तू मजला सिद्ध करी ।। ३ ।।

## ७१२. मित्र आसावे ऐसे वाटे

मित्र आसावे ऐसे वाटे पाण्या मित्र झाले कैसे जगी पाण्या
मित्रा मित्राच्या तऱ्हा जाण म्हणे तू नरा ।। धृ ।।
रे नको जाळू तू तप्त लोहा मा ते तू मा ते तू
हो थंड तू सदा मजसवे मित्रा तू मित्रा तू
ऐक विनंती मम करू नको रे घात
परी ना मानी लोह जाळी पाण्या ।। १ ।।
ते जडवी जाउनी मैत्री आपुली कमळाशी कमळाशी
करी वसती हर्षूनी प्रफुल्लीत पल्लवी पल्लवी
कमळ डोले रागाऊन पाण्या टाकीले पाडून
परी तोषूनी म्हणे वस पाण्या ।। २ ।।
मेघसरी वर्षूनी पाणी पडे शिंपल्यात शिंपल्यात
शिंपले पोटी घेउनी करविले त्या मोती त्या मोती
होई किंमत बहूमोल नरा ख्रिस्ता मैत्री जोड
तया ठायी तारण मिळे आत्म्या ।। ३ ।।

## ७१३. सत्य असे तो सदगुणी

सत्य असे तो सदगुणी ऐसा त्रय एकच ख्रिस्त भुवनी
पिता पुत्र पवित्र आत्मा वसे मनुजा अंतःकरणी
लीनपणे नेई पाप्या उद्धरोनी
अरे सोडू नको भयरानी प्रभू माज सोडू नको भयरानी ।। धृ ।।
या भयरानी बहू अंधेरी, अरे अंधेरी दाटे नयनात ।। १ ।।
आसनी शयनी भोजनी विसर नाही माझ्या मनी
अरे प्रार्थना ऐकावी माझी प्रभू ।। २ ।।
हे प्रभू तू दयेचा सागर असशी करूणाकर
अरे प्रार्थना ऐकावी कानी प्रभू ।। ३।।





## ७१४. तृणावत हा नर देही

तृणावत हा नर देही बा अंतर शोधुनी पाही
सुखे पापपुन्यानी रे निर्जीव होऊन जाई ।। धृ ।।
जरी नाशवंत गणले वसे आत्मा तया ठायी
म्हणुनी तू जाणून घेई नर जन्म कशापायी
शापग्रस्त हो नरा रे मरण हा दंडच होई ।। १।।
परी निर्जीव देह घाली ते पुनर्जीवीत पाणी
पश्चतापे रूप धारी अमरत्व गुणा आणी
दास म्हणे करी रे त्रय येशू हा सवंगडी ।। २।।

## ७१५. सदाचरणाने पुढे वर्तताही

सदाचरणाने पुढे वर्तताही
तरी पूर्विचा दोष कमी नाही ।। धृ ।।
ज्ञान विद्या अधिकार कूळ या ही
द्रव्याने नसे मुक्ती पाई ।। १ ।।
प्रार्थना स्तुती भक्तीचा आवेश
शास्त्रावाचुनी देऊळ नाही ।। २ ।।

## ७१६. प्रीती करावी वैऱ्यावरती

प्रीती करावी वैऱ्यावरती धरु नको मनी राग
मानवा प्रभू वचनाला जाग ।। धृ ।।
सात नव्हे पण सत्तर वेळा नकोस करु काना डोळा
आज्ञा पाळून त्या प्रभुजीची कर पापाचा त्याग ।। १ ।।
सर्व श्रेष्ठ ही प्रीती ठरली आपल्या अंगी काही न उरली
जीने व्यर्थची होईल सर्व धरु नको मनी राग ।। २ ।।
स्वत: परीरक्षण पाहा करुनी तारण असे मनी धरुनी
सार्वकालीक जीवन मिळाले प्रभूचरणाशी जाग ।। ३ ।।

## ७१७. वैऱ्यावर प्रीत

गेला सांगून येशू ख्रिस्त करा वैऱ्यावर प्रीत ।। धृ ।।





रांगडी मानवी जात त्याची चाले हार जीत
पाहा उलटी कशी ही रीत ।। १ ।।
सारं काही बोलण्यातच काय आणलं आचरणात
ख्रिस्त ठेवलाय बायबलातच ।। २ ।।
ख्रिस्ताच्या पाठोपाठ झाली बघा फाटाफूट
एक आवडता एकांत ।। ३ ।।

## ७१८. प्रीत करा वैऱ्यावर

प्रीत करा वैऱ्यावर सदा माणसा हाच धर्म जाण बा ।। धृ ।।
जगती जगामध्ये जीवन जगता बंधू प्रितिचा भाव का आणिता?
दुष्टाइचे काटे तनुला जगी जन करी वल्गना ।। १ ।।
तुजशी धनाचा लोभ नसावा तरी दुसाऱ्यांच्या अमर सुखाचा
चारित्र्याची वाण कशाला नीती चित्ती धरीत जा जगा ।। २ ।।
श्री येशुच्या प्रीती धर्माचा भेद हा कळू द्या पतीत जगाला
सद्वर्तनी हा पटवुनी दावा
चीरकालीन झऱ्या वाहत ये धरा ।। ३ ।।

## ७१९. दिधले प्रभूने शास्त्रामधुनी

दिधले प्रभूने शास्त्रामधुनी, वचन तयाचे स्मर
प्रीती शेजाऱ्यावर कर ।। धृ ।।
बहू रंगाने तो नटलेला वेशभुषाने तो सजलेला
विसरू नको तू जगी उपकारा ।। १ ।।
प्रीती जगी ही श्रेष्ठ ठरली अगाध सागरा व्यापून उरली
विसरू नको तू जगी उपकारा ।। २ ।।
वैरी शब्द हा घेऊ नको मनी पाहू नको त्या क्रोध मुद्रेनी
पाप पुण्य हे तुलाच ठावे येउनी ख्रिस्ता स्मर ।। ३ ।।
प्रतिबिंब हे आरशातले अनुभव सारे जीवनातले
उंच हवेल्या महालमाडया कोसळती भूवर ।। ४ ।।

## ७२०. शेजाऱ्यावर

शेजाऱ्यावर खऱ्या मनाने प्रीत मनी तुम्ही धरा
त्यात आहे देव सारा ।। धृ ।।
शेजाऱ्याचे जे संकट समजावे तेचि आपुलेच
संकट समयी तव शेजाऱ्यास द्या तुम्ही सहारा ।। १ ।।
करा प्रीती तुम्ही स्वत:वर तशीच करा दूजांवर
वेळेला तुम्ही सर्व मिळुनी देवाची याचना करा ।। २ ।।
दिवा जळतो स्वत: तरी प्रकाश देतो दूजांवरी
या दिव्यासमान होऊन तुम्ही जीवन सार्थक करा
ख्रिस्ताने धडा दिला तुम्हा तोचि सांगा साऱ्या जगा
वेळेला तुम्ही मिळुनी देवाची प्रार्थना करा ।। ३ ।।

## ७२१. जीणे सुंदर

जीणे सुंदर सुंदर उद्यान बा विवेक तयात बीज जाण सत्वर
तेने सुखद दु:खद चाखी फळा
होउनी आपणा आपण जपे सत्वर ।। धृ ।।
कर्मकांडे त्वा साठविले धर्म सांड पाण्यास मरे
कदातरी होईल निर्जल ते मृगजळ शान्तवी कवण्या कसे
होई तगमग डगमग जीवा सदा तृषेनी पिडीले जबर ।। १ ।।
नाही प्रीतीविन जिव्हाळा जीव तारण्या शोधी मार्ग भला
पाप दंड वेतन मरणाचा खंड भरी स्व प्राणाचा
तोचि त्रैक्यची एकच येशू नरा पतितांचा करितो उद्धार ।। २ ।।
भाव मनीचा तू विसर आस तयावर टाकूनी चाल
खडतर हल्ले प्राणहानीचे आले तरी तो निवारणार
भय चित्तात नितांत राही तुझ्या तोषूनी करी रे अमर ।। ३।।

## ७२२. धर्माच्या खोटया साक्षी

धर्माच्या खोटया साक्षी
गावी हो गाजवावी ख्रिस्ताची ती प्रीती
वर्तुनी दाखवावी जगताला देखणी ।। धृ ।।





एक दूजाशी करावी प्रीती
करी ना का आजला ह्या जगी
स्वार्थांच्या ह्या मोहापोटी
फसविता बंधुशी किती
झुंडीच्या झुंडी खाती पातकी मधाशी ।। १ ।।
कुणी दु:खी तर कुणी आनंदी
राहिना का मग आपुल्या घरी
रडणाऱ्याचे आश्रू तुम्ही तर
पुसिता का आजला ह्या जगी
एकीनं एक खावी प्रीतीची भाकरी ।। २ ।।
भुकी भुकेच्या शोधासाठी
झारवांना भुमिवरी
तुझी तुलाच नसावी शुद्ध
वावरतांना रस्त्यावरी
गुंगीचा गोड गोष्टी झिंगताना शोभती ।। ३ ।।

## ७२३. लोपले मोल प्रीतीचे

लोपले मोल प्रीतीचे मानवा जगी जीवनाचे
भविष्यात कोण कुणाचे कसे होई रे सांग तुझे सांग रे ।। धृ ।।
रक्त अंजन नयनी घाली रे सुखासाठी जीव घेई रे
सुख त्या पोटी पाही रे पाही रे ।। १ ।।
परमार्थापोटी स्वार्थ रे फसवुनी तुला पाही रे
जीवाचे जीणे हे कसले हे पाही रे ।। २ ।।
मृगजळा सुखापाठी रे सुख प्रीतिच्या मध्ये रे
ते खरे ते खरे ।। ३ ।।

## ७२४. प्रेम संन्यासाने वागा

प्रेम संन्यासाने वागा जगी मानवात
प्रेमापोटी विश्व आले जगी साकारत ।। धृ ।।





प्रेममय पृथ्वी होती जगी अंधारात
सृष्टीला दृष्टी आली पहाटेस प्राण
पूर्णत्वाची जाणीव झाली हो पापी मानवास ।। १ ।।
पापी मानवास जेव्हा ग्रासितो सैतान
पाठवी मोह पाश जेव्हा घडितो हैराण
प्रकाशाची अंधराशी हो चाले झटापट ।। २ ।।
अंधाराचा साथी वेडा झाला देवभक्त
दैव्यतुल्य गोष्टी सांगे भोळया भाबडयास
दुष्ट घातपात मती हा जोडितो हैवान ।। ३ ।।

## ७२५. सांग मानवा

रे सांग सांग मानवा हा ख्रिस्त तुझा सखा
तू उचल रे क्रुस खांदी घेउनी चाल तू पुढती ।। धृ ।।
त्यापाशी भेद ना भाव कोणी रंक असो वा राव
तो असे देवाचा देव किती वर्णू तयाचा प्रभू
हो पुढे तुझ्या तो मागे कराया वाट उरी वरती ।। १ ।।
सुख शांती दया अन् प्रीती प्रभूपाशी सर्वच
जे शोध तयाचा करती ते होतील अमर
तो आला रे जगजेठी तुझ्यासाठी अमोल ती प्रीती ।। २ ।।
तू दवडू नको रे वेळ बघ निघून चालला काळ
का पाप खेळशील खेळ जाईल झोक
घे हाती क्रुस तळहातावरती कराया वार असा वरती ।। ३ ।।

## ७२६. ऐक मनुजा

ऐक मनुजा देव वचना ऐकता राहू नको रे
मोडून देव आज्ञा ईश्वरा दु:ख देऊ नको रे ।। धृ ।।
प्रथम आज्ञा ईश्वराची एक विभूती भूतली
भजू नको अन्य देवा प्राण येई जरी गळी
करुनिया कोरीव मूर्ती, मूर्ती पाया पडू नको रे ।। १ ।।





व्यर्थ नच घे देव नामा आज्ञा तिसरी जागुनी
पवित्र पाळ शब्बाथाला करु या श्रम सहा दिनी
जन्मदात्या आई–पित्याच्या सन्माना विसरु नको रे ।। २ ।।
खून चोरी करु नको तू कृती आणि ती नच बरी
साक्ष खोटी द्यावयाला नच विचारी कधी तरी
बधुनिया शेजारी सुखी तू हेवा त्याचा करु नको तू ।। ३ ।।

### ७२७. नको भासू नरा

नको भासू नरा जगी तू स्वतंत्र
तुझे एकसुत्र त्याच्या हाती
नको करु चेव नेईल सदैव
आपुल्या संगती युगानयुगे ।। २ ।।
आडल्या नडल्या जो का देई हात
तया ठायी नित्य प्रभू राही
दास म्हणे ख्रिस्त देई प्रेम पत्र
जेवू दे एकत्र सर्व लोका ।। ३ ।।

### ७२८. द्वारा आला

द्वारा आला रे आला रे आला रे तव द्वारी ।। धृ ।।
बुध्दी विस्तारी नर स्पर्शिले त्याने
ज्ञान पोटी शोधियले अंतर्यामी ज्ञान
अज्ञानाचे धर्म बिज ज्ञानवंत पेरी रोज
प्रीती रूपाने रूपाने रूजिले रूजिले ।। १।।
अमंगल मंगल कैसे धर्म स्थापीले
धर्म जीवनाचे सारे आत्मा एक झाले
घ्या ना हो नाम रूप येशू तारण करील तोच
सत्व रूपा धाडीले धाडीले ।। २ ।।
आज नाही उद्या केव्हा होतील एक
ख्रिस्त पेल्यामध्ये सारी मानव जात
दास म्हणे मर्म जाण आत्मा आत्माचे भोजन
आमंत्रण पावले पावले ।। ३ ।।





## ७२९. अंतरी सुख नाही मिळाले

अंतरी सुख नाही मिळाले जीवन वाया गेले ।। धृ ।।
संकट येता तुज मी स्मरलो मंगल देवा पायी बिलगलो
ईशसुखा आज मी बावरलो मरण उराशी ठेवले ।। १ ।।
उत्पादक तू सकल महीचा मुक्तीदाता तू आदामाचा
जपतो जपतो जप तुझिया नामाचा निज आत्मा तू तारियले ।। २ ।।

## ७३०. देव राज्याची येईल स्वारी

देव राज्याची येईल स्वारी नष्ट होईल तुझी तयारी ।। धृ ।।
तुज सत्वरी नच कळे ते तुज सत्वरी
काळ न्यायाचा आला जवळी ।। १ ।।
देवराजा असे तुजपाशी
साथ तुला रे सैतानाची साथ तुला रे सैतानाची
विसरलाशी देवबापाशी ।। २ ।।
दास विनवी सकल जनाशी
नम्र व्हावे प्रभू चरणाशी नम्र व्हावे प्रभू चरणाशी
जहागिरी मिळवा स्वर्गाची ।। ३ ।।

## ७३१. नाही विसरणार तुज हरघडी

नाही नाही विसरणार तुज हरघडी,
तुज हरघडी रे प्रभू तुज हरघडी,
नाही विसरणार तुज हरघडी ।। धृ ।।
तृणाच्या शैयेवरी बाळाचा देह
निद्रा बा लागे मजला गादी शिवाय
गुरांच्या गव्हाणीत सानुले ते थंडीनं
नव्हती पांघरण्या साधी धोंगडी ।। १ ।।
इवलासा काटा माझ्या पायात बोचला
मारीला तीर जैसा हृदयात भेदला
तुझ्या मस्तकी काटे कैसे तू सहन केले
बेईमान झाले शिष्य सवंगडी ।। २ ।।

शेरास सव्वाशेर ऐसा मी वागे
किती तू सहन केले अपमानाजोगे
थुंकी ते तोंडावरती घायाळ तुजला करती
रक्ताने भरली सारी कुडी ।। ३ ।।

### ७३२. बावळया मना रे

बावळया मना रे तुला लाज नाही
तू वेड्यापरी धाव घेशी कुठेही ।। धृ ।।
तुला तर कधी रे स्थिर राहवेना
चांगले कुणाचे मुळी पाहवेना
तुझी वासना कधी तृप्त होईल ।। १ ।।
तुझा ना तुझ्यावर भरोसा जरासा
हलव आणि चलव आधी रे तू पैसा
स्वरे ही गुणी वसती तुझ्याठायी ।। २ ।।
कलकपट आणि मत्सर देवा
स्वीकारीन का नित्य जेव्हा तेव्हा
किती रे पापी का कळले कोणाशी ।। ३ ।।

### ७३३. मन ऐकेना

मन ऐकेना ऐकेना दुर्विचारी केली दैना ।। धृ ।।
मन कोणाचे कोणाचे देई देवाला देवाचे ।। १ ।।
दास म्हणे हो मोकळा प्रभू ख्रिस्ताला ओळखा ।। २ ।।
प्रभूमधे मन राहो मनी प्रभू होवो ठावो ।। ३ ।।
होऊ देवाचे लेकरु, मी मी करुन नको मरु
हे देवाचे वचन ।। ४ ।।

### ७३४. अंतःकरण भूमी खोद

अंतकरण भूमी खोद नरा अंतकरण भूमी खोद
प्रभुच्या वचनांनी ख्रिस्ताच्या वचनांनी
एकनिष्ठेने कर पश्चतापाने कष्ट राहू दे विहीर जीवनाची ।। धृ ।।





तो माझी दबून पार गेला पाषाण हा
टाकी व्यापून साऱ्या भुतला हर्षे भरा
पाप पाषाण महान करी वसतिचे स्थान
तो जीवनी झऱ्या अडखळी ।। १ ।।
तया फोडण्या कर झणी त्वरा घेई सुरूंगा
ठाशी अशा रूपी दारू मुळापार सुरूंगा
पेटव प्रीतीची ज्योत नव जन्मीचा स्फोट
काढी फोडूनी साऱ्या पाषाणाशी ।। २ ।।
करी पुरे कष्टाने तुझ्या कामा कष्टी आधमा
जाशी फिरूनी तू हर्षेभरा निज धामा
आले सौख्याचे दिन वाहे झऱ्याचे नीर
तृषा हरपी तुझ्या रे आत्म्याची ।। ३ ।।

## ७३५. इश भक्तीचे बीज

इश भक्तीचे बीज घेऊ चला अंतर बागी लावू ।। धृ।।
पाप रूपी भूमी अतिकठीण ही अनुतापे नांगरू
विश्वासाचे उदक घालुनी सुपीकते माजी आणू ।। १।।
हाकृकर पेरी उमगू दे त्वरी खिस्तरुपी त्या अंकुरी
वाढ देवा परोपारी प्रितम छायेमध्ये बैसू
हेचि सौख्यस्थान रे कष्ट करी जाऊ ।। २।।
भुवरी डोले वृक्ष हा अमरण पुष्प फळाने प्रफुल्लतेने
तयाचे पोळते तुच करिता हे म्हणे नाश त्या पाहू
अमरत्व खाद्य देई सत्वर उल्हासे ते देवा
ऐसी संधी नको रे गमवू ।। ३।।

## ७३६. पाहून पाऊल सांगे

पाहून पाऊल सांगे मागाडी पळ्या कुणीकडे गेला रे ।। धृ ।।
तैशी नराची बाह्य दावी अंतर्याची कृती
आपण होऊन जडीत केले प्राण कुडी अभिलाशा रे ।। १।।
अभिलाशेच्या धाऊन पाठी पळ्या पडे अंधारी





प्राण भया पळ्या लोभापायी ग्रासी असूर अहिताला रे ।। २।।
अविरत सोडूनी प्रीत पकडी पळ्या धरिले वेठीशी
असुरा संगती सृजन आणि पळ्या प्रितीस निज धामा रे ।। ३ ।।

**७३७. अथांग मन मना**

अथांग मन मना थांग लागो प्रीतीचा
उमगू दे तुझा रे मार्ग सत्य जीवनाचा दैवी शक्तीचा ।। धृ ।।
विश्वास मना विस्तरी मुखे उच्चारी नाम तव देवा
तू होशील पावन जेव्हा पाचारी तुची बा मजला घाली नवजन्मा
होऊ दे दयाळा संयोग आपुला साचा ।। १।।
मृत्युत घेतली उडी जरी कुजे कुडी भूमीसम देवा
तू येशील न्यायासनी जेव्हा तै देशी माते तू पार्थवी देहा
घेशील जाब बा न्याय देशी सत्याचा ।। २ ।।
आशेची ज्योत तेवली अमर जहाली तुझ्या करवी देवा
तू होशील तू होतास साथी जेव्हा तै लागे थांग प्रीतीचा अमरत्वाचा
दाविला ख्रिस्ता त्वा मार्ग सत्य जीवनाचा ।। ३ ।।

**७३८. आशा हीच मनाची कोमल कळी**

आशा हीच मनाची कोमल कळी
फुल होऊन पडावे त्या प्रभुच्या गळी ।। धृ ।।
हा द्राक्षाचा मळा कोणी लाविला
या मळ्याचा मालक कोणी पाहिला
मळ्याचा हा मालक प्रभू आहे माळी ।। १ ।।
नाही शेतीला खत नाही तिला पाणी
खडकाळीवरची जमीनही सुकल्यावानी
देवाची ही लिला प्रभुची ही लिला ।। २ ।।

**७३९. जगती जगावे हे मानवा**

जगती जगावे हे मानवा जनसेवेसाठी जगती जगा जगा ।। धृ ।।
जीवन म्हणजे वाट मृत्युची लढवित राहणे युद्धे किती किती





विजयी व्हा पापावरती ।। १ ।।
सुख दु:खाशी समरस व्हा तुम्ही संधी घ्या तुम्ही जगती राहुनी
सुख संपत्ती जगा नेई विनाशा ठायी
आज आहे ही घडी ।। २ ।।
निज देहाशी झिजविते चंदन जगती राहुनी देते सुगंध
ऐसे झटावे सर्वासाठी ।। ३ ।।
सेवा नाही म्हणूनी घ्यावी आलो कराया सेवा जगाची
श्री ख्रिस्ताची ही वाणी ।। ४ ।।

## ७४०. जनसेवेशी का झिजलशी सांग

तू जनसेवेशी का झिजलशी सांग
तू अंतर्यामी मनास विचारी
का शिणला जगती फार ।। धृ ।।
दुरितांचे दु:ख त्वा सोशिले
ईश चरणी हे आपुले प्राण
परतुनी ना तुजला ते मिळाले
जनसेवेचा लाभ ।। १ ।।
पर संसारी जग्ये निंदीले
त्वा विचारा तुडविले
भूषण जगा ते त्यांना मिळाले
तुजला का हे ताप ।। २ ।।
तव लाभाचे दान प्रभुचे
प्रभू चरणी तुज मरण बरे
जगणे मरणे त्या सोपिले
ख्रिस्तासवे तुज त्राण ।। ३ ।।

## ७४१. वचन आई बापाचे मोडू नको रे

वचन आई बापाचे मोडू नको रे
मानवा तू सत्य वचन सोडू नको रे ।। धृ ।।
बालपणीचे पुरविती लाड





जपले तुजला जीवा पल्याड
म्हातारपणी त्यांना तू दु:खऊ नको रे ।। १ ।।
आई बाप जोवरी आहेत जिवंत
सेवा कर त्यांची तू हो रे पुण्यवंत
ते मेल्यावरती रडून छाती बडवू नको रे
मानवा तू सत्यवचन सोडू नको रे ।। २ ।।

## ७४२. आई थोर तुझे उपकार

आई थोर तुझे उपकार (२) वदत विनोदे मूखात सोडी
कोण दूधाची धार ।। धृ ।।
नीज न ये तर गीत म्हणावे प्रेम तिचे अनिवार
येईल दुखणे तेव्हा मजला कोण करी उपचार ।। १ ।।
आई थोर तूझे उपकार कोण कडेवर घेऊन फिरवी
चिंता लागे अपार बालक दुर्बल होते तेव्हा
रक्षण केले फार त्वाची शिकवीले वाढविले तू
आहे मजवरी भार ।। २ ।।
स्मरण तुझ्या या दृढ़ ममतेचे होते वारंवार
नित्य करावे साह्य तुला मी हा माझा आधिकार ।। ३ ।।

## ७४३. विसरू नको रे आईबापाला

विसरू नको रे आई बापाला, सोडुनी सारी माया
काया झिजवून तुझ्या शिरावर घरली सुखाची छाया
वेडया मिळणार नाही तुला आईबापाची माया ।। धृ ।।
तुला मिळेल बायकां पोरं धन दौलत अन् हे सारं
स्वार्थाने बरबटलेला हा मायेचा बाजार
म्हातारपणी तू आईबापाला लावशील भीक मागाया ।। १ ।।
तुला मिळेल बंगला गाडी शेतीवाडी मोटारगाडी
आईबाप मिळणार नाही ही जाण ठेव रे थोडी
विज्ञानाच्या युगात जाशील देवाला मागाया ।। २ ।।
या तिन्ही जगाचा स्वामी आइविना भिकारी





घे समजून उमजून वेडया नको होवू तू अविचारी
बुंदी लाडूच्या पंक्ती घालशील तू नंतर जेवाया ।। ३ ।।
आई बाप जीवंत असता नाही केली त्यांची सेवा
ते मेल्यावरती तू म्हणशील देवा देवा
जीवनातली ही अमोल संधी नको घालवू वाया ।। ४ ।।

### ७४४. आयुष्य मोलवान

आयुष्य मोलवान मनुजा का करिशी धुळधान ।। धृ ।।
अबला असे तुला काही न उमगे
अंगाई अंकी क्रिडे अनुरागे
वृथा दंभ अभिमान ।। १ ।।
येईल घटका तारुण्याची
विश्वसुखे करी हानी जीवत्म्याची
सौख्य नच परिमाण ।। २ ।।
दलित जहाली तनू वृद्धकाळी
तै म्हणे करुणा ऐक मम हाळी
परी नच उरे आवसान ।। ३ ।।

### ७४५. अमोल आत्मा देह दिधला

अमोल आत्मा देह दिधला पाहा मनुजा रे तुला ।। धृ ।।
चिंधी आहे सोन्या करिता रक्षण करण्याला
सोने हरपुनी गेल्यावरी जन फेकिती त्या चिंधीला ।। १ ।।
शरीराचा करून पिंजरा आत्मा राघू बसविला
राघू उडुनी गेल्यावरी जन फेकी त्या पिंजऱ्याला ।। २ ।।

### ७४६. काय फुका तव जन्म

काय फुका तव जन्म मनुजा ठेवी रे रूधी ख्रिस्त नाम हे संग रे ।। धृ ।।
काल विद्या धन जरी तुज असली
पुज्य देवता होऊन बसली घाल जीणे असो तव प्रभुवीन सारे ।। १ ।।
घमेंड घातकी करुणा तुजला वधिले दाविदाने गालीयाथला





लीनपणा हा कित्ता प्रभू येशू रे ॥ २॥
दास अमुचा विनवितो सकला प्रश्न विचारीतो सांगा मजला
सर्वकला संपन्न कोण असा झाला रे ॥ ३ ॥

### ७४७. क्षण सुखाची वृक्ष सावली

क्षण सुखाची वृक्ष सावली जीवन जाता सांज ही झाली ॥ धृ ॥
काळ वेळ मंद गतीचा तुचि पाहे क्षण आत्ताचा
सौख्य विहारे तृप्ती जाणली ॥ १ ॥
ताप देही भास कशाचा मध्यान टळते वेळ दुपारचा
हीच गत नरा आपली ॥ २ ॥
विश्‍व पसारा मायाजाल खचली हाडे गेला काळ
मरणे भोग कोण चुकला ॥ ३ ॥
शीतल मनाची वाण पडली अंतीम ठायी जीवना मुकला
गणती जीविता स्मृती सरली ॥ ४ ॥

### ७४८. जगाला मेलेले

जगाला मेलेले जगासाठी मेले
जगासाठी झाले चिरंजीव ॥ धृ ॥
जगाने निंदीले जगाने वंदीले
जगासाठी झाले दीन दु:खी ॥ १ ॥
ख्रिस्तमय मन ख्रिस्तमय वाचा
देह ही वाहिला सदा ख्रिस्ताला ॥ २ ॥
वधस्तंभ वाहे नित्य खांद्यावर
करू आम्ही राज्य जगावर ॥ ३ ॥

### ७४९. भरणा तू तुझा रे

भर भर भरणा तू तुझा रे देवाघरी जाणे मन विचारी रे ॥ धृ ॥
तारुण्यात तू त्या दिवसाचे सुख भारी देहाचे भोगिले
देवाघरी तुझ्या देवाजी रे आले भंगले शरीर देवाशी लाजे ॥ १ ॥
उभे उंबऱ्यावरती पाउले ओळखिचे तरी न ओळखिले
अंत:करण देवाजी पाही रे गुंतले पापात फेड नाही रे ॥ २ ॥





## ७५०. अंधकारामध्ये लपविले

अंधकारामध्ये लपविले व्यर्थ दिवस ज्याने
भूषण तुला ते वाटे नरा रे
निंद्य तुझे हे जगणे ।। धृ ।।
बहू गुणसंपन्न शरीर तुझे ते देवाजीने तुज घडविले
भ्रष्टीत केले तू मीपणाने
पंक्ती तुझ्याने जगती घडावे सत्कर्म सारे ।। १ ।।
लपुनी छपुनी करी पाप जगती साधुसंताचे रूप दाविले
जगी न छपती तुझे दुष्ट वर्तन हे
शुद्ध मनाचे देवा आवडे ते देवा साजे ।। २ ।।
ख्रिस्ती शील तुझे का बिघडावे
ख्रिस्त नीतीशी त्वा झगडावे
मिटते समयी त्वा जगी उमलावे नाम जगाने स्मरावे ।। ३ ।।

## ७५१. धर ध्यानी धर

धर धर धर ध्यानी धर देव तुझा तो ध्यानी धर
काय तुझा परमार्थ काय काय तुझे मर्म जाण रे ।। धृ ।।
कोण कुणाचा कोण मी उमज बा रे
कोठुनी आलो कोठे जायचे समज हे सारे
जाण अंतरी नरा अंतरी ।। १ ।।
देव माझा रे मी देवाचा असो सदोदीत
अमर आत्मा आणि अमरत्व हे सदैव रे सत्य
जाण अंतरी नरा अंतरी
अविनाशी ऐश्वर्य अविनाशी कर्म जाण रे ।। २ ।।

## ७५२. दुष्ट कपटी आप्त मित्र

दुष्ट कपटी आप्त मित्र करुनिया गोळा
जगती नरा रे राहिलास भोळा ।। धृ ।।
घेरावा करती तुजला सारा मायाजाळ
त्यामध्ये धुंद असशी सांज सकाळ
टिळा मोहमायेचा लावलास बाळा ।। १ ।।





स्वधर्माचे मर्म कधी तुझ्या ध्यानी
पालथ्या घडयावर तुझ्या सदा असे पाणी
रात्रंदिन तू कर्माच्या हो जपशील माळा ।। २ ।।
ज्ञानवंत ज्ञान पेरी करुनी कथन
रसपान करुनी तयाचे होई रे सज्ञान
चाले सुमार्गी वाटे हो ।। ३ ।।

## ७५३. जगाच्या पापाची

जगाच्या पापाची मिरविती दिंडी
निजपाप झुंडी झाकी सदा ।। धृ ।।
आपुल्या मुलाला म्हणे बाबुराव
दुसऱ्याच्या सदा कारटा कारटा ।। १ ।।
आपुल्या डोळयात थोरले मुसळ
दुसऱ्यांचे का काढीतो कुसळा ।। २ ।।

## ७५४. दु:ख भरे अनिवार

दु:ख भरे अनिवार सुख त्या पोटी देणार
जाणी अपुला नरा तो बुद्धीचा सुत्रधार ।। धृ ।।
बुद्धी शक्ती युक्ती मुक्ती नानाविध वरदाने देवे दिधले
नरा ते सर्व प्रीतीच्या कारणे
म्हणूनी त्यानुसार होई बुद्धीचा विस्तार
नर जन्मीचा खरा होई जगी नरा सार ।। १ ।।
नाही होणे जगामधी तुझ्या हाती काही रे
कर्ता हे करविणारा तुझ्या बुद्धीपायी रे
बुद्धी ज्ञानाचे मूळ आहे आत्म्याचे मजूर
देहासह अहर्निश करी रोजगार ।। २ ।।
दास म्हणे बुद्धेश्वर राही नित्य बुद्धी पार
नेत्री कोण न दिसेल अमंगळ देहामुळं
राहू नको तू अज्ञान येशू त्रैक्य हाची जाण
तया चरणी लागून भोग सुख पारोपार ।। ३ ।।





**७५५. चालली आज सारे**

चालली आज सारे पुरारे पुरारे
आधी करणे जे केले फुकाचे
झोपलेल्या आता उठवावे
त्रैक्यत्वाचे ऐक्यत्वाचे धरणे धरारे ।। धृ ।।
ज्या दु:खाचे दोषमुळे तीच उपटुनी चाल पुढे रे
फुल फुलण्या फुला संगतीने
गुणवंतांचे गुण आचरावे ।। १ ।।
मेलेल्यांचे मन जागे जित असता तुम्ही मरता रे
मर्त्य जीवा तुम्ही जगवा रे हेच जगणे तुला भुषणाचे
जाता पुढे चला संगे एक दुसऱ्याशी घाला मिठी रे
भाऊभावा का हीन लेखता रे
काळोखाची दिशा हाटवा रे ।। ३ ।।
या देहाचे आज तुकडे करताना तुम्ही खंडता रे
हात पाय कर्ण आणि डोळे ऐकोप्याने तुम्ही वाढवा रे
विवेकाने विचाराचे भय ख्रिस्तात ते विसरावे ।। ४ ।।
मागणे मान्य तुला जगाचे एक ख्रिस्ताचे का तुकडे ।। ५ ।।

**७५६. जाग तीच्या घ्या हाती मशाली**

जाग तीच्या घ्या हाती मशाली
निद्रिता आज जागे कराया
नाश मार्गाने जातात जे जे
त्याजला लावू मागे फिराया ।। धृ ।।
व्हा शहाण्या कुमारी प्रभूच्या
नका जाऊ आहारी निद्रेच्या
व्हा सामोऱ्या तैयार त्याच्या
वर ख्रिस्त त्याला वराया ।। १ ।।
सुख अविनाशी घेऊ नका हो
लोभमय जीवन पाहू नका हो
कोणी झोपेत राहू नका हो





टपला सैतान धूर्त धराया ॥ २ ॥
जगी राजा हा सैतान क्रूर
त्यानेच केला सर्व कहर
असे अंधरात चालतात जे जे
दाखवू ख्रिस्त मार्ग तयाला ॥ ३ ॥
आले जवळी हो न्यायाचे दिन
दक्ष राहू आज घ्यावया तारण
ख्रिस्त वाटे खरे जीवन
नाम गोड त्याचे स्मराया ॥ ४ ॥

**७५७. नाही निद्रेची घडी**

अंती निद्रा तुला जागवया आली
ख्रिस्त युगानूयुगे सवंगडी ॥ धृ ॥
कुभावनांची घेउनी नशा धुंद होउनी करी दूर्दशा
नेत्र असूनी तुला अंधळा का झाला नैश्वर्य नृत्य दंगला
माडी असता म्हणे झोपडी
बुद्धी असता का भ्रष्ट कुडी ॥ १ ॥
तोचि जावूनी होई घरा धातुक्यांची पाहूनी निद्रा
प्रभू राही खरा ठोकी हृदयी द्वारा
वदे उठ हो जाग निद्रिस्ता
आवर निद्रेची बा झापडी
आत येण्या त्या खोल कडी ॥ २ ॥
प्रभू देव जयाशी तारी
कोण लोका तयाशी मारी
जाळी पाप केर निघे भक्ती धुर
ख्रिस्त करील जगी साकार
निद्री असता लाजार कुडी
उठविता झाला सवंगडी ॥ ३ ॥





## ७५८ त्यागावी बाग

त्यागावी बाग जगी जाण ही
जैसे ख्रिस्ताने दाखविले त्यागुनी ।। धृ ।।
प्रीती वर्षविली वृक्षवल्ली फुलवी
पापे भुवरी तप्त जाहली
मानवाच्या अंतरी ही ज्योत्स्ना चेतवी
दुष्ट नरी सैतानाची ज्योत पेटवी ।। १ ।।
मानवा चित्ती दुष्ट प्रवृत्ती
वाढविली सैतानाने काय भूवरी
हाय आज मानवाची झाली फजिती ।। २ ।।
प्राणा अर्पुनी पाप्या उद्धारी
तारणाची वाट त्याने केली मोकळी
मृत्यू विजयात उठे ख्रिस्त नाम ही ।। ३ ।।

## ७५९. बेईमान आम्ही

बेईमान आम्ही मानव सारे इथे न तुजला नाव
देवा जगी न तुजला भाव पैसाही देव पैसाही नाव ।। धृ ।।
तू बघतोस जनही जरी बघती हे का आम्हास न कळे ?
धिटाई करुनी बघती स्वार्थापायी आम्ही आंधळे
मांजर जैसी डोळे झाकूनी उघडी दूधाचे सुगडे
तैसे देवा आम्ही झाकितो तुझे सदाची उघडे ।। १ ।।
शेजाऱ्यावरी प्रीती करा रे असे रोज रोज वदतो
आवाज हूकमी घसा फोडूनी जनतेपुढती बडबडतो
शेजाऱ्यावरती संकट येता लूट, तयाची निंदा
स्वधर्माचा अभिमान परि चार विषयाचा धंदा ।। २ ।।
रानी वनी भूकमळे हे का दिले ख्रिस्ताने दाखले ?
ज्या ठायी असे धन तेथे जाई मन ऐसे प्रभू का वदले ?
रोजची भाकर एकची सदरा हेची अमुचे खास
त्याहुनी ज्यादा आम्ही कमवितो ही पापांची रास ।। ३ ।।





सुख जगात भोगीत असता तुझा पडे विसर
प्रसंग बाका आल्यावरती मग आठवतो ईश्वर
धावा करिता धावत येशी किती आम्हावरी प्रीत
गरज सरो अन वैद्य मरो बा हीच आमुची रीत ।। ४ ।।

**७६०. काय देऊ मी जाबजबाब**

प्रभुजी काय देऊ मी जाबजबाब
आठविता तो दिन न्यायाचा होतो थरकाप ।। धृ ।।
मानव जीवन मजला दिधले विसरुनी तुज पशूसम चारीले
जीवनी माझ्या पडला सारा सैतानाचा दाब ।। १ ।।
दडपूनी गेलो बहु अधभारे त्राण या जीवनी नच उरला रे
ज्या मापे मी भरले तेची पदरी माझ्या माप ।। २ ।।
व्यर्थ हे जीवन ख्रिस्ता तुजविनमेल्यासम मी जीवंत असून
अज्ञ बैसलो चरणा तुझिया करीत रे मी अनुताप ।। ३ ।।

**७६१. विसरु नको रे प्रभू वचनाला**

विसरु नको रे प्रभू वचनाला वेडा का झाला
जगाचा अंत समय आला ।। धृ ।।
चित्त काळाचे आज पालटले राज्यवरती राज्य उलटले
भूकंपाच इकडे तिकडे ।। १ ।।
विनाशाचा आला काळ जागोजागी पडे दुष्काळ
प्रभुविना नच काही महान ।। २ ।।
रोगराईला त्रासूनी गेला महापुराने नाश रे केला
आहे का शांती तुझ्या जीवनी ।। ३ ।।

**७६२. पाहा दंभ करुनी हा भजतो**

पाहा दंभ करुनी हा भजतो कसा स्मूर्तिला
आळवितो गाउनी घाली तो माला गळा
देवा देवा करुनी धावे हो खुळा खुळा ।। धृ ।।
ना वसे तो ना वदे ही चेतनांचा गंध ना हो
हा हा सारा वरी तिच्या हा ठेवी भाव खुळा





भावनांचा वर्षाव करूनी मना वेढीला
मनामध्ये नाही भाव हा पूरा ।। १ ।।
मनामध्ये भाव असा ठेवूनी हा भजतो कसा
अशा या मानवा अशा या मानवा
धिक्कार असो मानवा
पाषाणाशी अर्पितो ईशरुपाच्या फुला
मनी ठेवा देवावरी भाव हा ।। २ ।।
दृष्य शिला पाळणारा खोदू नको तिच्या मुळा
बीज पेरिले सत्कर्माचे जाण मन्मनी नरा
असा दंभपणा भाव सोडूनी हो वेगळा
ठेव मनामध्ये जाण ख्रिस्त हा ।। ३ ।।

## ७६३. पत्र लिहितो प्रभुला

पृथ्वी ही गोल, पृथ्वी ही गोल
पत्र लिहितो प्रभुला अर्थ खोल ।। धृ ।।
अवाढव्य वृक्षाला का फळे छोटी छोटी
भूमीवरच्या वेलीला का फळे मोठी मोठी
चूक झाली तुझी देवा खरे बोल ।। १ ।।
तुझे नाम घेती त्यांना संकटे का येती
देवाला न ओळखणारे सुखी का राहती
तुझी कल्पनाच इथे ठरली फोल ।। २ ।।
स्वर्गातील न्याय पृथ्वीवरी यावा
शब्द बहुमोल याचा उलगडा तो व्हावा
शंभर नंबरी सोने झाले मातीमोल ।। ३ ।।

## ७६४. आज आलास तू उद्या जाशील तू

आज आलास तू उद्या जाशील तू
का जीवा येथे रमलास तू ।। धृ ।।
नश्वर तव काया नश्वर तव सारे
जे दिसते नयनी मृगजळ जग सारे





मोह मायात का दंग झालास तू ।। १ ।।
कांता सूत कन्या व्यर्थ तुझा परिवार रे
लाभेल चैन तुला ठोक प्रभूचे द्वार रे
कोणी नाही तुझे का रमलास तू ।। २ ।।
सोड तू जगमाया ठेव मनी प्रभू नाम रे
लाभेल शांती तुला संकट समयी आराम रे
नाम त्या येशूचे का विसरलास तू
का जीवा येथे रमलास तू ।। ३ ।।

## ७६५. एकच जन्म एकच मरण

एकच जन्म एकच मरण नाही कधी चुकणार
कसे होईल तारण तुझे माझे (२) ।। धृ ।।
सत्त्यासाठी कैक मेले नाव अमर झाले (२)
संदेष्ट्याने भविष्य कथिले तेही जगती आले होते (२)
नको विसरू देवबापाला हेच खरे साधन ।। १ ।।
घेशील बोध शुद्ध देवाच्या वचनाने ख्रिस्ताच्या
नित्य करितो त्याचे चिंतन मिळे आशीर्वाद मरण
नोहा सारखे गेले तरून नाही कधी दिसणार ।। २ ।।

## ७६६. सोड जगाची माया

मातीचे घर बघ हे नश्वर जाईल पुढती वाया
सोड जगाची माया मनुजा सोड जगाची माया ।। धृ ।।
अभिमानाने म्हणशील आपले
किती सजविले किती ही जपले
तुफान वारा सुटतो सागरा ढासळतो हा पाया ।। १ ।।
मातीचा तू माती असशी अंती जग हे सोडून जाशी
तू रे पाहुणा दोन दिवसांचा या वस्तीला राहया ।। २ ।।
कायम हा सुटतो सहारा मागे असतो व्यर्थ पसारा
माता पिता आणि बंधू सखाही कोणी ना येती साह्या ।। ३ ।।
उत्पन्नकर्त्या परमेश्वराला जा सामोरा या समयाला
विश्वास ठेऊनी त्यावर अवघा लाग प्रभूच्या पाया ।। ४ ।।





## ७६७. ज्वालावरची पतंग

ज्वालावरची पतंग तू घिरट्या घालू नको
जीव जाळू नको टाळ धोका रे टाळ धोका रे ।। धृ ।।
तुझा नाजूक रे जीव मला येती तुझी कीव
काय लागलास इर्षेला जरा जपून वागावं
रंग बेरंगी पंख तुझे रे उडणारे ।। १ ।।
बघ भूताचा बाजार तुला दावील आधार
म्हणे तू भितोस कुणाला जा घालण्या फुंकर
सूर्यापुढे तू दिसे काजवा गती ऐशी ना बरी ।। २ ।।
जीत सैतानाने केली वाट स्वर्गाची गमविली
त्या नरकाच्या कुंडाची शिक्षा देवाने दिधली
दास म्हणे ये प्रभुला ज्योतीच्या द्वारे ।। ३ ।।

## ७६८. क्षणात आहे

क्षणात आहे क्षणात नाही जीव असे बापुडा
जीवन हे पाण्याचा बुडबुडा ।। धृ ।।
पापांचा घडा मातीसमान कधी फुटेल कोणी न जाण
पापांचा कोसळेल घडा ।। १ ।।
मुठी बांधूनी जन्मास येशी खुल्या हाताने माघारी जाशी
जीवनाच्या पडतील घड्या ।। २ ।।
माती असशी मातीत मिळशी उंच मनोरे किती बांधशी
ऐक मनुजा भज भगवंता ।। ३ ।।

## ७६९. खाली हाताने गेला

जगात जो जो आला खाली हाताने गेला
पैसा नवाही कोणी संगतीला नाही नेला ।। धृ ।।
गर्व असा धरू नाही गर्वाचे घर खाली
दुपारी ते उन्ह असे अंधार संध्याकाळी हरएक येथे आला ।। १ ।।
आई वडील भाऊ बहीण अनेक गोत्र सारे
पैशासाठी स्वार्थासाठी जमतात मित्र सारे
पाणी वाहुनिया मेला कष्टाळू प्राणी हेला ।। २ ।।





राजा राणी मोठा धनी देईना कोणी साथ
म्हातारपणी महागुणी मुलगाही मारी लाथ
तरी पाजशी तयाला रक्ताचा भरुनी प्याला ।। ३ ।।
राव असो रंक असो सर्वांना एक जागा
कर भले नको बुरे दास असेच वागा
मृत्युच्या पाशातून सुटला ना गुरू ना चेला ।। ४ ।।

### ७७०. घडी दो घडीचा डाव जगाचा

त्याग मनुजा स्वपापांचा
दवडू नको रे क्षण मोलाचा ।। धृ ।।
घडी दो घडीचा डाव जगाचा
स्तवर करी रे स्विकार प्रभूचा
उद्धार घे करुनी जीवनाचा ।। १ ।।
कोठे बहकशी ते कोण जाणे
अंतसमयी तुज प्रभुपाशी येणे
तोच न्यायदाता तुझा आणि माझा ।। २ ।।
करा पश्चाताप व्हा पाप मुक्त
खिस्ताने तुम्हासाठी सांडीयेले रक्त
खुला केला त्याने मार्ग जीवनाचा ।। ३ ।।

### ७७१. आले देवाजीच्या मना

आले देवाजीच्या मना तेथे कोणाचे चालेना ।। धृ ।।
नको सोडू धर्म नीती विश्वास कर प्रभुची भक्ती,
साक्रामेंत घेई पाप्या मना मिळे तारण जीवना ।। १ ।।
कांता सूत आप्त विसर सारे
येईल मृत्यू कोण सोडविल बरे?
आत्मा तुझा मित्रा पाहुनी जाई, जाई टाकूनी मातीला ।। २ ।।
प्रभुनाम ठेवी हृदयी भरोनी
पवित्र शास्त्र घ्यावा वाचोनी
पिता, पुत्र, पवित्र आत्मा काढी क्रुसाची खूण ना खूण ना ।। ३ ।।





## ७७२. जीवंत असता

जीवंत असता पायी तुडविती मरता खांद्यावरती
जगाची रीत ऐसी जगाची रीत ऐसी ।। धृ ।।
चिंध्या कपड्याच्या झाल्या उघड्या उन्हाने देह शेकला
मेल्यावरती त्याच देहा कोऱ्या कापडाने सारा झाकला
स्तुतीसुमनांनी गुछफुलांनी सर्व अंग मढविती ।। १ ।।
कन्या पुत्र बाईल, बहिणी भाऊ सगेसोयरे
चला रे वेळ किती झाला
म्हणती आटपा तयाला उचला रे
मुले रडती आणि रडविती आवघे ऊर बडविती ।। २ ।।
पुरुनिया पोटभरुनी चाळीसाव्याला सारी जेवणे
जमलेली म्हणती ख्रिस्तदास होते किती चांगले
उरली सुरली रक्षा अस्थी उकरुनी वर काढिती ।। ३ ।।

## ७७३. पाप पुण्याच्या राशी

पाप पुण्याच्या राशी सांग कोठे घेऊन जाशी ।। धृ ।।
अहंमपणाची मापे अवघी खोटी ठरतील वेड्या
एक खंडीची रती न पुरती भरेल का भुललाशी ।। १ ।।
तुझा तुला हा मला आवड वाटे नच लाखाचा
भेसळ सारी पाहुनी येईल वीट परी देवाशी
जुणे आधीचे तसेच ठेवूनी कचरा डोईवरती
येईल कळूनी तेव्हा मला तुझे रे तुजशी ।। २ ।।
दारामध्ये पाय ठेविता कृत्यकर्माची झडती
येईल कळूनी तेव्हा मुला तुझे रे तुजशी ।। ३ ।।

## ७७४. दोनसुत

दोनसुत आता मी भूमिच्यावरी
सहा फूट जायचे मजला माझ्या घरी ।। धृ ।।





बाळपणापासुनी तुचि सांभाळीले
अन्नपाणी देउनी मला पोसविले
किती प्रभू तू उपकारी ।। १ ।।
हे मिळविले ते मिळविले प्रभुने दिधले मला न कळाले
किती प्रभू तू उपकारी ।। २ ।।
झणभंगूर हे जीवन माझे कधी मरण येई मला न समजे
किती प्रभू तू उपकारी ।। ३ ।।

### ७७५. घेई अनुभव

घेई अनुभव कोणाचे नाही कोण
घेई अनुभव कोणाचे नाही कोण
अंतकाळी जन पारखे होती ।। धृ ।।
भांबावशी का रे माझे माझे म्हणता
कोण हा कामाशी कोण रे आला ऐसा ।। १ ।।
जवळी असता धन आणि सत्ता
तेव्हा म्हणती सखा आणि दादा ।। २ ।।
ऐका ख्रिस्त जन प्रभू वाचून
तारण दिधले तोचि महान ।। ३ ।।

### ७७६. जपुनी मानवा

जपुनी मानवा सांभाळ तुझा तोल
तुझ्या कल्पना साऱ्या बनतील मातीमोल ।। धृ ।।
ओळख मनुजा माझा इशारा
फसवील तुजला मोह पसारा
मृत्युच्या दरीत जाईल तुझा तोल ।। १ ।।
क्षणभंगूर सुखी लागेना गोडी
अडकेल कायम माया जाळ बेडी
रतेची लाज न लुटे फिरतील गोलगोल ।। २ ।।
नरभक्षक जगी मित्र शोधती
आज्ञा अटीची तुडवून छाती
शिकवण प्रभुची ठसवी बहूमोल ।। ३ ।।





## ७७७. चुकले मरण कुणाशी

चुकले मरण कुणाशी, चुकते मरण कुणाशी
जे जे जन्मले मरण तयाशी अखेर मातीत मिळशी ।। धृ ।।
मानव जन्म हा सेवेसाठी
सेवा करावी दीन दुखीतांची
मरण लिहिले नशिबी ।। १ ।।
जन्मावरती प्रेम करावे
प्रीती धर्माने जीवन जगावे
मरणे निसर्ग कृती ।। २ ।।
झाले कितीतरी थोर विभुती
विजयी कोणी मरणावरती ?
ख्रिस्त हा एक प्रचिती ।। ३ ।।

## ७७८. तऱ्हा उपराटी

तऱ्हा उपराटी सारी हे जगा तुझी अशी
कशी ही तऱ्हा उपराटी सारी ।। धृ ।।
जीवंतपणी ना देती कुणी कुणाला
मेल्यावरी शोकाने देती खांदा
जीवंत धरी अबोला बोल धन्या म्हणती मेल्यावरी ।। १ ।।
जीवंतपणी ना घाली कुणी कुणा जेवू
मेल्यावरी दिन घालुनी घाली जन जेवू
जीवंतपणी धरी सूड द्वेष हेवा
धन्य म्हणती मेल्यावरी ।। २ ।।
दास म्हणे ख्रिस्त तुझ्यासारखे
ठरविले आपण जगत्पाला खोटे
क्लेश सोसियले त्या मारियेने
धन्य म्हणती मेल्यावरी ।। ३ ।।

## ७७९. मृत्यु कधी येईल

मृत्यु कधी येईल त्याचा नाही भरोसा
नको दोष देऊ जगाला भल्या माणसा ।। धृ ।।
मोठे मोठे रुग्णालये शोधून थकले





किती तरी डॉक्टर उपाय योजले
रोग मुक्ततेसाठी जरी खर्चीला पैसा ।। १ ।।
आठवण येता होतो दु:खाचा उमाळा
प्रेत यात्रेसाठी किती चालला सोहळा
कुणास नाही चुकला अजुनी मृत्युचा फासा ।। २ ।।
आवडे सर्वाना तोच आवडे देवाला
ज्याने जन्म दिला त्याने मृत्यु हा लिहिला
सर्व प्राण्याच्या आत्म्यावरती मृत्युचा ठसा ।। ३ ।।

## ७८०. का गुंग होशी तू

का गुंग होशी तू मानवा या संसारी संसारी
ही भुलविती भारी तुला माया रे असूरी असूरी ।। धृ ।।
माता पिता ही आसुरी कोणी नच वाटेकरी जाण एका परी ।। १ ।।
मरणाच्या अवसरी सुता मित्रा आप्तेकरी जाण बा अंतरी
कष्टाहुनी करू काय जन्मभरी हाय हाय सौख्याने अंतरी
दास म्हणे ख्रिस्ता द्वारी मागू चला माधुकरी
तो देईल माधुकरी तारणाची खरी ।। २ ।।

## ७८१. केला जै पोत बळेची खाली

केला जै पोत बळेची खाली ज्वाला करी त्यावरती उफाळी
तैशीच ख्रिस्त तत्वाची गती नष्ट नच होता ती उंचावली ।। धृ ।।
आपण करिला आपुलाची न्याय
मनांकीत कर्म देई साक्ष बुद्धी भ्रमणात ठेवी अहर्निश
मानी तेची सुख जीवनात
विवेका न जागृत तोचि ठेवी ।। १ ।।
मुले जमुनिया भोवरे खेळती रिंगणाच्या माजी हारजीत
तैसे कर्मकांड धर्मियांचे खेळ पतित दुर्बल खेळतात
खेळतात ते रिंगणी सापडती ।। २ ।।
दास म्हणे खेळ मृत्युरिंगणाचा भोवरा मोहाचा खेळे तोच
मंगलाची दोरी भोवऱ्या गुंडाळी





ख्रिस्त खेळगडी फिरविण्यास
गुंगवी त्यास तो झेली करी ।। ३।।

### ७८२. तेववी ज्योत

तेववी ज्योत खरी आत्म्याची
तेववी ज्योत खरी आत्म्याची ।। धृ ।।
घाली हृदयात आसवांचे तेल
काढू दे पश्चतापाने पडू दे बा खर्ची तव सेवेसाठी
सरली आस पुरी पाप्याची ।। १।।
पाप घाण पडे माथे चौफेर अंतर गेले भारुनी
नच नुरे अग्नी देवा जोम काही
काढण्या घाण झणी पापांची ।। २।।
दोष ते म्लांन जहाला पाहून ख्रिस्तची येई धाऊनी
करण्या शुद्ध धुई सारे अंग
आणिले पुनर्जन्मी ख्रिस्तानी ।। ३।।

### ७८३. आपुलाची भार वहावा आपुण

आपुलाची भार वाहावा आपुण सहारा देऊन एकमेका ।। धृ ।।
गर्विष्टांचा बाप गर्विष्ट सैतान करी तोचि नाश जीवनाचा
म्हणूनी तू सोड नरा अहंकार ख्रिस्त पदी लीन होई सदा ।। १ ।।
नको असू नरा जगी मी स्वतंत्र तुझे आत्मसुत्र त्याच्या हाती
रंका करी राव ठेवील सदैव आपुल्या संगती युगानयुगे ।। २ ।।
आडल्या नडल्या जो का देई हात तया ठायी नित्य प्रभू राही
दास म्हणे देवा देई प्रेम पात्र जेवू दे एकत्र सर्व लोकां ।। ३ ।।

### ७८४. इच्छा प्रभूची

जगणे मरणे इच्छा प्रभूची काय तुझ्या हाती
मानवा तू केवळ माती ।। धृ ।।
मी मी म्हणणे व्यर्थ असे रे तुझ्या हाती काही नसे रे
मायाजाळा का फसलाशी व्यर्थ जगी नाती ।। १ ।।





विचारुन घे तुझ्या मनाला शांती मिळाली का जीवनाला
नसे भरोसा कधी अचानक विझेल ही ज्योत ।। २ ।।
प्रभो ख्रिस्ताची कास धरावी तव हिताची सेवा करावी
मना पाहा रे शोधुनी अंतरी कोण न तुझा साथी ।। ३ ।।
जगतामधुनी जाईल मूर्ती जाईल मूर्ती पण राहील कीर्ती
अमर राहील सदैव जगती फक्त तुझी कीर्ती ।। ४ ।।

## ७८५. गर्व हा शांतीने जिंकू

गर्व हा शांतीने जिंकू चला
प्रेमच घ्या आणि प्रेमच द्या ।। धृ ।।
शेजाऱ्यावर प्रीती करा ऐसे प्रभूजी वदला
कोणी मारू एका गाला पुढती करा दूजा गाल
शांती प्रीती ही, शांती प्रीती ही, हृदयी ठेवा ।। १ ।।
जनसेवा ही तव पदसेवा मान्य प्रभुला व्हावा
दास सांगे सर्व जना हेतू गैर नसावा
शांती प्रीतीही, शांती प्रीतीही, हृदयी ठेवा ।। २ ।।

## ७८६. धनवानाची दुनिया आहे

धनवानाची दुनिया आहे गरिबांचा भगवान ।। धृ ।।
तू कैवारी संकट वारी गरिबांपुरवी अन्न ।। १ ।।
मुसमुसलेले भर तारुण्य विलया जाईल पार
सोड सोड अभिमान गरिबांचा भगवान ।। २ ।।
वाळुवरती घर बांधुनी मूर्खा येईल लोंढा पार
ख्रिस्त खरा अभिमान गरिबांचा भगवान ।। ३ ।।

## ७८७. ज्या ख्रिस्ताने प्याला दिधला

ज्या ख्रिस्ताने प्याला दिधला जगा रे
अहंतेला नाही जरा ठाव रे ।। धृ ।।
व्हावा निर्मात्या सारखे आदी नराशी वाटे
तेची करी वसती अंतर्यामी अहंकाराने





वाढवूनी इच्छाशक्ती स्पर्शियले ज्ञाना ते
हर्षे दिव्यदृष्टी ग्रासियले अंधारे
तया शोधण्या पुन्हा नरे मार्ग काढिला
अन्य कर्म तत्व धर्म जगी स्थापिले ।। १ ।।
मानवी धर्म तत्व मानवास प्रिय सदा
निज कर्मे करुनी जाई आसक्तच्या पंथा
माझा मीच देव झालो सांगे टाहो फोडूनी जगा
परि झाला मृत्युपुढे कायमचा जो बंधा
तया जीवदान द्याया नच शक्ती कुणा रे
ज्ञानवंत प्राण्या तूच शोधुनी पाहे ।। २ ।।
दास म्हणे कार्य तोचि कारण तोचि जाणे ख्रिस्ता
मानवास एक होण्या स्थापी प्रभू भोजन
त्या सेवूनी नरा साधी हीत आपुले
देव मानवाचे ऐक्य त्यात जहाले ।। ३ ।।

## ७८८. मरणाच्या शृंखला

मरणाच्या शृंखला तोडण्या पुनरुत्थानी धावण्या
जगी किती धावण्या देव देविका
जगी नाश पावल्या ।। धृ ।।
आहे जगी या मीच एक श्रेष्ठ माझ्याहूनी सारे कनिष्ठ
चरण पूजावे माझे जगी या होउनी नीच दास ।। १ ।।
ज्ञाना करवी जगी सायंटीस्ट शोधिताहे जो अमरात्मा श्रेष्ठ
ज्ञानवंताने जरी शोधले तेच नाश पावले ।। २ ।।
ज्याने घडीले तुला स्वकरांनी ऐसे कैसे त्वा मज रूप दिधले
बोलू लागले कुंभाराते मीच सर्व श्रेष्ठ ।। ३ ।।

## ७८९. रोपुणी कुणी का वदला

रोपुणी रोपुणी कुणी का वदला
का फाडी वस्त्रा मन्मना तुझ्या काय लाभ पावला ।। धृ ।।
काटे तनुला मत्सर हेवा
पाही मनुजा अंतरी टोचला





नाही तुझ्या जीवना ॥ १ ॥
पाहुनी रोपे काटा वदला
दुसऱ्या छळीता आनंद मजला
काय सुखा भ्रमला ॥ २ ॥
मुसळ तुझे रे काढी माणसा
मग दुसऱ्याचे कुसळ काढी बा
पापामध्ये लोळला ॥ ३ ॥

### ७९०. सोड रे लोभ धनाचा

सोड रे लोभ धनाचा सोड लोभ हा सोड ॥ धृ ॥
जो येतो तो अखेर जातो माझे माझे व्यर्थ बरळतो
अमृत समजुनी वीष प्राषितो क्षणभर लागे गोड ॥ १ ॥
आई बाप आणि सगे सोईरे स्वार्थ साधू हे नसे कुणी हे
का पाप्या तू उगा धडपडशी प्रभुशी नाते जोड ॥ २ ॥
दिन संपुनी रात्र चालली आयुष्याची घटिका भरली
यमराजाने स्वारी केली कोण करील त्या तोड ॥ ३ ॥

### ७९१. भक्तीरूप सांगण्याला

भक्तीरूप सांगण्याला घेई जवळी घेई जवळी
प्रभुराज नित्यराज द्यावी आरोळी ॥ धृ ॥
भक्ती मोठेपण सारे व्यर्थ भूषण
सुखी ठेव देवराया हेच मागणं
नको अंतरीची तशी भावना खुळी भावना खुळी ॥ १ ॥
नको चव्हाटयात भक्ती देखावे करू
एकांत खोलीत प्रिय प्रभुला स्मरू
धनी नसलेला मेंढरा सांभाळी तो सांभाळी ॥ २ ॥
तुझे नाम पवित्र हे मानिले जावो
पृथ्वीवरी राज्य देवा तुझेच येवो
स्वर्गी तैसे पृथ्वीवरी सांज सकाळी सांज सकाळी ॥ ३ ॥





## **७९२. सुखात सारे मित्र**

सुखात सारे मित्र दु:खात नाही
हे देवा हे देवा, तुझे नाव सर्व घेती स्वार्थापायी ।। धृ ।।
स्वत:ला उंच म्हणती प्रभू भक्तीचे देखावे करती
पुण्यवान सिद्ध करण्या, दान धर्मच देई ।। १ ।।
पापे कबूल जो करीतो स्वर्गवास तया लाभतो
पश्चतापी होउनीया स्वर्ग तो पाही ।। २ ।।
दास सांगे प्रभू वचनात जगावे जीवन प्रभू वचनात
खरा रोजारी होउनिया प्रीतीमध्ये राही ।। ३ ।।

## **७९३. भेदी गृही नांदे साथ रे**

भेदी गृही नांदे साथ रे तोवरी नाही स्वस्थ काही
राही चित्ता नित्य ताप रे ।। धृ ।।
अवखळ भेदे ग्रासियेले सारे कवनाचे बोल कवना ना कळे ते
वादा निस्पन्न होई वाद रे ।। १ ।।
अंतर्यामी केले माझे मीच पूरे तूच निर्मीलेले मंगल कार्य हे
दुष्टे साधीला निज डाव रे ।। २ ।।
दास म्हणे देवा माझे मी आणिले जीवन घातुका भेदी पाहुण्या ते
तार मला तू अथवा मार रे ।। ३ ।।

## **७९४. अनन्य ज्योती तळपे**

अनन्य ज्योती तळपे आपुल्यापरी
पाडिती तेज भुवरी, भेदाभेद दिसते लोचनी ।। धृ ।।
जगी धर्माच्या तैशा रिती
जे ते आपुल्यापरी पाळीती पाळीती
अन्य होम अर्पुणी बळी रक्त सिंचुनी
वाही पाईक वेदीवरी ।। १ ।।
निरांकारी निर्गुणापरी आत्मा तळपोनी
राही प्रारंभी प्रारंभी
सदा सहकारी नाम रूप धारुनी





वसे सर्वाठायी अंतरी ।। २ ।।
होते जीवन जयाच्या ठायी
स्वर्ग सुख आला सोडूनी, सोडूनी
तेच जीवन राही मानवासंगती
नीत प्रकाशुनी अंधारी ।। ३ ।।
नाही ग्रासिले अंधाराने झुंज देई अटळ मृत्युशी
गेला मरणा माजी विजय मिळवी त्यावरी
ख्रिस्त राही स्वयंप्रकाशी ।। ४ ।।

### ७९५. देह मानवाचा

देह मानवाचा आहे सुंदर मंदिर
त्यात दैवत्वाचे स्थान येशू हाच जाण ।। धृ ।।
बदले माणूस भलतेच ध्यान
अंत:करणाच्या आत का रे पांगापांग
अशाने का होई आपुल्या मनाचा बदल ।। १ ।।
शरीरावरून येशू दाखला जो सांगे
वाटुनी घेतल्यावरे काय हाल होय
भेद करू नका येशू तळमळे ।। २ ।।
ख्रिस्त कोनशिला ठेवा मंदिरा दर्शनी
दुरुनी म्हणतो कसा व्हावे तू पावन
आत्मा येशूचा रडतो भक्ताला पाहून ।। ३ ।।

### ७९६. येशू नाम घेता

येशू नाम घेता तुम्ही करीता भांडण
वर गोड बोल भाव अंतरी सूड
एकमेका शिव्या शाप का रे वाकुडं ।। धृ ।।
एक गाव एक नाव देवाचे घर सारे देवाचे घर
त्यात भाऊ राहू सदा प्रेमाने म्हण आता
शेजाऱ्यांशी राहू गोड ख्रिस्ताचे बोल
ठेवा ध्यानी मनी आज त्यात हो भलं ।। १ ।।





कुणी मंडळीत येतो पैशाची हाव सारी
कुणी डोकीफोड करीन म्हणे भावास आता
पैशापायी राजाचे राज्य बुडाले
स्वार्थाठायी नाही देव सांगे विश्वास ।। २ ।।
देवनाम ऐकण्यास जमे मंडळ आता
आशीर्वाद घेण्यासाठी देवाशी भांड आता
दूजांसाठी देतो प्राण तो धन्यवान
त्यात ख्रिस्ती धर्माची तो राखितो शान ।। ३ ।।

### ७९७. घराची सुंदरता पाही ख्रिस्त

घराची सुंदरता पाही ख्रिस्त येउनी
साक्ष ही नका ठेवू घाण तुमच्या अंगणी ।। धृ ।।
असावी घरामध्ये चूल एक सानुली
ती मध्ये पाप लकडासमान जळू द्या की
धुनी येऊ द्या घरातुनी बाहेरी
पश्चतापी हृदये ख्रिस्त तुमचे पाहे ती ।। १ ।।
पिण्यास असुद्या गृही ख्रिस्त हे जीवन पाणी
तृषा ही जावो तुमची सुवचने पिउनी
हो ख्रिस्ती बांधवांनो जाऊ प्रभुच्या सदनी
आध्यात्मिक भूक शमवू ख्रिस्ताच्याच ठायी ।। २ ।।
अखंड रोज करा प्रार्थना प्रभुजीची
आत्मज्योत तुमची शमवा दिव्याच्याच गती
या ख्रिस्ती दासांनो ऐसी सजवा गृह मती
हे जिणे दिसो सदा ख्रिस्त मन मंदिरी ।। ३ ।।

### ७९८. पामराचे अर्त

पामराचे अर्त ढळू द्या टळू द्या
गृहामध्ये शांततेला वाव मिळू द्या ।। धृ ।।
साजे गृहात साजे नाम प्रभुचे साजे
वाटे मनास वाटे लाभ सुखाची गायने
हो मनाशी —हो मनाशी
लागले मनास ध्यान सुवंद्य प्रीतीचे
ज्याने जगाशी केली खंडणी स्वहस्ते ।। १ ।।





सारे रोज रोज ते जरी ते पुष्ठ खाणे
नसे हो शांती गृहाते वाण प्रीतीचे बालणे
हो गृहाशी हो गृहाशी
लाभावा गृहात वास साज त्या प्रीतीचा
सुखी संसारी एक ख्रिस्त हो बसू द्या ।। २ ।।

## ७९९. धावलेला भुकेपाठी

धावलेला भुकेपाठी हो तृप्तीसाठी कल्पतरुच्या बैसे बुंध्याशी ।। धृ ।।
ऐशा स्थळी जर होती भाकरी केली मी असती तृप्ती जीवाची
आले मिष्टान्न पात्र भरुनी हो तृप्तीसाठी
सुस्ती धावली अन्न सेवूनी घ्यावे निद्रा इच्छा जहाली
झाले क्षयन लोळे पलंगी हो तृप्तीसाठी ।। २।।
मनी सुखांती शंका वाढली आहे इथे का भूत चमत्कारी
दाबी कसून भूत नरडी हो तृप्तीसाठी ।। ३ ।।
दास म्हणे रे नैश्वर्य अवघे कल्पतरुसम आहे आपुले
ख्रिस्त भोजनी भूक शमवी हो तृप्तीसाठी ।। ४ ।।

## ८००. नास्तिक बुद्धी

नास्तिक बुद्धी नर शोधिती नर भक्षक आणि क्रांती
दिव्यत्वाची नि ख्रिस्ताची मोक्षाची ख्रिस्ता ठायी प्राप्ती
करूया अंगिकार ।। धृ ।।
पाप कलंकी दुनिया सारी पडली मृत्युच्या मुखी
काम नराच्या लागे पाठी जगी नाही होणार सुखी
जरी अजिंक्य झाला जगती स्वआत्मा बसे गमवूनी
कमाई केली काय शेवटी नरकाचा हो वारशी ।। १ ।।
कालचक्र हे गरगर फिरते कोण थांबविणार
अन्य अवतारी थांबविण्यास्तव झाले मृत्युत गार
ख्रिस्त अवतार मृत्युस ग्राशी जिंकी स्वपुनरुत्थानी
पाप्यांस केली प्राण सुखाची वाट तयाने मोकळी ।। २ ।।
ख्रिस्तावीन दूजा नाही उठला मरणातून या जगती





म्हणूनी नरा तू सोड मोक्षाची आपुल्या मनाची ती भ्रांती
ख्रिस्त दैवत एक जाणूनी सांग तया तव गाऱ्हाणी
करील त्वरे सर्व पाप्याची आस मोक्षाची तो त्वरी ।। ३ ।।

## ८०१. रानी वनी काय नयनी

रानी वनी काय नयनी दिसे तुझ्या
पहावेना पाप जगी ते कुठे कुठे न्याय ।। धृ ।।
धर्मी कर्मी किती किती झाले
राज्यपदी या किती किती गेले
धर्म धर्म म्हणूनी कर्म केले
कर्म झाले नाशासम बा रे पदोपदी हे पातकी जगी झाले ।। १ ।।
कर्म डोळे वंद्य निंद्य झाले
क्रुष्ट देहची पुढे सरसरते
भिती ना पापाची भिती मानवाची
जगी नराचे कुठले बघ फळ ते ।। २ ।।

## ८०२. सांग नरा रे बोल नरा रे

सांग नरा रे बोल नरा रे
पापाचा गुलाम कुठवर रे ।। धृ ।।
पापाचे आझे त्याने वाहिले भारी
खंडणी भरुनी सृष्टी तारीली सारी
पश्चतापी मन कधी केलेस का रे ।। १ ।।
जीवनाचे अंतरंग बदलेल कैसे
दिधले तयाने तुला वरदान तैसे
अंगिकार त्याचा तू केलास का रे ।। २ ।।
दास प्रभू रे विनवितो तुजला
असो माझी वसति सदा तव चरणाला
तुझ्या भेटीसाठी माझा जीव आसवला ।। ३ ।।





## ८०३. सुखाशी का भुललाशी

विश्व सुखाशी का भुललाशी
लागे झनी प्रभुपायी मनुजा मिळे तुझ्या आत्म्या शान्ती ।। धृ ।।
मुळापासुनी जगी करिले शुद्ध मने तुज देवाजीने
हेतू काय तू जाण तयाचा का पडला या भ्रांती ।। १ ।।
वाटला जरी संसार सोपा परी पसारा व्याप किती हा
कष्टवूनी अंती जाशील मरणा होई देहाची माती ।। २ ।।
नर जन्माची संधी एकदा म्हणून करून घे ईश्वर आपुला
ठेवियला तुझा वाटा तयाने ऐश्वर्याचा स्वर्गी ।। ३ ।।

## ८०४. जगा जो म्हणतो वेडा

जगा जो म्हणतो वेडा हो त्याची वेड्या परी गणणा
हेच विसरुनी गातो म्हणे गोड प्रभू नाम ।। धृ ।।
गाता गाता जन्म याचा गेला आमच्यापाठी फुका
हेच जाणूनी गा भजना दोष नको लावू कुणा
मुसळ तुझे तूच काढ डोळयात घुसेल तुझ्या फार
मग जगाचे कुसळ तुजला दिसे फार छान ।। १ ।।
ज्याची खातो भाऊ पोळी नको वाजऊ तू टाळी
भजनी साऱ्या वडील जनांशी ज्याने गुंगविले त्याशी
पायधूळ तू त्याची हेच विसरुनी जाशी
हीच गाठ तू बांधी आपुल्या दुबळया मनाशी ।। २ ।।
संपलेला तुझा ठेवा सांग स्वमुखा जना
जलासी जैसा मासा रे खेळतो वैर जसा मासा
वैऱ्यासवे प्रीत व्हावी ऐसे सांगे ख्रिस्त दास ।। ३ ।।

## ८०५. मनाचे विचार

मनाचे विचार कर म्हणे पश्चताप
पडले वळण माझ्या इंद्रियास ।। धृ ।।
जगी नाना रंग पाहिले जगात
रंगात मी दंग सुटे देह भान
करी मन माझ्या साऱ्या रंगाचा भंग





देवा मी लाचार कैसा वाहू क्रुसभार
क्रुसाची घालवी लाज या धरणीवर ॥ १ ॥
शरीर अशक्त मद्य रस धुंद
आत्म्या लागे डाग अंतरी काळपट
तरी सोडण्यास जाई येई माघारी
साथी शडरिपुंचा जाळ मित्रांनी जोडीला
आहे नाव मोठं छानं त्याच रे सैतान ॥ २ ॥
दुराचारी मित्र नाते मी जोडीले
मनात मी मन घालुनी
किती गेले क्षण माझे मोठ्या दुःखात
देवा तुला यावी कीव भीक मी मागतो
तुझ्या चरणासी जावो माझा प्राण ॥ ३ ॥

## ८०६. दूर्ग प्रीतीच्या

दूर्ग प्रीतीच्या फोडूनी देवा पुत्र तुझा गणलो ॥ धृ ॥
शुद्ध मी भासे अखिल जगी या गारूड्याची सोंगे करिता
कळले मजला भंगलो जेव्हा पापाधीन मी झालो देवा ॥ १ ॥
देहधारी म्हणे तव सेवेचा विंडबिले मी तव मुख कमला
ठेविली जनता अंधारा ते मुखकमले तुझी पाही देवा ॥ २ ॥
दास ख्रिस्ताचा वदतो जेव्हा मम जिव्हेचा कुणी करो हेवा
सत्त्याचा हा वीट जगाला सोडा अधर्मा गीरवा कित्ता ॥ ३ ॥

## ८०७. ख्रिस्ती माणसा

ख्रिस्ती माणसा जीवन त्वा रे निर्मळ राखावे बोले ख्रिस्ताचे
बोल बोल अनमोल हे ॥ धृ ॥
तुझ्या पापाच्या धुंदीने रे काळझोपी झोपविले
मद्यपानाच्या गुंगीने रे देवनाम बाटविले
पापी डुबतांना डुबे पाणी हे खोल जिथे
नुरती कुणी ना काठी रे ॥ १ ॥





जगती येउनी काय केले तू माझ्या प्रीतीचे
किती पापात दिन गेले या मोल्यवान आयुष्याचे
पाप्यांनो प्रायश्चित घ्या हो मजमध्ये
या हो या जन सारे या ।। २ ।।
तुला सर्वाहूनी वेगळे मी केले हेतू काय रे
माझ्या इच्छेने तुझ्यासाठी मी जग निर्मिले
आनंदे सुखासाठी माझ्या इच्छेने
माझ्या इच्छेला तू पायी रे तुडविले
दैवी प्रीतीला पारखे हो तुम्ही ।। ३ ।।

### ८०८. ख्रिस्त सैनिक

फिरतो आम्ही आहोरात्री ।। धृ ।।
ख्रिस्त जनसंघ आपण उभारु वेगाने सोडू आपले तारु
प्रसन्न करु या ख्रिस्त एक छत्री ।। १ ।।
दुर्ग जिंकुया अधर्मपणाचा ध्वज फुडकवूया ख्रिस्त एक्लेसियेचा
प्रभुचे वचन ठेवूनी अंतरी ।। २ ।।

### ८०९. प्रेषितांनो कार्य करा रे सर्व भुस्थळी

प्रेषितांनो कार्य करा रे सर्व भुस्थळी
जयख्रिस्त नामाची द्या गोड आरोळी ।। धृ ।।
भावाभावात नको भांडण
काईनाने अबेलाचा केला हो खून
जन्म नका वाया घालऊ मानव कुळी ।। १ ।।
शास्त्र बिज रोपाची पेरणी करा
फुले फळांनी झाडे भरु द्या जरा
जाळुनी टाका प्रियांनो दुहिची फळी ।। २ ।।
बारा प्रेषितांचे पाय धुतो प्रभुराज
लीनपणाचा धर्म सांगतो तुम्हा हो आज
आता तरी एक व्हा रे ख्रिस्तामधे एक व्हा रे
भावंडे जुळी ।। ३ ।।





## ८१०. सैनिकांनो धीर धरा

सैनिकांनो धीर धरा रे युद्धाच्या स्थळी
पाहा पुढे चाले तुमचा ख्रिस्त महावीर ।। धृ ।।
सदा शत्रुच्या संगती राहू नको ही
गुपिताने हल्ला करिती लांडग्या परी
अंतरी मुळाचा वैरी प्रीत भाबडी ।। १।।
सदा अरीष्टांच्या वेळी त्रैक्या पुकारी
धनुष्याची लांबही दोरी जाई तुटूनी
भासे तलवारीच्या मुठी जाती फुटूनी ।। २ ।।
वैऱ्यासंगे राहून वैरी, वैर वाढवी
मीच माझ्या पायावरती धोंड पाडी
नसे एकचित्ती माझ्या लीन वृती हीन ।। ३ ।।
सैनिकांनो सैनिकांशी नको लढाई
कैवारी सर्वांचा मारी मोजमापूनी
ख्रिस्त राज्यासाठी लढाई करावी पुरी ।। ४ ।।

## ८११. उदास का रे झाला तू

उदास का रे झाला तू ख्रिस्त बालावीरा
सर्व जगाची वाट दावण्या जा रे सामोरा ।। धृ ।।
जग मानाला तू मुकला तू जगा वेगळा झाला
सर्व जगाची सेवा करण्या आले तुझ्या कर्माला
आहे कटकट लवकर वर दीप सत्त्याचा हा सत्वर
अरे नेत्र असोनी त्या न दिसे तो पथ अरुंद खरा ।। १ ।।
जगी लोभ नाशाची वाट जरा पाहून चाल नीट
रुंद म्हणोनी कैक जवान चाले झटपट
अरे धर धर तू शुद्ध धर आहे अजुनी तुज अवसर
जग सौख्याच्या नको लागू पाठी मुकशील तूच बरा ।। २ ।।
तू अमरत्वाचा चेला कर दुष्टावरती हल्ला
मृतावस्थी जरी तू पडला जीवंत तू गणलेला
अरे सर सर तू पुढे सर आत्मशुद्धी घेउनी समशेर
अरे अन्य जीवांना रक्षिण्यास्तव पडू दे शिर धरा ।। ३ ।।





## ८१२. ख्रिस्त योद्धा

ख्रिस्त योद्धा आपुल्या पूढे
चला तया पाठी रे सैनिकांनो ख्रिस्तसाठी ।। धृ।।
नीतीमत्वाचे हो उरे त्राण हे घालू आपुल्या हृदयाचे
सत्यतेने बांधू कमरा कमरबंद साचा रे सैनिकांनो ।। १।।
सिद्धतेच्या हो घालू पादुका शांन्ती सुवार्ता बाणा विद्या
शिरस्त्राण हे तारणाचे शिरी घालू आपुल्या रे ।। २।।
विश्वासची हो ढाल घेउनी प्रीतीची तलवार रे
हटवू चला त्या सैतानाला जय ख्रिस्त बोला रे ।। ३।।

## ८१३. बुद्धी आहे दुधारी हत्यार

बुद्धी आहे दुधारी हत्यार जपून जगी वापरी नरा
भावनेचे द्वंद्व अनिवार रे लढता लढता लढले झाले ठार ।। धृ।।
कालगतीचे येतील हल्ले नाही ठाऊक कोणा कैसे
येतील परी ते सरतील सारे शोधांतरी सावधाने
जो लेवी विवेक परिधान तोचि खरा योद्धा विजयी होणार ।। १।।
वर्त काळी हे गिरवी साचे भूतकाळाचे नर कित्ते
भाकीत काळाचे कोणा न कळे वर्तकाळी लक्षणे
त्रैक्य आहे काळाचा सुत्रधार तयावीन कोण जगी न थकणार ।। २।।
पाष मृत्युचे पार तुटले मृत लाजार जगा सांगे
गर्तेमधुनी उठते झाले ख्रिस्त दासाचे शव हे
दुजा नाही पाप्या करणार ख्रिस्तावीन तुझा जगी प्राणोद्धार ।। ३।।

## ८१४. अमरत्वाचे रक्त पिणाऱ्या

अमरत्वाचे रक्त पिणाऱ्या थंडच होउनी का पडला ।। धृ ।।
जनसेवेचा नि समतेचा संदेश दिधला ज्याने तुला
ऐसा नेता तव संगे असता सांग कुणाची डर काय तुला ।। १ ।।
तुझ्याच वेगे तुझ्याच संगे जग अवघे धावत सुटले
धावत धावत वीरगणांमध्ये नंबर पहिला तू गणला ।। २।।
तुझेच संदेश तुझेच मतवाद ऐकून घेऊन नर उठला
लोकशाही हाती दंडा घेऊन सर्व जगावरी उगारीला ।। ३ ।।





ऊठ ऊठ बा लवकर उठ बा नैश्वर्य अग्नी भडकला
जाळीत सुटला सर्व जगाला विझवू चला लावू प्राणपणा ।। ४ ।।

## ८१५. जन कल्याणासाठी

जन कल्याणासाठी जरी धर्म पुढारी होतील
या भारत भूमीवरती दीनांची दु:खे कुणी न हाटवी
मुकी बिचारी कुणी हाकावी कुणी राबवावी रानी
कुणी उपाशी कुणी तुपाशी खाई रोज मिठाई
समानतेची हाक पुकारी आशा निराशा होई ।। १ ।।
कुणी धर्मभेदाच्या पायी घेती हाती कुऱ्हाडी
कुठे झोपडी महालमाडी झोपडी ही अंधारी
राव आणि रंकाची लढाई खुनाखुनी हो होई ।। २ ।।
तरी असुरी जात नराची नष्ट कधी न होई
सत्कर्माची करी हत्यारी कसले धर्म पुढारी ।। ३ ।।
आशासाठी मानव धर्माची शिकवण जगी शिकवावी
श्री ख्रिस्ताच्या प्रीतीधर्माची नीती उरी ठसवावी
वैऱ्यासाठी जो प्रेम दाखवी ख्रिस्तच धर्म पुढारी ।। ४ ।।

## ८१६. सृशेचा भला पथ

सृशेचा भला पथ सत् दावी ख्रिस्त ।। धृ ।।
दास्य स्वीकारा तुम्ही प्रभू धनिकांना सांगे
नांदा सहिष्णुतेने साऱ्या विश्वभरे
दुसऱ्यांचे दु:ख तेची आपुलेची जाणे
दीन हीन सेवेसाठी बा रे पाड खर्ची देहा ।। १ ।।
उघडयाच्या घाल अंगी देउनी आंगडे
भुकेल्यांच्या घाला मुखी अन्न उल्हासाने
तान्हेल्यांशी पाजा पाणी उदार अंतरे
उच्च नीच नाही माझ्या ठायी प्राण मानव माझा ।। २ ।।

## ८१७. ख्रिस्ताचे बायबल आणा मला

ख्रिस्ताचे बायबल आणा मला, येतानी दादा नाताळाला
मला काही नाही उणे माझ्या संसाराला ।। धृ ।।





साडी चोळी आणली, चार महिन्यात फाटून गेली
पण बायबलची आठवण राहील ही जन्मभर
ख्रिस्ताची आठवण राहील जन्मभर ।। १ ।।
सोने चांदी दिधले, चोरांनी ते चोरून नेले
पण बायबलची आठवण, राहील ही जन्मभर
ख्रिस्ताची आठवण राहील जन्मभर माझ्या ।। २ ।।
लाख लाख दिधले, या जगात काही ना उरले
पण बायबलची आठवण राहील ही जन्मभर
ख्रिस्ताची आठवण राहील जन्मभर माझ्या ।। ३ ।।

## ८१८. पाहू दे नित्य ज्ञान नेत्रा

पाहू दे नित्य ज्ञान नेत्रा परमेशा
सर्व सुखाचा तो ठेवा ।। धृ ।।
अनादि अनंत गुणसंपदा तळपणाऱ्या सर्वत्रा
भाग्यवान जो येशू माझिया विश्व आधी निवडिले तू त्या
रे तुझी मी छाया कृपेचा व्हाया घडू दे तव सेवा ।। १ ।।
नाही जमीन जमिनीतील मी पिंड मातीचा तू घडिला
प्राण फुंकरा घालून मजला ठेवियले तुझ्या संग बा
रे प्रेम सागरा लाटांसारिखा चढवे पैल तिरा ।। २ ।।

## ८१९. सुपापरी निज मना

नित्य ठेवी रे नरा सुपापरी निज मना
पाखडी जोरा दुर्गूण भुसा राहो सदगूण मापी धान ।। धृ ।।
येतील अर्थ जन्मभर सांग देशील तोंड कुठवर
मोह मायेचे युद्ध पोटाचे विश्व लढे रानो रान ।। १।।
पतित सृष्टी असे रे धन पाहून धावे असंख्य गण
तयाच्यामुळे कोणा न कळे प्राण लयाचे स्थान ।। २ ।।
जया ठायी नाही सेवा मन तयाचे वैभव धुळीसम
का तर ख्रिस्ते प्राणा अर्पुणी ते दिधले पतिता त्राण ।। ३।।





## ८२०. कर माझे मन मोठे

कर देवा माझे ऐसे मन मोठे
मावो त्यात गोटे निंदा बोल रे ।। धृ ।।
करण्यापायी मीच साधूकर्म
माझे मूळ गुण देई मज झोल
सांभाळी तुची बा माझा तोल रे ।। १ ।।
आहे कैसा मी बा जगी तुलाच पारख
आधीची ओळख तुला माझी ही
दिसो जगी आपुला सुयोग रे ।। २ ।।
दास म्हणे देवाजी वारी सांकडे असशी वाकुडे कैसा राहू
भरे तुझी प्रिती ही अन्मोल रे ।। ३ ।।

## ८२१. गळो हात फुटो हे डोळे

गळो हात फुटो हे डोळे पातकाचे ना बा घडो चाळे ।। धृ ।।
मन करी माझे बालकासारीखे कदापि न कळो रूप पापाचे
हटऊ नका त्या येवूद्या मजकडे ।। १ ।।
नाशवंत हे शरीर माझे म्हणून करी ते ओझे पापाचे
गेलो मरुनी मी त्या खाली रे
वाचीव ख्रिस्ता कर मज मोकळे ।। २ ।।

## ८२२. देवा मंगल पाय तुझे

देवा मंगल पाय तुझे ते पवित्र पदरात घेतो ।। धृ ।।
पवित्र व्हाया तव पदी वसतो सेवक तव मी गातो
प्रीती अक्षदा प्रेम दंड हे तुझ्या पदा लवितो ।। १ ।।
तुझ्या पदावरी मस्तक ठेवूनी सुमने तुज वाहतो
दर्शन करिती पवित्र जन तव मंगल गीत हे गातो ।। २ ।।
प्रार्थना करीती पवित्र जण हे तुझ्या पदी लागतो ।। ३ ।।

## ८२३. जिणे सारे गेले फुका

मम जिणे सारे गेले फुका रे सेवा नाहीं झाली प्रभुजीची रे ।। धृ ।।





मी हे पातक भारी जगी केले पापामुळे ना तुज ओळखिले
दावी सन्मार्ग रे जाण स्वर्गराज्या रे
भंगले जीवन ख्रिस्ता माझे हे ।। १।।
संसाराच्या ह्या दु:ख अग्नीने जिणे माझे हे सारे होरपळले
लाही लाही झाली रे आज ह्या देहाची
गुंतले पाशात मन माझे हे ।। २।।
मानवा तू देवाशी ओळखावे आली वेळ जगी आजला रे
धुंदी तू सोड रे पथ ही वाकूडे
गुंगले भ्रमर जगी भारी रे ।। ३।।

## ८२४. असा काळ येईल

असा काळ येईल धर्मभेद जाईल सारे विश्‍व
ख्रिस्ताची थोरवी गाईल असा काळ येईल ।। धृ।।
जो का नेत्र दुसऱ्याचे घेऊन पाही तोची कुठे शांतता जगास देई
दूजा नाही कोण एका ख्रिस्तावीन
साऱ्या काळी सहकारी होऊन राहील ।। १।।
आहे सत्य सहिष्णुता त्या जयाच्या ठायी
तोचि न्याय प्रियता जगास दावी
जो का तया जाणील तोचि धन्य होईल
दिल्या नर जन्माचे सार्थक साधील ।। २।।
पाप दंड मरणाचा कोप जगास
दैवे दिधला शाप सर्व प्राण्यास
मृत्यू विजयात तो ग्रासून टाकील
अविनाशी सुख साऱ्या पाप्यास देई ।। ३।।

## ८२५. चालण्यावीन कैसे उमटे

चालण्यावीन कैसे उमटे भूमीवरी ते पाऊल आपुले
शोधिता सापडे पुनर्जिवीत ख्रिस्त दैवत एकले ।। धृ ।।
अन्य दैवत झाले जगती दिधली नाही त्यांनी पाप्यांमुक्ती
मुर्तीमंत जहाले ।। २।।





नर यज्ञावीन पाप मुक्त ते होणार नाही जगी मानव अवघे
ऐसे ख्रिस्तानी जाणिले ।। २।।
म्हणूनी नरा ख्रिस्त दैवता जाणी नर जन्मीचे हीत घे साधोनी
त्यानेच जगा तारीले ।। ३।।

### ८२६. आसक्तीची तृप्ती क्षणाची

आसक्तीची तृप्ती क्षणाची
वाढवी उल्हास प्राण्या अती होई ऱ्हास प्राण्या ।। धृ ।।
जाणत असुनी नीच कर्मांनी होतो देही भान आल्या प्रसंगी
जर का मुक्तता झाली त्या प्रसंगी जाशी मूळ स्वभावात प्राण्या ।। १ ।।
जरी अजिंक्य झाला जगती परी स्व आत्म्याशी बैसे गमवोनी
काय फायदा आल्या ह्या जन्मी जाशी अग्नीकुंडात प्राण्या ।। २ ।।
दास प्रभुचा कोळशापरी सेवेकरिता जीवना वाही
ऊब दुसऱ्याशी देण्यासाठी घेई करून निज राख प्राण्या ।। ३ ।।

## वाढदिवस

### ८२७. किती अंगाई गाउनी

किती अंगाई गाउनी थकले हो
तरी ना जाई चाळा माझ्या बाळा हो हो
लडीवाळा ।। धृ ।।
दारी जमले तुझे गणगोत्र काका मामी आणि इष्ट मित्र
अशा या वेळी संकट काळी ख्रिस्त तुला सांभाळी ।। २ ।।
माया ख्रिस्ताची तजवर सारी तुला लाभेल आयुष्य भारी
अशा या वेळी संकट काळी ख्रिस्त तुला सांभाळी ।। ३ ।।
ख्रिस्त दास घेता आढेवेढे मागतो वाढदिवसाचे पेढे
अशा या वेळी संकट काळी ख्रिस्त तुला सांभाळी ।। ४ ।।





### ८२८. बहू दिवसाची इच्छा पूर्ण

बहू दिवसाची इच्छा पूर्ण केली या माझ्या देवानं
झाला मनाला आनंद, पुत्र (कन्या) रत्नाला पाहून ।। धृ ।।
आज ऐसे वाटे ग बाई, जैसा सोनियाचा दिन
सडा सारवण करून बाई, बसले मी बाळास न्हाऊन
आज आहे ऽ ऽ ऽ बाई माझ्या बाळाचा जन्मदिन बाई बाई ।। १ ।।
झाला आनंद गणगोताला मुख बाळाचे पाहून
म्हणून योजिले आज करण्या प्रभुरायाचे भजन
अतूर झाली ऽऽऽ ऐकण्याला प्रभुरायाचे भजन बाई बाई ।। २ ।।
हीच विनंती शेवट आहे तुजला रे प्रभुराया
सुखी ठेव तू या बाळाला आज वाहिले तव पाया
तव कार्याचा ऽऽ सेवक बनूनी झटावे त्याने रात्रंदिन बाई बाई ।। ३ ।।

### ८२९. सुखाचा वाढदिवस तुज

सुखाचा वाढदिवस तुज जावो
हर्ष सतत तव अंतरी राहो ।। धृ ।।
कलीयुगाच्या मोह पसारी
संकटे येती जगती सारी
जगती जीवन प्रभू सांभाळी ।। १ ।।
कुटूबात प्रभू नित्यच राहो
मालक चालक तोच होवो
नको पडू तू मोहजाळी ।। २ ।।
शुध्द बुध्दी प्रभू तुम्हा देवो
धरुनी हाती तो चालवो
आशीर्वाद प्रभूचा नीत लाभो ।। ३ ।।

### ८३०. आज उगवला सुदिन

आज उगवला सुदिन भाग्याचा दिन
गाऊ प्रभुचे गुणगाण, बाळाचा वाढदिन आज ।। धृ ।।





हर्षाचे वारे सुटले, लहान थोर ते पाहा नटले
प्रभू कार्याशी हो ते झटले
भजनाचा येतो ललकार, गाती लहान थोर
तुलाच देतो सदा मान, बाळाचा वाढदिन ॥ १ ॥
घडो तुझी सेवा ही दिनरात
तुझ्या नामाचा स्वाभिमान, नको अपमान
तुलाच देतो सदा मान, बाळाचा वाढदिन ॥ २ ॥

## ८३१. वाढदिवस आज लडिवाळाचा

वाढदिवस आज लडिवाळाचा
आशीर्वाद लाभो बाळाला
शुभ दिवस लाभला या बाळाला शुभ दिवस लाभला ॥ धृ ॥
गुण मी गातो या बाळाचे त्याच्या त्या या सौंदर्याचे
तुझ्या कृपेच्या छायेखाली घे देवा या बाळाला ॥ १ ॥
देवा तुझी आहे गोड प्रीती आली आम्हाला याची प्रचिती
तुझ्या कृपेच्या छायेखाली घे देवा या बाळाला
शुभ दिवस लाभला......॥ २ ॥

## ८३२. बारावीच्या दिनी

बारावीच्या दिनी आज हर्ष या घरा
हे देई निमंत्रण तुला ईश्वरा ॥ धृ ॥
मागणे बालका ठेवी तू सुखात
तव सान्निध्यात रात अमुची प्रीत
देवा आशीर्वाद झणी दे पामरा ॥ १ ॥
मधू संगिताने छान खेळवी बाळा
गजबज नवा करी देई खुळखुळा
गातो अंगाई मी आज कोकीळ सूरा ॥ २ ॥
माता पित्याची सेवा घडो जनाची
ख्रिस्त सेवा देई भेट अन्य काव्याची
दु:ख संकटी तार ख्रिस्त वीरा ॥ ३ ॥





## ८३३. सुखाचा वाढदिवस

सुखाचा वाढदिवस तुज जावो
हर्ष सतत तव अंतरी राहो ।। धृ ।।
नव जीवनाची नव युग बाळा
धावूनी तुझिया द्वारी आला
प्रभू कर सुख कर तुजला ठेवो ।। १ ।।
उठती वादळ तारुण्याचा
पायी रुतती काळ मोहाचा
तव हा प्रभू परी अंतरी राहो ।। २ ।।

## ८३४. जन्मदिन

जमल्या आयाइबाया अंगाई गीत गाया
पाळण्यात झाला भाग्यवान
चिमणा हा गोरागोरापान ।। धृ ।।
आजी म्हणे मी आता पिकलेले पान आहे
बाबा म्हणे मी आता पिकलेले पान आहे
बाळाच्या आनंदाला हर्षाचं गीत आहे
पाहाता हे गुजगुलं जन्माला आज आलं
ओवाळुनिया पंचप्राण
बाळ हा गोरागोरापान ।। १ ।।
मामा म्हणे आता हर्षानं घ्या हो पेढे
घ्या हो हर्षाने पेढे नका घेऊ आढेवेढे
बाळाच्या आनंदाला हर्षाचं गीत आहे...।। २ ।।

## ८३५. भाग्य तुझे उजळू दे बाळा

भाग्य तुझे उजळू दे बाळा आज तुझा रे जन्म सोहळा
सोहळयासाठी जमला हा मेळा
लाडक्या लडिवाळा ।। धृ ।।
थोर तुझी माता अन् पिता तुझा थोर
मातेच्या हाती आहे पाळण्याचा दोर
कधी फेडशील तिचे उपकार
मायेचा हात तव शिरावर हीच शिकवण तुला ।। १ ।।





रूप तुझे बाळा रे किती मनोहर
तुला पहाताना होईल नजर ।। २ ।।
शिक्षण घेऊन हो ज्ञानवंत
पाठीशी आहे तुझ्या ख्रिस्त भगवंत
नाही दयेचा अंत, करू नका करू खंत ।। ३ ।।

# मृत्यु व चाळीसावा

## ८३६. आमचा मरण शेवट नाही

पवित्र शास्त्र एकच मात्र देते जगाला ग्वाहीऽऽऽ
हो आमचा मरण शेवट नाही ।। धृ ।।
पतितांसाठी ख्रिस्त हा मेला तिसरे दिवशी उठविला गेला
विश्वास ऐसा धरती मनी जे जे प्रभुचे अनुयायी हो ।। १ ।।
ख्रिस्तात मोठी आशा आम्हाला मग मरणाची चिंता कशाला
पुनरुत्थान हे आहे खचित रे ख्रिस्त प्रभुच्या ठायी हो ।। २ ।।
ख्रिस्तात आम्ही विश्वासणारे प्रभू वचने आठवू चला रे
ख्रिस्त सुवार्ता बहुमोलाची सांगू आता नवलाई हो ।। ३ ।।

## ८३७. आई म्हणू कूणा

आई म्हणू कूणा
झालो जगी मी उणा ।। धृ ।।
बालपणी तू कौतूक केले
घास भरोनी आम्हा वाढविले
किती आठऊ मी तूझ्या गुणा ।। १ ।।
झाले चाळीस दिवस ......दिसेना
हूर हूर लगते माझ्या जीवना... ।। २ ।।
करीतो विनंती प्रभू चरणाशी
शांती दे देवा ............आत्म्याशी
अशी करीतो मी प्रार्थना ।। ३ ।।





गेला आमुचा मायेचा आधार
.......... तुम्हा भेटण्यास आले नातलग फार
येते आठवण पुन्हा ।। ४ ।।

### ८३८. विझला मायेचा दीप

एकाएकी आली हवा आज विझला मायेचा दीप
माझा कुंकवाचा धनी मला गेलाय सोडून ।। धृ ।।
दु:खामध्ये संसाराची ओढली गाडी
दुष्ट काळाने फोडली जोडी
शोधू कुठल्या गावाशिवा ।। १ ।।
लहान थोर सारे रडे धाई धाई
काय करावे मजला सुचेना हो काही
या दु:खाला नाही सीमा आज ।। २ ।।

### ८३९. या घराची गेली शान

या घराची गेली शान, कुटुंबाची गेली शान
सोडूनी गेले या घराला...... आमुचे महान ।। धृ ।।
कष्टमय हे जीवन त्यांचे
मुलाबाळाला मोठे केले
असा काळाने डाव साधीला (२)
सोडूनी गेले ।। १ ।।
देवा आत्मा तुझ्याकडे आला
शंती दे देवा या आत्म्याला
हीच प्रार्थना चरणी आता सोडूनी गेले ......।। २ ।।

### ८४०. आई आई

आई आई तुला कोठे ग मी पाहू
तुजवीन जगी कैसा राहू ।। धृ ।।
हिंडलो ग मी शोधित रानीवनी
मजला दिसेना तिथे कोणी
गेलीस ऽऽ ग गेली ऽऽ सोडून मजला ग आई ।। १ ।।





फूल उमललेले त्याला का देवाने नेले
आई मुलाचे नाते का तोडले
गेलीस गेली सोडून मजला ग आई ।। २ ।।

## ८४१. आग लागली

आग लागली या मम जीवा मरण का ना यावा
माझ्या देवा मरण का ना यावा ।। धृ ।।
लाडके पुत्र माझे हे दोन नेलेस प्रभुजी तू हिरावून
आता जगी मज आहे कोण
हे संकट का यावा माझ्या देवा ।। १ ।।
दोन्ही सुना लेकीसमान
पतिविना झाल्या त्याही खिन्न
आकाश फाटले दोरही तुटले
कोठे घ्यावा विसावा माझ्या देवा ।। ३ ।।
म्हतारपणी काय दु:ख कोणाच्या जीवावरी
कैसे भोगू सुख हरवली माझी तान्हभूक
हे मी काय पहावा माझ्या देवा ।। ४ ।।

## ८४२. दु:ख अंतरीचे

दू:ख अंतरीचे माझ्या सांगवत नाही बोलवत नाही
आमूचे **.....**भजनात नाही (२) ।। धृ ।।
प्रेमळपण हे किती आठवावे
बोल अमृताचे उरी साठवावे
वेड जीवाला माझ्या लावून जाई ।। १ ।।
झिजविला देह झिजविली काया
तोषविला देह आमुचा लावूनिया माया
सागर प्रितीचा आम्हा सोडूनी जाई ।। २ ।।
वाटाड्या मंडळीचा होउनी गेला
दूजा भाव नाही कधी मनी बाळगिला
अशी प्रीती जो आम्हा सांगून जाई ।। ३ ।।





दु:ख अंतरीचे आमुच्या दास प्रभूला करितो विनंती
आत्म्याला त्याच्या लाभो शांती
स्वर्गीय सुख माझ्या बंधूस देई ।। ४ ।।

### ८४३. कुणाला प्रेम सांगावे

कुणाला प्रेम सांगावे
जीवाचे दु:ख सांगावे ।। धृ ।।
साथीचा साथ विस्कटला
दिलाचा दिलरुबा तुटला
आता हे गीत कुणी गावे ।। १ ।।
तूच ना प्रीतीचा प्याला
दिला पण पालथा केला
दिलाचा दिलरुबा तुटला
आता हे गीत कुणी गावे ।। २ ।।

### ८४४. दिपा सोडूनी गेले

दिपा दिपा सोडूनी गेले आम्हा
दैवी दीप हा हो विझला दैवी दिप विझला ।। धृ ।।
स्वगृहातूनी स्वर्गगृहाशी
पाऊल त्यांचे पुढती पडती
त्या पदकमली आश्रू गळती
गेला गेला गेला आमुचा हो आधार ।। १।।
सहवासातूनी स्मृती उराशी
प्रत्येकाच्या हृदायापाशी
कबरेवरची धोंड उशाशी
गेला गेला गेला गेला हो घेउनी ।। २।।
मरणानंतर जीवनी सुखांती
मिळते त्याना स्वर्गीशांती
या मातीतुनी शब्द ऐकूनी
शांती शांती शांती मिळते मला स्वर्गी ।। ३।।





### ८४५. देहाने दिधले दान

देहाने दिधले दान प्रभू रे
आत्मा तुझ्या स्वाधीन ।। धृ ।।
पाठविले त्वा जगती मजला
मानियले नच मी आज्ञेला
जिंकीतसे सैतान ।। १ ।।
घे घे प्रभू रे तुज सन्निध्य
अमर सौख्याचे दान दे आत्म्या
स्वर्गी हाच खरा आभिमान ।। २ ।।
दास प्रभूचा मोदे जाहला
एक ख्रिस्तरुप मान पावला
ठेवी जीवनी मुकूट भुषण ।। ३ ।।

### ८४६. मृत्यू तुला हा लाभ

लाभला मृत्यू तुला हा लाभ ।। धृ ।।
जन्मभरी रे, साथ जोडीला
सोडीतांना या बाळांना
श्वास रोखूनी उरात म्हटला
सांभाळी या बाळा ।। १ ।।
आई हा शब्द नाही उरला
जगता मधुनी पुरता गेला
सत्य मार्गी पुनरुत्थाना ।। २ ।।
वृक्ष सावली होती सानुल्या
परी छायेचा आधार तुटला
आई म्हणूनी बाळा पुकारा
प्रभू सांगती त्वरा ।। ३ ।।

### ८४७. शांती आत्म्याला दादाच्या

दे रे शांती आत्म्याला दादाच्या दे रे शांती आत्म्याला ।। धृ ।।





होता आमचा आधार एक
गाळीता दु:ख शमवी भूक
तू जर असता अंत क्षणाला बंधू मेला नसता ।। १ ।।
आठवू तयाचे गुण किती
डोळयापुढे उभी मूर्ती
आत्ताच बोलेन वाटे मजला शोभा होती काळाला ।। २ ।।
तिन्ही सांजा दु:खात होत्या
कसे तोडीले बंधुच्या नात्या
विनंती हो परमेशाला देई शांती आत्म्याला ।। ३ ।।

## ८४८. आरती

मंगल हे देवा तुज प्रभू राया गातो आरती
दे मज दान प्रभो तुज गातो आरती
जय बापा जय पुत्रा गातो आरती ।। धृ ।।
माळ घाला गळा माळ घाला गळा
प्रभे ख्रिस्ताच्या मारीया मातेच्या ।। १ ।।
ऐशा चांदण्या रात्रीत
देवदूत आला तो गर्जत गर्जत गर्जत
मेंढके कळप राखिती दूत तो आला धावत
रुसू नका दु:खू नका जातानी आमचा जयख्रिस्त घ्या (२)।। २ ।।

## ८४९. समाप्ती

तव गुण गाया सेवा कराया
सिद्ध करीशी आम्हा दयाळा ।। धृ ।।
बहु नम्र झालो आम्ही येथे आलो
कृपादान देशी आम्हाला
दिनभर केलेल्या पापांची क्षमा हाताने कर
आम्हा दीन अबला ।। १ ।।
ह्या भक्ताने आमंत्रण दिले
आम्हा नव्हे प्रभू दिधले तुला





आशिर्वाद दे तुझ्या भक्ताला
ज्याने तुझा झेंडा उभारीला ।। २ ।।

### ८५०. समाप्ती

देवा शुभ वर मला असावा
दे तव पायी विसावा देवा ।। धृ ।।
चिंतन ध्यानी तव गुण गाणी
खंड मुळीचा नसावा देवा
शुभ वर मला असावा ।। १ ।।
जन सेवा ही तव पद सेवा
मान्य प्रभुला व्हावा देवा
शुभ वर मला असावा ।। २ ।।
मी तू ऐसा भेद नसावा
दे तव पायी विसावा देवा
शुभ वर मला असावा ।। ३ ।।

### ८५१ प्रेमे सलाम घ्यावा

प्रेमे सलाम घ्यावा घ्यावा मजला निरोप द्यावा ।। धृ ।।
प्रभुनाम गाजवाया निजल्यास जागवाया
जाईन गावोगावा ।। १ ।।
प्रभुनाम गोड प्रीती आली प्रचिती
सांगेन गावोगावा ।। २ ।।
ओझ्याने लादलेले दु:खाने गांजलेले
देईन तया विसावा ।। ३ ।।
ख्रिस्तात आम्ही भाऊ प्रीतीने सदा राहू
विसरून भेदभावा ।। ४ ।।



